# RATNAVALI

## A SANSCRIT DRAMA IN FOUR ACTS,

TRANSLATED INTO MARATHI

BY

SHIVARAM SHASTRI KHARE,

REVISED AND CORRECTED

BY

KRISHNA SHASTRI CHIPLONKAR

SECRETARY AND REVISER TO THE DAKSHINA PRIZE COMMITTEE.

PUBLISHED BY ORDER OF

THE DIRECTOR OF PUBLIC INSTRUCTION.




BOMBAY:

PRINTED AT THE

ORIENTAL PRESS.

1864.

Price Annas Six.



# रत्नावली

ह्या चतुरंकी संस्कृत नाटकाचें मराठी भाषांतर

शिवरामशास्त्री खरे ह्यांनीं केलें

तें

कृष्णशास्त्री चिपळुणकर

दक्षिणाप्रैज कमिटीचे सेक्रेटरी आणि रिवैज़र

ह्यांनीं शुद्ध करून

मेहरबान दैरेक्तर आफ पब्लिक इनस्त्रक्शन

ह्यांच्या हुकुमावरून




मुंबई मध्यें,

ओरिएन्टल छापखान्यांत छापिलें.

---

सन १८६४.

# प्रस्तावना.



प्राचीनकाळीं **श्रीहर्ष** ह्मणून एक राजा होऊन गेला. हा राजा मोठा विद्वान व चतुर होता. त्यानें संस्कृत भाषेंत कितीएक उत्तम ग्रंथ केले आहेत. पंचकाव्यांत **नैषध** ह्मणून जें मोठें प्रसिद्ध काव्य आहे, तें **श्रीहर्षाच्या** नांवानें प्रसिद्ध आहे. त्या काव्याची पंडितजनांमध्यें फारच चहा आहे. प्राकृत भाषेंत **नलचरित्र** ह्मणून जी **रघुनाथराव** कवीनें लहानशी कविता केली आहे, व जी मराठी कवितांचें वेंचे किंवा नवनीत ह्या नावांच्या पुस्तकांत छापिली आहे, त्या कवितेंत संस्कृत **नैषध** काव्याचें कांहींसें अनुकरण केलें आहे. त्यावरून मूळका-व्याची योग्यता व सरसता ह्यांचें अनुमान मराठी वाचणारांनीं करावें. ह्याच **श्रीहर्ष** कवीनें हें **रत्ना-वलीनाटक** व **नागानंद** नांवाचें दुसरें एक नाटक अशीं केलीं आहेत.

आतां कितीएक प्राचीन संस्कृत ग्रंथकारांचें मत आहे कीं हे ग्रंथ खरोखरी राजा **श्रीहर्षानें** स्वतः

केले असें नाहीं ; तर **धावक** म्हणून कोणी विद्वान कवि होता त्यास पैसा देऊन त्याकडून **श्रीहर्षानें** हे ग्रंथ करविले, व त्या कवीनें राजाच्या सांगण्यावरून, किंवा कृतज्ञताबुद्धीनें स्वतः होऊन, त्या राजाचें त्या ग्रंथांवर नांव घातलें. आतां ह्या गोष्टींत तथ्यांश काय असेल तो असो. निदान इतकें खरें दिसतें, कीं **श्रीहर्षराजा** स्वतः कवि नसला तरी त्याच्या अंगीं बरीच विद्या असून तो विद्वानांचा पोशिंदा असावा.

**श्रीहर्ष** किंवा ह्या नाटकाचा जो कोणी वास्तविक कवि असेल तो **कालिदासा**पेक्षां अर्वाचीन असावा असें पुष्कळ गोष्टींवरून दिसतें. **गोवर्धन** कवीनें आपल्या **गोवर्धनसप्तशती** नामक ग्रंथांत **कालिदास, भवभूति, बाण** वगैरे कितीएक प्राचीन कवींचें वर्णन केलें आहे. त्यांत **श्रीहर्षा**चें नांव नाहीं, तसेंच **रत्नावलीनाटकां**तील संविधानकांतील काहीं भाग **कालिदास**कृत **विक्रमोर्वशी** नामक नाटकांतल्या संविधानकांशीं अगदीं सदृश असून ते त्यांतून घेतले असावे असें कितीएक विद्वानांचें मत आहे. भाषारचनेवरूनही पाहतां **रत्नावलीची** कृति **शाकुंतला**दिकांपेक्षां अर्वाचीन भासतें.

**उत्तर रामचरित्र, शाकुंतल, मालतीमाधव** ह्या नाटकांपेक्षां **रत्नावलीनाटक** निराळ्या जातीचें आहे, हें मर्मज्ञ वाचणाराचें सहज लक्षांत येईल. पहिल्या

मुलांना काय पाहिजे असतं, हें यांना असतं का माहीत ? नोकरपेशाचे लोक, तीन त्रिकाळ ऑफिसांत असायचे, मुलांची ओळखसुद्धां नाहीं, आणि त्यांना हें असं वाटतं ! आई ह्मणजे जशी कांहीं कुणी नव्हेच. विचारलं कधीं तर ह्मणायचं 'तुला काय त्याचं ? गोदीची व्यवस्था कशी करायची तें माझं मला चांगलं माहीत आहे.' पण ही व्यवस्था काय केली आहे, तें मात्र सांगायचं नाहीं. जशी कांहीं आई ह्मणजे कुणी नव्हेच. कुठेंही जा, कुणाही नोकरपेशाच्या घरीं पाहा, व्यवस्था हीच !—"

आई पुन्हां क्षणभर थांबली. ती सौम्य शब्दांनें बोलत होती खरी; पण तिच्या भाषेंत चिरड होती. बोलत असतांना कठोर शब्द जाऊं नयेत म्हणून ती सारखी खबरदारी घेत होती.

ती पुढें ह्मणाली, "जिथं तूं जाणार आहेस तिथं कसं वागलं पाहिजे तें तुला सांगितलं पाहिजे होतं खरं; पण तिथली व्यवस्थाच जर मला माहीत नाहीं, तर सांगूं कशी ? तुझं वय लहान आहे, कदाचित, तुझ्या वयाच्या मुली देखील तिथं नसतील, कदाचित् मुलीही फारशा नसतील.—मोठ्या वयाच्या मुली असल्या तर तूं लहान आहेस ह्मणून तुझ्यावर सत्ता गाजवूं लागतील. म्हणून म्हणतें, तिथं गेल्यावर लहान राहूं नकोस. सर्वांना तुझी भीती वाटली पाहिजे —तुझी जरब बसली पाहिजे, अशाच रीतीनें वाग. एकदां जाऊन आलीस, तिथली व्यवस्था कळली ह्मणजे मला कांहीं सांगतां येण्याजोगं असलं तर सांगेन. पण माझ्या सांगण्याचा तुला काय उपयोग होणार ? तूं कांहीं सासरीं जात नाहींस. सासरीं मुलींनं कसं वागावं, हें कदाचित् मला सांगतां आलं असतं. पण जिथ तूं जाते आहेस तिथं मी कधीं गेलेंच नाहीं तर तुला सांगूं तरी काय ?"

मी ह्मटलें, "कांहींच सांगूं नकोस. एक सांगितलंस तेवढं पुरें झालं. मी लहान आहें, हें विसरायला सांगितलंस, त्यांतच सर्व काय तें आलं. मी लहान आहें, याची मला बहुधा आठवण नसतेच. मी मोठेपणाचा आव आणतें, मोठ्यांच्या गोष्टींत तोंड घालतें, असा माझ्यावर आरोप आहे. तुझ्या बोलण्यानं मला आतां अवसान आलं. मी मोठेपणाचा आव जाणून बुजून कधीं आणला नाहीं. तो तसा येतो, याचं कारण मला माझ्या लहानपणाची आठवणच नाहीं. ह्मणून

ती आठवण कॉलेजांत गेल्यावर केली पाहिजे आहे कीं काय अशी मला शंका होती. पण ती शंका आतां गेली. तुझा आधार मिळाला. त्या आधारच्या जोरावर मी आतां वाटेल त्याच्याबरोबर वाटेल तशी झगडेन. ''

माझें भाषण ऐकून आई अगदीं आपल्याशींच हंसली आणि कांहीं न बोलतां निघून गेली.

एकेकांच्या उपदेशाची पाळी होती. बाबांनी चांगलें तासभर व्याख्यान दिलें; पण तें अगदीं ठराविक सांच्याचें होतें. माझ्या दृष्टीनें त्यांत कांहीं नाविन्य नव्हतें. पुष्कळशा पुस्तकांतून तसले उपदेश मी वाचले होते; त्यामुळें उपदेश करण्याचा त्यांनीं नुसता विधि केला, असेंच मला वाटलें.

डॉक्टर कीर्तीकरांकडे निरोप घ्यायला गेलें, त्यावेळीं मात्र माझी तारांबळ उडाली. बाबांच्या उपदेशाचा रुक्षपणा त्यांच्या शब्दांत नव्हता. त्यांना स्वतःचें मूलबाळ नव्हतें. केवढ्या तरी मोठ्या उजाड बंगल्यांत ते एकटेच राहात होते, त्यामुळें मी जी घटकाभर जात असें तेवढीच कौटुंबिकता त्यांना अनुभवायला मिळत असे. मी जाणार याचें त्यामुळेंच त्यांना जड गेलें.

ते म्हणाले, " तुला निरोप द्यायचं माझ्या जिवावर येतं आहे. आजपर्यंत बोललों नव्हतों, पण आज उघडपणें सांगतों—तूं इथं येऊं लागल्यापासून मला एक प्रकारचा पितृपदाचा लाभ मिळाल्यासारखं वाटत होतं. बोलावं, शिकवावं, सांगावं किंवा रागें भरावं, असले बाबागिरीचे सगळे हक्क मी चालवून घेत होतों. तूंही माझं ऐकत होतीस—म्हणजे तूं मुकाट्यानं ऐकत होतीस असं मी म्हणत नाहीं - माझं म्हणणं तुला पटत होतं म्हणून तूं ऐकत होतीस. मला वाटतं, तुझ्या पुढल्या आयुष्याला कांहीं विवक्षित दिशा लावण्याचा प्रयत्न मी केला आहे आणि त्याचे परिणामही होतील अशी मला खात्री आहे. तूं बी. ए. झाल्यावर देखील तुझ्या हातीं पडणार नाहींत अशा प्रकारचीं पुस्तकं मी तुझ्या हातीं दिलीं आहेत. तुझ्या लहान्या मनावर झालेला हा संस्कार पुढं पाळंमुळं धरल्यावांचून राहाणार नाहीं. तूं ज्या जागीं जाते आहेस तिथं तुला जवळ जवळ तुरुंगवासच भोगावा लागणार आहे. मला माहित आहे, कीं अजून फर्ग्युसन कॉलेजांत फारशा मुली जाऊं लागल्या नाहींत. त्यांतून जाताहेत त्या बहुतेक गांवांतल्याच आहेत. कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें चार दोन मुली असतील किंवा नसतील. तिथलीं कॉलेजां-

तलीं पोरं त्या मुलींना चांगलाच त्रास देत असतील असा माझा समज आहे. आणि त्यांतून तूं तर ही एवढीशी एक मुलगी—आणि त्यांतून वयानं इतकी लहान—कॉलेजांत आलेली पाहून त्या पोरांच्या अंगाचा तिळपापड होईल. त्यांतून प्रोफेसरांनीं जर तुझ्याबद्दल थोडीशी सहानुभूति दाखवली तर तीं कार्टीं तुझा चांगलाच पाठपुरावा करतील. आम्हींही विद्यार्थी असतांना मुंबईच्या कॉलेजांतून असले उपद्व्याप केले नाहींत असें नाहीं. पण मुंबईचे उपद्व्याप आणि पुण्याचे उपद्व्याप यांत फार फरक असतो. तुझ्या स्वभावाचा मला जो अंदाज आहे त्यावरून मला असं वाटतं, कीं तुला शेवटीं मुंबईलाच यावं लागेल. पण मुली, एक सांगतों तें ध्यानांत ठेव, कुणाच्या आहारीं जाऊं नकोस. मैत्रिणी जुळवतांनाही डोळे चांगले उघडे ठेव. प्रत्येकाच्या अंतःकरणांत अगदीं खोल पाहा. वर्षानुवर्ष सहवासाला राहिलं तरी देखील एखाद्या माणसाचा स्वभाव कळायला तसाच प्रसंग यावा लागतो. त्यांतून हे तर फुटक्या तारवाचे तुकडे, क्षणभर जवळ यायचे आणि लगेच दूर व्हायचे. पण त्या क्षणभराच्या सहवासांत या फुटक्या तारवाच्या तुकड्यांतला एखादा तुकडा आपल्या अंगच्या खिळ्यानं जी एखादी जखम करून जातो ती उभ्या आयुष्याला पुरून उरते, एवढंच चांगलं ध्यानांत ठेव. तुला कुठल्या पुस्तकांची जरुरी लागली तर मला कळवीत जा. आणि कांहीं चांगलीं नवीं पुस्तकं जीं माझ्या हातीं येतील तीं मी तुझ्याकडे पाठवीनच—तीं लक्षपूर्वक वाचीत जा. आणि सर्वांत विशेष सांगायचं म्हणजे हेंच, कीं मला विसरूं नकोस,—पोरी, मला विसरूं नकोस. ”

शेवटचें वाक्य उच्चारतांना त्यांना एकदम हुंदका आला आणि ते ओक्साबोक्शीं रडूं लागले. माझीही तीच स्थिति झाली होती. जातीपातीचा नाहीं, नात्यागोत्याचा नाहीं, असा एक वृद्ध गृहस्थ माझ्या वियोगानें कासावीस होतो हें पाहून दुःखाबरोबरच आश्चर्यही वाटलें. कितीतरी वेळ ते हुंदके देत होते. अनाथ झालेल्या एका वृद्ध जीवाचा तो आर्तस्वर होता. त्या हुंदक्यांचा परिणाम या क्षणापर्यंत माझ्या अंतःकरणांत टिकून राहिला आहे.

बाबांनी एखाद्या मास्तरसारखा मला उपदेश केला. हुंदके तर राहोतच, पण त्यांचे नुसते डोळे सुद्धां ओले झाले नाहींत! आणि हा परका माणूस मला निरोप देतांना ओक्सीबोक्शीं रडतो कां, याचा उलगडा मला होईना. मी जाणार या

कल्पनेनें माझ्या आईला जितकें दुःख होत होतें, तितकीच व्यथा या माझ्या वृद्ध मित्राला झालेली दिसली. पुरुषाच्या हृदयांत देखील मातृत्वाची भावना असते काय, असा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला.

मी आईला विचारलें तेव्हां ती म्हणाली, "तुझा प्रश्नही बरोबर आहे आणि उत्तरही बरोबर आहे. मातृत्वाची भावना सर्वांच्याच हृदयांत असते. तिथं स्त्री–पुरुष, लहान–मोठं हा भेदच नाहीं आम्हीं पुरुष आहोंत, स्त्रियांहून निराळे आहोंत, असं दाखविण्यासाठीं दांभिकपणानं जातीचे पुरुष मुर्दाडपणानं आपलं मन मारतात आणि त्यालाच मर्दपणा म्हणतात. 'बायकांसारखा काय रडतोस? मर्दासारखा मर्द तूं!' असं म्हणतांना बायका म्हणजे रडव्या असं जबरदस्तीनें ठरविण्याचा त्यांचा उद्देश असतो. बायका रडव्या आहेत–नाहीं असं नाहीं–पण त्या दांभिक नाहींत. रडवेपणा पुरुषांच्या अंतःकरणांतही आहे, पण रडणं म्हणजे कमीपणा, असा एक सिद्धांत ठरल्यामुळं रडूं आलं तरी पुरुष तें बळेंच दाबून टाकतात. कुणाचं दुःख पाहिलं तर–पुरुष असो कीं स्त्री असो–अंतःकरण हें हाललंच पाहिजे. आणि तसं अंतःकरण हाललं, कीं रडूं आल्यावांचून कसं राहील? रडूं येणं ही ईश्वरीवृत्ति आहे. आलेलं रडूं दाबून ठेवणं ही आसुरी वृत्ति आहे. 'एवढा प्रसंग आला, पण त्यानं डोळ्याला टिपूस येऊं दिलं नाहीं!' अशी एकाद्याची कुणी तारीफ केली तर मला त्या माणसाचा तिटकारा येतो. स्वतःवर आलेल्या प्रसंगानं ज्या माणसाचं अंतःकरण द्रवत नाहीं त्याला दुसऱ्याच्या दुःखाची जाणीव तरी कशी होणार? रडलं पाहिजे बरं पोरी, रडलं पाहिजे. दुसऱ्याचं दुःख पाहून आधीं रडलं पाहिजे. दुसऱ्याचं दुःख पाहून येणारं रडं दाबायची संवय केलीस—लोकांना वाईट दिसेल म्हणून असले दुःखाचे आंवढे गिळून टाकलेस, तर मन मरून जाईल. अंगीं राक्षसी वृत्ति येईल."

आईच्या भाषणानें माझ्या प्रश्नावर बराच प्रकाश पडला.

आतां तिसरा निरोप बाबीशेटचा. निरोप घेतांना आधीं मलाच हुंदका आला. पंचवीस मुलांनातवंडांच्या लटांबरांत वाढलेला तो दुःखी जीव, त्यांना माझ्या वियोगानें वाईट वाटल्यास नवल कोणतें? आयुष्यांतील सर्व प्रकारचीं दुःखें त्यांनीं अनुभवलीं होतीं आणि तीं दुःखें अनुभवून पचवलीं होतीं, म्हणूनच त्यांचीं वृत्ति सदा आनंदी असे.

डोळ्यांतील आसवें पुसून ते म्हणाले, " गोदे, पोरी, तूं आतां पुण्याला जाणार. कुणी सांगावं, यापुढें कदाचित् तुझी–आमची भेटसुद्धां होणार नाहीं. तुझे वडील सरकारी अधिकारी आहेत. तुला पुढली सुट्टी पडायच्या पूर्वी कदाचित् त्यांची इथून बदलीसुद्धां होईल. आणि तशी जर बदली झाली तर तुझी भेट होणं कठीण ! पण तसं तरी कसं म्हणूं ? लहानपणच्या मैत्रिणीला भेटण्यासाठीं पत्ता माहित नसतां सारी मुंबई तूं पालथी घातलीस, हें मी प्रत्यक्ष पाहिलं आहे. तूं मला भेटायला येशील, नाहीं असं नाहीं. पण आलीस तर अशी राहणार किती दिवस ? तुझे वडील इथं राहिले तर महिना–दीड महिना राहण्याची संधि तरी आहे. म्हणून वाटतं, कीं तुझं लग्न होईपर्यंत तरी तुझ्या वडिलांची इथून बदली होऊं नये. लग्न झालं कीं तूं परस्वाधीन झालीस.—"

" मी मुळीं लग्नच करणार नाहीं " मी एकदम म्हटलें.

बावीशेट मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, " हें पहा गोदे, या गप्पा नकोत ! मी लग्न करणार नाहीं म्हणणारीं पोरंही मी पाहिलीं आहेत नि पोरीही पाहिल्या आहेत. तीं लग्नाच्या आधल्या दिवसापर्यंत असंच म्हणत असतात–शेवटीं लग्न करतात आणि पूर्वीचं बोलणं विसरून जातात. तूं म्हण तसं वाटेल तर; कदाचित् आपला शब्द तूं खरा देखील करशील; पण बाई ग, परिस्थिति मोठी बिकट असते. माणसाचं मन केव्हां लंगडतं तें सांगतां यायचं नाहीं. तशी मधेंच लग्न करून गेलीस तर मात्र आम्हांला कायमची मुकलीस, असंच मी म्हणेन. माझ्या घरांत हीं एवढीं मुलं आहेत,—इतकीं मुलं आहेत, कीं एकदोन आमटींतून गेलीं तरी पत्ता लागायचा नाहीं !–तरी देखील माझं मन तुझ्याकडे गुंततं. असं कां होतं तें मला सांगतां येत नाहीं. पण आपला अगदीं पोटचा गोळा दूर जातो आहे, असं वाटूं लागलं आहे मला.—"

या शब्दासरशींच त्यांना हुंदका आला. हंशानें सुरवात करून भाषणाचा शेवट रडण्यांत झाला.

मला पुण्याला नेऊन पोंचविण्यासाठीं बाबा स्वतः येणार होते. त्यांना जी रजा मिळाली होती, त्या रजेच्या सुरवातीचा दिवस दोन दिवसांनीं पुढें होता. दोन दिवसांच्या मुदतींत त्यांना दौऱ्यावर जायचें होतें. तो दौऱ्याचा गांव कोल्हापूर मार्गाच्या रस्त्यावर होता. म्हणून कोल्हापूर मार्गेंच पुण्याला जावें असें ठरलें.

बाबांचें काम संपेपर्यंत आम्हीं साखरप्याला दोन दिवस राहिलों. आगबोटीचा प्रवास एकदां झालाच होता, त्यामुळें हा घाटांतला प्रवास मला जास्त आकर्षक वाटला. साखरप्यापासूनच घांटाला सुरवात होते.

या घाटाला आंबाघाट म्हणतात. बहुतेक हा घाटांतला प्रवास रात्रींच करतात. पण आमच्या सुदैवानें म्हणा किंवा बाबांच्या अधिकाराच्या जोरानें म्हणा, आम्हांला कोल्हापुराहून आलेली एक घोड्याची गाडी सांपडली. सह्याद्रींतून मार्ग काढीत कोकणची सरहद्द ओलांडून घांटावर जाण्याचें भाग्य मला त्यामुळेंच लाभलें. नंतरच्या मुदतींतील प्रवासांत मी खंडाळा घाटांतून आगगाडींतून प्रवास केला होता; पण घोड्याच्या गाडींतून केलेल्या आंबाघाटांतील ह्या प्रवासानें माझें मन जसें भारून गेलें तसें आगगाडीच्या प्रवासानें गेलें नाहीं. घाटांची अवर्णनीय शोभा पाहायला संथ चालणाऱ्या गाडींतूनच गेलें पाहिजे.

कोल्हापूरला आम्हीं एक दिवस राहिलों. तेथील देवळें पाहिलीं, राजवाडे पाहिले आणि रंकाळ्याचा तलावही पाहिला. रंकाळ्याचा तलाव पाहिल्याशिवाय कोल्हापूरची यात्रा सफल होत नाहीं.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळच्या गाडीनें निघून आम्हीं दुसऱ्या सकाळीं पुण्याला येऊन पोंचलों.

---

## प्रकरण २ रें

# पहिला तडाखा



आगगाडीनें माझा हा पहिलाच प्रवास होता. परीक्षेच्या वेळीं मी मुंबईला गेलें होतें. आगगाडी नुसती पाहिली होती; पण त्यांतून प्रवास करण्याची संधि मिळाली नव्हती. कोल्हापूरच्या स्टेशनवर आह्मीं संध्याकाळीं आगगाडींत बसलों. मिरजेला गाडी बदलावी लागली. आह्मीं सेकंड क्लासांतून प्रवास करीत होतों, त्यामुळें आगगाडीच्या प्रवासाची खरी गैरसोय मला अनुभवतां आली नाहीं. जागा आधींच ' रिझर्व्ह ' करून ठेवल्या होत्या. त्यामुळें कोणतीच अडचण भासली नाहीं.

बंगलोरकडून येणाऱ्या या गाडींतील प्रवाशांची मिरजेच्या स्टेशनवर जेवणाची वेळ असल्यामुळें गाडी बराच वेळ स्टेशनांत उभी राहिली होती. सहज थर्ड क्लासकडे नजर टाकली, त्यावेळीं माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. या नंतर देखील बरींच स्टेशनें आहेत, आणि त्या स्टेशनावरून प्रवासी चढणार आहेत, त्यांचा समावेश तरी कुठें होणार आहे, याची कल्पना मला करतां येईना. इतकी तुफान गर्दी मिरज स्टेशनावर झाली होती.

आगबोटीच्या प्रवासापेक्षां मला हा आगगाडीचा प्रवास जास्त कंटाळवाणा आणि जास्त त्रासदायक वाटला. आह्मी सेकंड क्लासांत होतों, तरीही मला अगदीं डांबून गेल्यासारखें वाटलें. आगबोटींत इकडे तिकडे मनसोक्त पाय मोकळे करण्याची सवड होती. ' डेक ' वरून चांगलें हिंडतां फिरतां येत असे. पण इथला सारा कारभार पंधरा—वीस फुटांच्या मोकळीकीचा. पाय कसे अगदीं आंबून गेले. प्रत्येक स्टेशनावर गाडी उभी राहात असे, त्यामुळें मला जाग येत असे. झोंपही सुखानें लागली नाहीं. कसे बसे डोळे मिटून पडून राहाण्याचा प्रयत्न करीत होतें. जाग आल्यावेळीं खिडकींतून बाहेर नजर टाकली तर बाहेरचें दृश्य अगदीं भयाण वाटत असे. विशेषतः जसजसें पुणें जवळ येत चाललें तसतशी गाडी ज्या मार्गातून येत होती तो भाग अगदीं भेसूर वाटला. कोंकणच्या सृष्टींसौंदर्याची नजर असल्यामुळें आणि पहांटेचा अंधुक प्रकाश असल्यामुळें तो झाडपाला नसलेला रुक्ष भाग अधिकच भयाण वाटत होता. पुणें असेंच असेल का, असें मनांत येऊन जीव कासावीस झाला.

पुण्याच्या स्टेशनवर येऊन पोंचलों त्यावेळीं झुंजुमुंजु दिसूं लागलें होतें. मुंबईचीं स्टेशनें नुसतीं बाहेरून पाहिलीं होतीं, त्यांच्याशीं तुलना करतां हें स्टेशन अगदींच भिकार वाटलें. पण गाडीच्या खिडकींतून पाहिलेल्या भयाणपणाच्या मानानें स्टेशनाजवळचा भाग तरी भयाण वाटला नाहीं.

टांग्यांत बसून आम्हीं गांवांत निघालों, त्यावेळीं मात्र गांवांतील घरेंदारें पाहून माझी पुन्हां निराशा झाली. पुणें म्हणतांच त्याच्या शेजारीं मुंबईचें नांव उच्चारण्याची साधारण वहिवाट आहे. पण नगररचनेच्या दृष्टीनें या दोन गांवांत जमीन–अस्मानाचें अंतर वाटलें. मुंबई जितकी स्वच्छ दिसत असे, तितकेंच पुणें गलिच्छ दिसलें. कोंकणच्या दृष्टीनें पहातांना घरें कशीं मोडकींमोडकीं वाटलीं.

वेळ उजाडण्याची होती, फारशी रहदारी सुरू नव्हती; त्यामुळें पहिल्याच पावलाला गांव उजाड असल्यासारखें वाटलें. नुकतीच लढाई होऊन गेलेली असावी, तोफांच्या माऱ्यानें घरेंदारें कोसळलेलीं असावीं आणि नंतर तेथें जाऊन पहावें, अशी जर कल्पना केली तर एखादें गांव जसें दिसलें असतें तसेंच पहिल्या दृष्टीला मला पुणें वाटलें.

सरळ कॉलेजांत न जातां गांवांत बाबांच्या एका मित्राच्या घरीं आम्हीं जाऊन उतरलों. तो एक जुन्या काळचा वाडा होता. त्या वाड्यांतील दालनाच्या आणि चिंचोळ्या जिन्यांच्या खांची–खिंडारांतून बाबांच्या मित्राच्या बिऱ्हाडीं पोंचेपर्यंत केवढा तरी मोठा प्रवास केला असें मला वाटलें. प्रमाणशुद्ध बांधलेलीं, मोकळी हवा खेळती असलेलीं, दारांतील सुशोभित अंगणानें उठावून दिसणारीं कोंकणचीं घरें नजरेसमोर असल्यामुळें हें कोंदट, खुजट, प्रकाशहीन, खेळत्या हवेची नाकेबंदी असलेलें घर पहातांच माझ्या कोवळ्या मनाला धक्का बसला. आमचें कॉलेजही असेंच असेल का, असा प्रश्न एकदम पुढें उभा राहिला.

घरांतील पायाखालची जमीन देखील सरळ नव्हती. तिला सतरा ठिकाणीं खड्डे पडले होते. तक्तपोशी अगदीं डोक्याला लागायला आली होती आणि वरच्या मजल्यावरून माणसें चालूं लागलीं कीं त्यांतून माती पडत असे.

तिथला आदरातिथ्याचा प्रकार पाहिला, तोही मोठा चमत्कारिक वाटला. घरचे यजमान प्रत्येकवेळीं बोलण्यांत मोठा 'सडेतोडपणा'चा आव आणित असत. पण त्या सडेतोडपणांत बेमुर्वतपणाच जास्त दिसत होता.

हे गृहस्थ बाबांचे लहानपणचे बालमित्र होते. पुण्यांतले ते फार प्रख्यात वकील होते. पण पुढल्या आयुष्यांत त्यांचा कांहीं संबंध येत नसल्यामुळें मी त्यांच्या नांवाचा उल्लेख करीत नाहीं. एक मित्र मोठेपणीं आपल्या दुसऱ्या बालमित्राशीं कशा रीतीनें वागेल, याच्या कांहीं कल्पना मी माझ्या मनाशीं ठरवल्या होत्या. त्या कसोटीला लावून पहातांना या दोन बालमित्रांचें परस्परांशीं होत असलेलें वर्तन मला कसेसेंच वाटलें.

अधिकाऱ्याच्या नात्यानें वागत असतां सदोदित खोटा आव आणण्याचा कंटाळा आलेले माझे बाबा मोकळ्यामनानें आपल्या बालमित्राशीं बोलूं पाहात होतें, तर हे वकीलसाहेब पदोपदीं त्यांच्या मोठेपणाची जाणीव करून देऊन आपलीच आढ्यता मिरवींत होते. बाळपणच्या आठवणीनें बाबांनीं त्यांना ' अरे तुरे ' केलें तर ते नुसते ' अहो जाहो 'च नव्हे, तर ' रावसाहेब ' म्हणूनच त्यांना संबोधित होते. या कृत्रिम लघळपणाचा मला देखील अगदीं तिटकारा आला. इथलीं सगळीं माणसें अशींच असतील का, अशी भिती मनांत उभी राहिली.

दुसऱ्या दिवशीं बाबा मला कॉलेजाज्या घेऊन गेले. त्यावेळीं माझा जीव बराचसा खालीं पडला. कॉलेजांत आजूबाजूला कितीतरी मोकळी जागा होती आणि घरें नवीन पद्धतीनें बांधलेलीं असल्यामुळें गांवांतल्या घरांप्रमाणें उजाड वाटत नव्हतीं. त्यावेळीं या भागांत वस्ती फारशी नव्हतीच म्हटलें तरी चालेल. मुलांच्या साठीं ' हॉस्टेल ' होतें खरें; पण मुलींची संख्या फारच थोडी असल्यामुळें प्रिन्सिपलसाहेबांच्या घराशेजारचें एक घर मुलींचें ' हॉस्टेल ' म्हणून वापरण्यांत येत होतें.

कॉलेजांत नांव नोंदवण्याचे सर्व विधी झाले आणि मी या आमच्या मुलींच्या लहानशा राज्यांत अधिष्ठित झालें. आमच्या या ' हॉस्टेल 'मधल्या मुलींत मी सर्वांत लहान वयाची होतें. बहुतेक मुली ब्राह्मणाच्या होत्या. एकच महाराष्ट्रीय क्षत्रिय जातीची होती. आणि ती सर्वांत मोठ्या वयाची होती. ती इंटरच्या क्लासांत होती.

तिचें नांव मंजुळा चव्हाण. ती माझ्यापेक्षां सात--आठ वर्षांनीं वडील होती, तरी पहिल्याच भेटीला तिची माझी दोस्ती जमली.

माझ्या मनाचा ओढाच असा चमत्कारिक झाला होता, कीं केव्हांही मला

माझ्या जातीच्या माणसांपासून दूर राहावें असें वाटत असे. त्यांतून मंजुळा वयानें बरीच मोठी असल्यामुळें एका प्रकारें मला तिचा आधार वाटला. कुटुंबांतल्या एखाद्या वडील माणसासारखी ती वाटली. तिचा स्वभाव एकलकोंडा असल्याबद्दल बाकीच्या मुली बोलत असत, पण मला अनुभव आला तो अगदींच निराळा आला. बाकीच्या मुली तिच्याकडे ज्या नजरेनें पाहात असत, त्यामुळेंच ती त्यांच्यापासून शक्य तितकी दूर राहात असे.

पण कांहीं कारण नसतां पहिल्यापासूनच ती माझ्याशीं मोकळेपणानें वागूं लागली. ठकीची आणि छबीची उणीव मंजुळेकरवीं भरून निघणार, असें मला वाटूं लागलें.

तिची घरची स्थिती फार गरीबीची होती. तिचा भाऊ संस्थानांत कुठेंसा नोकर होता. संस्थानांत वशिला लावून तिच्या कॉलेजांतील खर्चाची त्यानें व्यवस्था करवून घेतली होती, म्हणूनच कॉलेजला तिचे पाय लागले.

इथेंही पंक्तिप्रपंच होताच. मंजुळेचें ताट बाजूला मांडलें जात असे. हॉस्टेलच्या व्यवस्थेंत गडी असल्यामुळें तिचें ताट तिला स्वतःला घांसावें लागत नसे, हेंच भाग्य ! तिला त्याचें कांहीं वाटत नव्हतें खरें; पण ती गोष्ट माझ्या ध्यानांत प्रामुख्यानें आली.

मी तिला विचारलें तेव्हां ती ह्मणाली, " त्यांत कसलं वाईट वाटायचं ? जिकडे तिकडे हेंच चाललं आहे. सर्वांच्या पंक्तीला ताट नसलं तर पोट कांहीं उपाशीं पडत नाहीं. ब्राह्मणांच्या पंक्तीला बसल्यानं अन्नाची चव कांहीं बदलत नाहीं. मग ओटीवर किंवा अंगणांत जरी ताट मांडलं तरी त्याची कसली पर्वा करायची ? आह्मांला मराठे ह्मणून बाजूला बसवतात, पण तुह्मी नाहीं का मराठे ? आह्मी आपणाला क्षत्रिय ह्मणवलं तर यांना राग येतो. पण मराठे ही जात आहे का ? मराठी बोलतात ते सारे मराठे. मग ते ब्राह्मण असोत, शूद्र असोत, कीं महार—धेड असोत. आह्मांला क्षत्रिय ह्मणायचं नसलं तर दुसरं काय वाटेल तें म्हणा, पण मराठे ह्मणजे क्षत्रिय, असा कोता अर्थ करूं नका, एवढंच मी सदोदित म्हणत असतें. आह्मांला जर क्षत्रिय ह्मणायचं नाहीं तर महाराष्ट्रांत क्षत्रियच नाहींत असं ह्मणावं लागेल. बाहेरच्या प्रांतांत आपण गेलों—आणि इंदूर ग्वाल्हेर—बडोदं इकडे जायचा प्रसंग मला वारंवार येतो—तर तद्देशीय लोक इक-

डल्या सर्वच लोकांना मराठे ह्मणतात. तो कोण आहे, तर 'मराठा ब्राह्मण आहे;' असं ह्मणण्याचा तिकडे प्रघात आहे. गुजराती ब्राह्मण, मद्रासी ब्राह्मण, बंगाली ब्राह्मण तसाच मराठा ब्राह्मण ! आह्मी जर त्यांना सांगितलं कीं आह्मीं 'मराठे' तर ते विचारतात, कीं 'मराठे कोण ? मराठे ब्राह्मण कीं मराठे क्षत्रिय कीं मराठे वाणी कीं मराठे शूद्र ?' परक्या प्रांतातल्या लोकांनी असे प्रश्न केले, कीं मराठे ही जात नव्हे, असं वाटूं लागतं. पण इकडे मराठा हा शब्द जातिवाचक होऊन बसला आहे. परप्रांतातून हिंडल्यामुळं मला तो तसा वाटत नाहीं. त्यामुळंच माझी जात कुणी विचारली तर ती क्षत्रिय ह्मणून मी सांगतें, आणि ह्मणूनच या साऱ्या मुलींचा माझ्यावर राग आहे. मी डोक्यावरून पदर घेत नाहीं. मराठेपणाचा हा आचार मी पाळीत नाहीं, त्यामुळं मी देखील त्यांच्यातलीच एक दिसतें, ह्मणूनही त्यांचा माझ्यावर राग आहे.—"

बोलत असतांना ती मधेंच एकदम थांबली. या तिच्या विचुकपणाचें मला आश्चर्य वाटलें. तिची दृष्टि बधिर झाल्यासारखी दिसत होती. तिचें लक्ष बोलतां बोलतां कुठें तरी भलतीकडेच गेलें होतें.

मी तिला विचारलें, "थांबलीस कां ?"

"खरंच !" ह्मणून तिनें चष्मा काढून डोळे पुसले. त्यावेळीं माझ्या ध्यानांत आलें, कीं तिच्या डोळ्यांत आंसवें आलीं होतीं.

मी ह्मटलें, "मंजूताई, तुझ्या डोळ्यांत टिपं आलीं !"

ती खिन्नपणानें हंसली. ती ह्मणाली, "दुर्दैव तुझं कीं तुला माझी स्थिती अनुभवतां यायची नाहीं. तुझ्यापेक्षां वरची जात कोणती नाहीं. वरच्या दर्जाच्या जाती खालच्या दर्जाच्या जातीला कशा डिवचतात, याचा अनुभव तुला यायचा संभव नाहीं. दुसऱ्यांना नांवं कशाला ठेवायचीं ? आह्मीं देखिल तशाच वागतों. इतक्याच वाईट रीतीनं आह्मी कुणब्यांना वागावतों, त्याचं आम्हांला कांहीं वाईट वाटत नाहीं. दुसऱ्यांना—आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या जातीला आपण वाईट वागवतों आहोंत याची आठवण विसरून, आम्हांला वाईट वागवल्याबद्दल आम्हीं ब्राम्हणांना मात्र नांवं ठेवतों. पण त्यांना तशीं नांवं ठेवतांना आम्ही दुसऱ्यांशीं कसं वागतों याची जाणीव आम्हांला नसते आम्हांला वाटत असतं, कीं कुणब्याचा दर्जाच मुळीं कमी प्रतीचा. त्याच लेखीं त्यांना वागवायचं. त्यांत आम्हांला

कांहीं अस्वाभाविक वाटत नाहीं. कुणब्यांशीं होत असलेली आमची वागणूक आम्हांला अन्यायाची वाटत नाहीं, आणि ब्राम्हणांना मात्र आम्हीं नांवं ठेवतों! ब्राम्हणांच्या बाबतींत मी तुझ्याकडे तक्रार केली आणि या गोष्टीची मला आठवण झाली, त्यावेळीं मनाला कसंसंच वाटलं. तूंही ब्राम्हणच आहेस, या तक्रारीमुळं माझ्या बोलण्याचं कदाचित् तुला वाईट वाटेल, असं मला वाटलं नाहीं. पण माझ्या मनाला चिमटा बसला तो त्याचा नव्हे. ब्राम्हण मला वाईट रितीनं वागवतात म्हणून तुझ्याकडे मी तक्रार केली त्यावेळीं मला कुणब्यांची आठवण झाली. त्याचंच मला वाईट वाटलं. ब्राम्हणाविरुद्ध तक्रार करायला मला काय अधिकार, असं वाटून मन थोडंसं शरमलंही—"

ती क्षणभर थांबली आणि पुन्हां बोलूं लागली. "इथल्या बाकीच्या मुलींबरोबर मी मोकळेपणानं वागत नाहीं असं सारीं म्हणतात. तूं येऊन नुसता आठवडासुद्धां लोटला नाहीं तोंच तुझ्याशीं मी इतक्या मोकळ्या मनानं कां बोलूं लागलें, याचंच मला आश्चर्य वाटतं आहे."

माझ्या हृदयांतून आनंदाची उकळी आली. मी बोलूं लागलें त्यावेळीं आवाज अगदीं गुदगुदून आला होता. मला तो विषय फार महत्वाचा वाटला. आजूबाजूला कुणीही नव्हतें तरी मी तोंड तिच्या अगदीं कानाशीं नेलें आणि म्हटलें, "मंजूताई, ती अशीच गंमत आहे! मला हें धार्जणं आहे. आतां तूं बोललीस तेच शब्द दुसऱ्या एका मैत्रिणीच्या तोंडून मी ऐकले आहेत. तीही असंच म्हणाली. ब्राह्मणाच्या जातींत जन्म आल्याचं दुर्भाग्य तिनंही असंच मला पटवून दिलं होतं—" अशी प्रस्तावना करून मी ठकी, यमी, छबी या माझ्या मैत्रिणींची सर्व हकीकत तिला सांगितली. अगदीं विश्वासांत घेण्याच्या स्वरानें मी तिला म्हटलें, "मंजूताई, मी एक बंडखोर मुलगी आहें. चिपळूण–रत्नागिरींत माझी तशी प्रख्याति आहे आणि इथंही माझा कांहींतरी बंड करायचा विचार आहे. आज मी हें बंड पुकारणार."

'एवढीशी कारटी काय बोलते आहे' असें म्हटल्यासारखी मंजुळा हंसली. पण अजून तिला माझा स्वभाव माहीत झाला नव्हता.

त्या रात्रीं आह्मीं सर्व मुली जेवायला बसलों. नित्याप्रमाणें मंजुळेचें पान बाजूला वाढलें होतें. मी माझा पाट उचलला, पानही उचललें आणि मंजुळेच्या शेजारीं जाऊन बसलें.

एका मुलीनें विचारलें, " कां, गोदूताई, मराठ्याची पंगतशी आवडली ? "

मी उत्तर दिलें, " कां आवडूं नये ? मीही मराठीच आहें. "

ती ' आ ' वासून माझ्याकडे पाहातच राहिली. ती ह्मणाली, " मराठीण ? मग तुझं आडनांव गोखले कसं ? "

" माझं आडनांव गोखले आहे, आणि मी मराठीण आहें. " मी अगदीं ठांसरपणानें उत्तर दिलें.

ती क्षणभर माझ्याकडे नुसती टकमक पाहात राहिली आणि ह्मणाली, " गोखले ह्मणजे कोकणस्थ ना ? गोखले मराठे कधीं झाले ? "

मी अगदीं गंभीरपणानें उत्तर दिलें, " महाराष्ट्रांत जन्म घेतला तेव्हांपासून ! महाराष्ट्र आपली मातृभूमि आहे असं ह्मणूं लागले तेव्हांपासून ! मराठी भाषा बोलूं लागले तेव्हांपासून ! मथुताई, मी गोखले आहें खरी, पण कोकणस्थ मात्र नाहीं. "

मथुताईचें तोंड पुन्हां पोस्टाच्या पेटीसारखें उघडलें, " कोकणस्थ नाहीं ? गोखले कोकणस्थ नाहींत ? मग या गोखल्यांची जात तरी कोण ? "

मी गंभीरपणानें उत्तर दिलें, " चितपावन. "

मथु हंसली आणि ह्मणाली, " चितपावन ! "

गौरी हंसली आणि ह्मणाली, " चितपावन ! "

प्रत्येक मुलीनें एकदा ' चितपावन ' ह्या शब्दाचा उच्चार केला आणि हीः हीः करून हंसायला सुरवात केली.

मला आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. बाण अगदीं वर्मी लागला. मला खात्रीपूर्वक वाटलें, कीं आतां चर्चा सुरू होणार.

हंसण्याची उकळी निघून गेल्यावर मथुताईनें विचारलें, " फॉर्म भरून देतांना हीच जात लिहून दिली आहेस का ? "

" पाहा ना जाऊन ! " असें ह्मणून मी एक आमटीचा भुरका मारला.

मंजुळा अगदीं शांतपणें ऐकत होती. झालेला प्रकार तिला आवडला नसावा असें तिच्या मुद्रेवरून दिसून आलें.

वादाच्या अवसानानें मथुताई पुन्हां ह्मणाली, " तुझी जात चितपावन का ? बरं—हे चितपावन मराठे आहेत का ? "

मी तितक्याच गंभीरपणानें म्हटलें, " हो मराठे चित्पावन. "

मथुताई गौरीकडे वळून म्हणाली, " ऐकलंस का गौरी ? हिची जात मराठे चित्पावन,--किंवा चित्पावन मराठे—किंवा मराठे असलेले चित्पावन–किंवा चित्पावन असलेले मराठे !—अशी बुद्धि असावी लागते बरं, गौरी ! उगीच नाहीं पहिला नंबर मिळत ! उगीच नाहीं जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप मिळत ! केवढी ही बुद्धिमत्ता ! पंधरा वर्षांच्या वयांत उगीच नाहीं कॉलेजला पाय लागत ! पंधरा वर्षं वयाचे मुलगे तरी आहेत का कॉलेजांत ? अशी तरवार मारायला मराठे चित्पावनच्या कुळांत जन्म घ्यावा लागतो ! कोकणस्थ असून चालत नाहीं ! "

ह्या भडिमारानें मी चीत होऊन जाईन असा मथुताईचा समज होता, पण असले कितीतरी भडिमार मी पचवले होते, हें तिला माहित नव्हतें.

मी आमटीचा पुन्हां एक भुरका मारून तिला विचारलें, " आणि तुझी जात कुठली मथूताई ? गोगटे म्हणजे चित्पावनच ना ? "

" मी कोकणस्थ आहे बरं का, गोदूताई ! " मोठ्या तोऱ्यानें मथूताईनें उत्तर दिलें.

" असं असं " मी म्हटलें, " तूं कोकणस्थ आहेस. पण साऱ्या जन्मांत कोकण पाहिलं नाहींस. मी कोकणची आहें, असं कबूल करायला तुला लाज वाटते; कारण तुझे वाडवडील कोकणांत होते—त्यांनाही आपण कोकणचे आहों असं म्हणायला लाज वाटते—अशी तूं कोकणस्थ आहेस ! आणि शिवाय तूं चित्पावन नाहींस ! मराठी भाषा बोलतेस तरीही मराठी नाहींस, असंच ना ? "

मथूताई दांतओठ खात होती. " ऐकलंत गोदूताई, कोकणची सरहद्द ओलांडून तुम्हीं नुकत्या कुठें ह्या पुण्यांत आला आहांत, नुकता कुठें परकर जाऊन साडी आली आहे, लुगड्याचे ओचे कसे सावरायचे हें सुद्धां माहीत नाहीं तोंच जीभ इतकी लांब असणं बरं नाहीं, बरं का ! इथला तडाखा अजून तुला माहित नाहीं. जरा नीट जपून वाग आणि असा लहान तोंडीं मोठा घांस घेऊं नकोस. "

" हा पाहा घेतला---पुन्हां घेतला " असें म्हणून मी खरोखरच एक फार मोठा घांस तोंडांत कोंबला आणि म्हटलें, " पाहिलंस, या घांसाचा तर ठसका लागला नाहींच आणि तसल्या घांसाचा ठसका लागायची भीतीही मला वाटत नाहीं. "

शेवटचा दहींभात अर्धांच टाकून मथूताई रागारागानें ताटावरून उठली. माझेंही जेवण झालेंच होतें. मथूताई आंचवत असतांना मी माझें ताट हातीं घेऊन मोरीवर नेऊन ठेवलें असें पाहून ती म्हणाली, "अगदीं पूर्ण मराठीण बनलीस का?"

"आहेंच मुळीं मराठीण—त्यांत आणखी बनायचं तें काय?" असें म्हणून मी आंचवून खोलींत गेलें. मला मोठें समाधान वाटलें. आतां चर्चा सुरू होईल, साऱ्या मुली गदळे घालूं लागतील, ही कल्पना येतांच मला आनंद वाटला. मंजुळा मात्र म्हणाली, "गोदूताई, एकंदरींत हें कांहीं बरं झालं नाहीं. मात्र याचे परिणाम सोसायची मनाची तयारी ठेव."

मी नुसतीं हंसलें आणि पुस्तक उघडून वाचायला आरंभ केला.

## प्रकरण ३ रें

# पुलावरचें राजकारण

चर्चेला सुरवात झाली. मुलींची संख्या फारशी नव्हती, तरीही ही बातमी मुलांच्या कंपूत गेलीच. कॉलेजांत येणाऱ्या कुठल्याही मुलीच्या बाबतींत कांहीं ना कांहीं तरी विचक्षणा करण्याची आवड असलेल्या मुलांना ही बातमी देवाज्ञे-सारखी वाटली.

मी चौदा वर्षे वयाला मॅट्रिकची परिक्षा पास झालें, याची आधींच चर्चा होत होती. बाप सरकारी अधिकारी असल्यामुळें वाशिला लावून मुलीचा नंबर पहिला आणला आणि स्कॉलर्शिप मिळवली, अशी एक भूमका कॉलेजांत पसरलीच होती. माझें वय चौदा वर्षे नसून त्यापेक्षां बरेंच जास्त आहे, आणि दिसण्यांत खुजट असल्याचा फायदा घेऊन वर्षे चोरलीं आहेत, अशीही एक दुसरी भूमका होतीच. त्यांत ही आतां तिसरी जोड मिळाली.

इतक्यांत रत्नागिरीच्या हायस्कुलांतील एक विद्यार्थी येऊन आमच्या कॉले-जांत सामील झाला. वास्तविक तो सुरवातीलाच येणार होता, पण आजारी पडल्यामुळें त्याला यायला वेळ लागला होता. रत्नागिरी जिल्ह्यांतील हायस्कुलांत पास होणारे बहुतेक विद्यार्थी त्यावेळीं मुंबईला वुइल्सन कॉलेजांत जात असत. फर्ग्युसन कॉलेजांत कोंकणच्यापेक्षां दक्षिणेंतीलच विद्यार्थी बहुतेक होते. पण हे जे गृहस्थ रत्नागिरीहून पुण्याला आले ते त्यांचा कुणी नातेवाईक पुण्याला नोकर अस-ल्यामुळें. कोंकणच्या विद्यार्थ्यांचा पहिला प्रश्न दारिद्र्याचा. बुद्धिमत्ता फार तितकेंच दारिद्र्यही जोरांत. कॉलेजांत जाण्याची उत्कंठा फार, पण तितकीच परिस्थिति आड आलेली. मुंबईला कॉलेजांत राहणें पुण्याच्या मानानें जरी थोड्याशा जास्त खर्चाचें असे, तरी मुंबई कोंकणपट्टींतच असल्यामुळें ती त्यांना दूर वाटत नसे.

कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें राहणाऱ्या विद्यार्थ्यांत कोंकणच्या विद्यार्थ्यांची संख्या फारच अल्प असे. जे कुणी कोंकणचे विद्यार्थी येत असत ते बहुतेक खाजगी खोल्या घेऊन कंपू करून राहत असत. जेवणाची व्यवस्था खाणावळींत होत असे. एका डब्यांत दोन माणसांनी जेवायचें आणि एका खोलींत चार माणसांनी राहा-

यचें, अशी योजना असल्यामुळें मुंबईचा खर्च पुण्याच्या कॉलेजच्या खर्चापेक्षांही कोंकणच्या विद्यार्थ्यांना कमी प्रमाणांत पडत असे. म्हणून रत्नागिरीचा विद्यार्थी फर्ग्युसन कॉलेजांत आला, ही देखील कौतुकाची गोष्ट होती.

रत्नागिरीचा हा विद्यार्थी आल्यामुळें कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें मोठी खळबळ उडाली. प्रत्येकजण माझ्याबद्दलच्या हकिकती त्याच्याकडून मिळवण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याच्यातही थोडीशीं कल्पकता होती—तो एक लेखक होता. आजही त्याची लेखक म्हणून प्रख्याति आहे—त्या कल्पकतेच्या जोरावर खऱ्या गोष्टीबरोबरच त्यानें माझ्यासाठीं बनावट हकिकतीही तयार केल्या. माझ्या चरित्राचें महाभारत अशा रितीनें वाढूं लागलें.

पुरुष विद्यार्थी आणि स्त्री विद्यार्थी या दोघांचा घलीमेलीचा संबंध येऊं नये, याबद्दल अध्यापक वर्ग त्यावेळीं जास्त कडक होते. त्या निर्बंधामुळेंच एकमेकांशीं जास्त बोलाचालीचा संबंध आणण्याचा उभयपक्षीं प्रयत्न होत असे. त्याची जागा कॉलेजची टेकडी. या टेकडीवर बहुतेक विद्यार्थिनी फिरायला जायच्या आणि पुलावर बसलेल्या पुरुष विद्यार्थ्यांनी त्यांना पाहून प्रत्यक्ष संभाषणाच्या धर्तीवर स्वगत भाषणें बोलण्याचा प्रयत्न करायचा, असा त्यावेळीं संप्रदाय होता. अजूनही तो मोडला नाहीं असें म्हणतात.

पंक्तीच्या प्रकरणापासून बाकीच्या मुली माझ्याशीं फटकून वागत असत. आणि त्या फटकून राहात असल्यामुळें मंजुळा आणि मी जास्त जिव्हाळ्याच्या मैत्रिणी बनूं लागलों होतों. दोघांच्या वयांत बरेंच अंतर होतें, स्वभावांतही अंतर होतें, परिस्थितींत आणि जातींत तर अंतर होतेंच होतें, पण या सर्व दुराव्यामुळें आम्हीं एकमेकाच्या जवळ जास्त जास्त येत चाललों. विरोधानेंच हा स्नेह वाढला.

केव्हांही टेकडीवर फिरायला जायचें म्हणजे आम्हीं दोघी जोडीनें जात असूं. त्यावेळीं पुलावर बसलेल्या विद्यार्थ्यांच्या सार्वजनिक—स्वगताची भाषा कांहींशीं अशी असेः—

एकानें म्हणावें, “ कायरे, तुझी जात कोण ? ”

दुसऱ्यानें उत्तर द्यावें, “ माझी जात मराठा मराठा ! ”

तर तिसऱ्यानें म्हणावें, “ माझी जात मराठा धेड ! ”

क्वचित् ते असेंही बोलत असत, “ कायरे, ह्या मायलेकी का चालल्या आहेत ? ”

दुसऱ्यानें ह्मणावें, “ अरे, मायलेकी कधीं कॉलेजांत येत असतात का ? ती तिची माहेरवासी बहीण आणि ही तिची सासरवाशीण बहीण आहे. दोघींच्यामधें आणखी आठ भावंडं झालीं होतीं असं ह्मणतात ! ”

रत्नागिरीचा विद्यार्थी—ओळखीसाठीं त्याला आपण नाना असें ह्मणूं—या विद्यार्थ्यांत प्रामुख्यानें असे. मी रत्नागिरीची असल्यामुळें माझ्याबद्दल होणाऱ्या कुटाळ्यांत त्यांचा सदोदित अग्रमान असे. त्यानें ह्मणावें, “ अरे, तुह्मी सारे मूर्ख आहांत ! त्या दोघींची जात अगदीं निराळी आहे. पण आमच्या गोदूआत्त्यांची जात कोण आहे, हें ब्रम्हनाळकर बुवानांसुद्धां सांगतां येणार नाहीं ! त्या तेल्याच्या घरीं जेवल्या आहेत, भंडाऱ्या घरीं पाणी प्यायल्या आहेत, आणि सुरती घेडाच्या हातचा चहा घेऊन पाठारे परभूच्या घरीं वाढल्या आहेत. हें भाग्य कांहीं सर्वांनाच लाभत नाहीं. तरी आमच्या रत्नागिरींत गुजराथी, बंगाली, मद्रासी, पंजाबी नव्हते ह्मणून ! नाहीं तर आमची गोदूआत्त्या ह्मणजे एक ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी व्हायची ! शिवाय, त्या गोखले आहेत, बरं का ! प्रोफेसर गोखल्यांप्रमाणें गणिताचें पुस्तक लिहून अजून जरी त्यांनीं प्रत्येक शाळेंतून प्रवेश केला नाहीं, तरी प्रिन्सिपॉल आगरकरी थाटावर त्यांनीं आगरकरी ध्वजा महाराष्ट्रांत फडकवायची रत्नागिरीच्या वेळेवर, समुद्राला साक्ष ठेऊन, प्रातिज्ञा केली आहे. समुद्राच्या तुफान लाटा वेळेवरच्या वाळूशीं ज्यावेळीं आनंदानें बागडत असत, मावळत्या सूर्याचे कोमल किरण त्या लाटांच्या फवाऱ्यावर आपली कोमल प्रभा झाळीत असत, त्यावेळीं आमच्या गोदुआत्या रत्नागिरीच्या जनसमूहाला शिळोप्याचं व्याख्यान देत असत. सुटलेल्या ऑफिसांतून घरीं जाण्यापूर्वी समुद्राच्या वेळेवरून फेरफटका मारून जाणारा कारकुनांचा समूह त्यांची व्याख्यानं ऐकून नोकरी सोडण्याचा विचार करीत असे. त्यांच्या शब्दांतील आवेशानें हा परीणाम दुसरें दिवशीं ऑफिसांत जाईपर्यंत सुद्धां टिकून राहात असे ! अशा या आमच्या गोदुआत्त्या आतां पुण्याचा उद्धार करण्यासाठीं आल्या आहेत. आगरकर गोखल्यांची पुण्याची परंपरा जोराने वाढवून चिपळूणकर—टिळकांना नामशेष करून टाकण्याचा त्यांनीं विडा उचलला आहे. माझे विद्यार्थी मित्रहो, सुधारक व्हा ! सुधारक व्हा ! नाहींतर गोदुआत्याच्या जिव्हारूपी प्रखर समशेरींत तुमच्या जुन्या संस्कृतीचे तुकडे तुकडे पडतील आणि आर्य संस्कृती हिंदुस्थानांतून हद्दपार होईल.”

केव्हां केव्हां ओझरती निंदा कानावरून जाऊं लागली ह्मणजे तिचा आह्मांला पूर्ण अंदाज येत असे. निंदेची कमान कोणत्या कडोविकडीला जाते हें ऐकण्यासाठीं आह्मीं पुलाच्या दुसऱ्या कडेला केव्हां केव्हां मुद्दाम थवकत असूं. त्यावेळीं नानाच्या अंगांत वारें भरल्यासारखें होई आणि तो मोठमोठ्या काव्यमय भाषेंत माझी वाटेल ती अस्सल आणि नक्कल निंदा आपल्या सहाध्यायांसमोर मांडीत असे.

या गोष्टीचें मला कौतुक वाटे. सहनशीलतेनें आणि कौतुकानें या निंदेकडे पाहून मी बरेच दिवसपर्यंत मनाची करमणूक करून घेण्याचा प्रयत्न केला; पण त्यामुळें नानाच्या जिभेचा ताळतंत्र बेफाम सुटत चालला. त्याच्या कल्पकतेला ऊत येऊं लागला आणि त्या भरांत वाटेल ते बनावट आरोप माझ्यावर लादण्याचा तो प्रयत्न करूं लागला.

मंजुळा मला वारंवार आवरीत असे ह्मणूनच मी स्वस्थ राहिलें होतें. पण सहनशीलतेलाही मर्यादा आहे नुसती कुचाळी होती तोपर्यंत ठीक होतें; पण कुचाळीची मर्यादा सुटून भलभलते घाणेरडे आरोप ज्यावेळीं माझ्यावर लादण्यांत येऊं लागले त्यावेळीं या प्रकाराकडे कौतुकानें पाहाणें मला अशक्य होऊं लागलें.

या मंडळांत एक वऱ्हाडी गृहस्थ होते. वऱ्हाड प्रांतांतील माणसें मनाची फार सीधी. पण हीं चटोर पोरें त्याच्या सीधेपणाचा फायदा घेत असत. मंजुळेच्या भावाचा आणि ह्या वऱ्हाडच्या काकाचा स्नेहसंबंध होता, त्यामुळें मधूनमधून तो तिची चौकशी करीत असे. या गोष्टीचा फायदा घेऊन बाकीच्या विद्यार्थ्यांनीं त्या दोघांच्या नांवाची बदनामी करण्याचा उपक्रम सुरू केला होता. काकाला किंवा मंजुळेला त्याची दाद नव्हती.

माझें मस्तक भणाणण्यास हीही एक गोष्ट कारणीभूत झाली आणि एके दिवशीं मी या गोष्टीचें उट्टें काढण्याचा निश्चय केला.

टेंकडीवरून आह्मीं परत फिरलों त्यावेळीं नित्याप्रमाणें हा कुटाळकंपू पुलावर बसून राहिला होता. आह्मीं दूर अंतरावर येतांना दिसतांच नानानें व्याख्यानाला सुरवात केली, " आपले माजी प्रोफेसर गोखले हे सार्वजनिक कार्य करणारी एक मोठी संस्था स्थापन करण्याच्या खटपटींत आहेत, हें तुम्हां सर्वांना माहीत आहेच. आमच्या गोदूआत्त्या देखील गोखले घराण्यांत जन्माला आल्या आहेत.

ज्याअर्थी त्या त्या घराण्यांत जन्माला आल्या आहेत, त्याअर्थी प्रोफेसर गोखल्या-प्रमाणेंच कांहीं तरी कर्तबगारी करून दाखवणं त्यांना भाग आहे. त्या लवकरच एक 'सबगोलंकार' सोसायटी स्थापन करणार आहेत. अर्थातच, त्याच्या पहिल्या प्रेसिडेंट त्याच होतील. व्हाइस प्रेसिडेंट मंजुळाबाई च्व्हाण आणि वऱ्हाडी वडू काकाभाऊ हीं उभयतां होणार आहेत. मित्रहो, या उभयतां शब्दानं आपण घाबरून जाऊं नका. अजून त्या उभयतांचं लग्न झालं नाहीं खरं; पण कुणी सांगावं, गोदुआत्त्याच्या कृपाछत्राखालीं तसंही होणं कांहीं अशक्य नाहीं! आम्हांला प्रश्न आहे तो हाच, कीं त्या दोघांचं लग्न झालंच तर पुढें गोदूआत्त्यांचं काय? काकाभाऊ देशस्थ ब्राम्हण आहे आणि मंजुळाबाई त्या मराठे क्षत्रिय आहेत. या दोघांचा विवाह झाला तर सुधारणेचं एक महत्वाचं शिखर गांठल्यासारखं होईल. या कामीं आपण पुढाकार घेऊन या दोन वृक्ष-वेलींची शोभणारी जोडी लग्नाच्या पवित्र ग्रंथीनं बांधून टाकली पाहिजे. पण पुन्हां मी हेंच म्हणतों कीं, मग गोदुआत्त्याचं काय?"

माझें मस्तक भणाणलें होतें खरें; पण तें अगदीं शांत ठेवून मी पुढें सरसावलें आणि नानाच्या समोर जाऊन उभी राहिलें. नाना साधारणपणें घाबरलाच. मंजुळा चार पावलें मागें होती. तिचा स्वभाव अगदीं भित्रा होता. मी काय कर-णार याची जर तिला आधीं कल्पना दिली असती तर तिनें मला परभारें हॉस्टेल-मधें नेण्याचा प्रयत्न केला असता.

मी शांतपणानें म्हटलें, "कसं काय नाना, कुणाच्या गोष्टी चालल्या आहेत?"

इतक्या थंडपणानें मी बोलण्यास प्रारंभ करीन, असें नानाला वाटलें नव्हतें.—नव्हे, नुसती मी बोलायला सरसावेन, एवढी सुद्धां त्याला कल्पना नव्हती. माझ्या ह्या अचानक वर्तनानें त्याच्या कल्पकतेला आंचका बसला. त्याची बोबडी वळली. त्याला उत्तर सुचेनासें झालें.

मनाचा हिय्या करून तो कांचरत कांचरत म्हणाला, "कसल्या गोष्टी चालायच्या! चालल्या आहेत आपल्या कॉलेजी गप्पा!"

"अस्सं?" मी म्हटलें, "मंजुळाबाईसंबंधीं काय चाललं होतं? कुणाशीं लग्न जुळवीत होतां तिचं? आणि ही गोदु आत्त्या कोण?"

मानाचें प्रसंगावधान तेवढ्या वेळांत थाऱ्यावर आलें होतें. तो मोठ्यानें हंसून ह्मणाला, " तें होय ? ती एक कॉलेजी गप्प आहे. त्यांत कांहीं विशेष नाहीं. या अशा गप्पा चालायच्याच. त्याच्याकडे कुणी फारसं लक्ष देऊं नये. आणि हें पाहा गोदुताई, तुह्मीं नांवावरून चकूं नका. चिपळूणला माझी एक आत्त्या आहे. तिचं नांव गोदु आत्त्या. तुम्हाला कदाचित् वाटत असेल, कीं मी तुम्हांला गोदु आत्त्या ह्मटलं म्हणून; पण तसा गैरसमजूत करून घेऊं नका. तुम्हांला गोदु आत्त्या म्हणायला माझे डोळे काय फुटले आहेत ? "

तितक्याच शांतपणानें मी म्हटलें, " असं पाहा नाना, माणसाच्या अंगीं थोडा प्रामाणिकपणा असावा. पाठीमागं कुचाळी करण्यापेक्षां कांहीं सांगायचं असलं तर उघड उघड तोंडावर सांगावं. आम्हीं मुली तुह्मां पुरुषांच्या कुचाळ्या करतों का ? नाहीं ना ? मग तुम्हांलाच आमच्या कुचाळ्या कराव्या असं कां वाटतं ? तुमचं सारं भाषण मी इथं उभं राहून ऐकलं आहे. मी ऐकत होतें म्हणूनच तुम्हीं मुद्दाम बोलत होतां. कांहीं बोललं तर तें साफ साफ कबूल करावं—आणि जी गोष्ट साफ साफ कबूल करतां येत नसेल ती कधीं बोलूं नये. गोखल्यांच्या कुळांत माझा जन्म झाला आहे, याचा मला मोठा अभिमान आहे. प्रोफेसर गोखल्यांप्रमाणें आपणही नांव मिळवावं—जगाला कांहींतरी विशेष करून दाखवावं—अशी माझी महत्वाकांक्षा आहे. तुह्मांला माहीतच आहे, कीं ज्या घरांत आम्हां मुलींचं हॉस्टेल आहे, त्या घरांत पूर्वी आगरकर राहात असत. त्या घरांतच त्यांनीं हिंदु लोकांच्या समाज स्थितीचा विचार केला आहे. ते त्यांचे विचार त्या घराच्या हवेंत अजूनही फांकून राहिले आहेत. आगरकरांविषयीं ज्यांना आदर आहे त्यांच्या डोक्यांत ते विचार शिरणारच. त्याला उपाय नाहीं. आगरकरांचं अनुकरण करणं म्हणजे कांहीं पांप नाहीं. फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनं फर्ग्युसन कॉलेजच्या या जनकाबद्दल तरी अनुदार उद्गार काढतां नयेत, असं नाहीं का तुम्हांला वाटत ? "

" खरं आहे, खरं आहे. " नाना म्हणाला, " आगरकरांबद्दल मला पूर्ण आदर आहे. पण तो फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल म्हणून. त्यांची इतर मतं मला बिलकुल पसंत नाहींत. आणि त्यांच्या घरांत जागा मिळण्याचं भाग्य न लागल्यामुळं त्यांचे हवेंतले विचार माझ्या डोक्यांतही शिरले नाहींत."

" दुर्दैव तुमचं. " मी ह्मटलें, " पुरुषाच्या जन्माला आलां—मुलीचा जन्म आला असता तर आगरकरांच्या घरांत राहाण्याचं भाग्य तरी मिळालं असतं!— थोडा प्रामाणिकपणा अंगीं आला असता. चिटवळपणाचं सडेतोडपणांत रूपांतर झालं असतं. नाना, आम्हां मुलींना तुम्हीं कीडामुंगी म्हणून का समजतां? शेंकडों मुलांच्या जोडीनं आम्हीं कॉलेजांत यायचं धाडस केलं आहे, त्या अशा कीडामुंगीसारख्या चिरडल्या जाऊं, असं मुळींच समजूं नका. ज्या दिवशीं आह्मीं कॉलेजांत पाय टाकला त्याच दिवशीं या सर्व गोष्टींचा विचार केला आहे. आह्मीं भित्र्या आहोंत असं तुह्मांला वाटत असेल पण खऱ्या भित्र्या भागूबाई तुह्मीं आहांत. अंगीं कांहीं धीर असता तर उघड उघड तुह्मीं आमच्या तोंडावर बोललां असतां. हा आडून कुचाळ्या करण्याचा भेकडपणा तुम्हां पुरुषांनाच शोभतो. आम्हां मुलींना असल्या भेकड-पणाचा तिटकारा आहे. बोलायचं असेल तर मर्दांसारखे वादविवादाला समोर उभे राहा. तुमच्याशीं दोन हात करायची आमच्यांत पात्रता आहे कीं नाहीं, हें आह्मीं अनुभवानं ठरवून देऊं. मर्दांसारखे मर्द तुह्मीं, पुलावर बसून अशा कुचाळ्या करण्यांत तुह्मांला शरम नाहीं का वाटत? "

माझा भडिमार सुरू झाल्याबरोबर नानाच्या बहुतेक दोस्तांनी आस्ते आस्ते काढता पाय घेतला होता. माझें बोलणें संपतांच नानानें इकडे तिकडे पाहिलें आणि आजूबाजूला कोणीच नाहीं असें दिसून येतांच ह्मटलें, " अरेच्चा! गेले वाटतं सगळे? थांबा हं, ते कुठं गेले ते पाहून येतों. "

नानानेंही पळ काढला.

माझी पाठ थोपटीत मंजुळा ह्मणाली, " कसा ग एवढा धीर केलास? आज दोन वर्षं मी या मेल्यांचा छळ सहन करतें आहे—अगदीं मुकाट्यानं सहन करतें आहें, पण कुणाला उलटून उत्तर द्यावं—उलटून उत्तर दिलं तर हे घाबरून जातील—हें माझ्या ध्यानींमनींसुद्धां आलं नाहीं. किती भेकड पोरं आहेत हीं! आधीं हें कळतं तर मी देखील यांचा समाचार घेतला असता. "

मला अभिमान वाटला होता खरा; पण तिच्या बोलण्यानं तो नाहींसा झाला. मी ह्मटलं, " आधीं कळतं तर अमुक केलं असतं असं ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. उत्तर देऊन कां पाहिलं नाहींस? एकदा प्रयत्न करण्यांत काय बिघडलं

असतं ? 'भित्याच्या पाठीं ब्रह्मराक्षस,' ही ह्मण अगदीं अक्षरशः खरी आहे, असा अनुभव आहे. अनपेक्षित फटका मिळाला कीं कुणीही माणूस एकदम चिरडून जातो. उघड उघड लढाई करण्याची ज्याची ताकद असते तो कधींही आडून गोळ्या मारीत नाहीं. मला याचा चांगला अनुभव आहे. मी असल्या कुचाळ्यांना चांगली ओळखतें. तूं पाहशीलच, कीं यापुढें तो कांहीं दिवस तरी आमच्या वाटेला जाणार नाहीं."

आणि खरोखर तसेंच झालें. बरेच दिवस पुलावरचा अड्डा मोडला. झालेली हकीकत कर्णोपकर्णी प्रिन्सिपॉलसाहेबांनाही कळली आणि त्यांनीं जरी प्रत्यक्ष मला शाबासकी दिली नाहीं, तरी माझी कानउघाडणी करण्याचा प्रयत्नही केला नाहीं.

एकापरीनें मला तें उत्तेजनच वाटलें.

---

# प्रकरण ४ थें

# समर्थाशीं दोन हात

पुलावर जमणारा कंपू त्या दिवसापासून आम्ही येत आहोंत असें दिसून येतांच वितळूं लागला. थट्टा चालत असतच, पण त्या पाठीमागें. समोर बोलण्याची छाती कुणालाच होत नव्हती.

या प्रकरणांत बरीच चर्चा होऊं लागली. विशेषतः मथुनें आमची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला.

जेवणाच्या पंक्तीवरच भाषणें चाललीं होती. मथू म्हणाली, "गोदूताई, तुमचा शहाणपणा आम्हां बायकांपुरता होता तंवर ठीक होता. पण पुरुष विद्यार्थ्यांबरो-बर देखील आतां झगडे सुरू होऊं लागले हें कांहीं चांगलं लक्षण नव्हे. प्रिन्सि-पॉल साहेबांना हें केव्हांही आवडणार नाहीं अशी आमची खात्री होतीच. त्यांनीं उघड उघड तुमची कानउघाडणी केली नाहीं, हा त्यांचा मोठेपणा! पण एवढ्या-वरून हुरळून जाऊन चालायचं नाहीं. त्यांना असलं हें कांहीं मुळींच आवडत नाहीं. ते अगदीं जुन्या मताचे आहेत. आगरकरांच्या खुर्चीवर ते बसले अस-तील, पण बसायच्या पूर्वी ती खुर्ची त्यांनीं चांगली पंचगव्यानं धुवून काढली आहे. मला अगदीं खात्रीलायक कळलं आहे, कीं ही हकीकत ऐकतांच ते भयंकर संतापले, पण तुमच्या वयाकडे पाहून त्यांनीं गय केली —"

"कुणी सांगितलं हें तुम्हांला?" मी मधेंच विचारलें.

मथुताई थोडीशी बावरली, पण उसन्या अवसानानें म्हणाली, "कुणी का असेना—मी सांगतें हें अक्षरशः खरं आहे. कुणी सांगितलं त्याचं नांव जर मी उघड केलं तर त्याचा विश्वासघात केल्यासारखं होईल."

मी शक्य तितका पोक्तपणाचा आव आणून म्हटलें, "त्यांत कसला विश्वास-घात? गोष्ट खरीच असेल तर सांगायची कसली चोरी? प्रिन्सिपॉल साहेब संतापले असले तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण कुणावर संतापले तें तुमच्या बातमी-दारानं सांगितलं का? ते माझ्यावर संतापले कीं नानावर संतापले?"

मथुताई म्हणाली, "नानावर कशाला संतापतील! नानानं कांहीं कुणाचा अप-मान केला नाहीं."

" नानानं काय केलं तें त्यांना कळलं का ? " मी म्हटलें, " अपराध नानाचा आहे कीं माझा आहे, याची त्यानीं चौकशी केली असती तर खऱ्या खोट्याची शहानिशा झाली असती. तुमची बातमी खरी असो किंवा खोटी असो, मी उद्यां सरळ सरळ त्यांना जाऊन विचारतें."

मथुताई थोडीशी घाबरल्यासारखी दिसली. यांत कांहीं तरी बनावटपणाचा अंश आहे असा त्याचमुळें मला संशय आला. या असल्या बनावट गोष्टी मुळांतच खुडून काढलेल्या बऱ्या असें मला वाटलें.

माझा हा विचार मंजुळेला आवडला नाहीं. खोलींत आम्ही दोघी एकट्याच होतों, त्यावेळीं मंजुळा म्हणाली, " कोळसा उगाळावा तेवढा काळाच होणार. कशाला उगीच घासाघीस घालतेस ? मथुताईची बातमीही कदाचित् बनावट असेल. पण तिकडे कानाडोळा करणं बरं. प्रिन्सिपॉल साहेबांना हा प्रकार खरो-खरच आवडला नसेल, असं मलाही वाटतं. "

मी म्हटलें, " नसेलही—मलाही तसंच वाटतं. पण एकच बाजू त्यांच्या कानावर गेली असेल. त्यांच्याकडे जर कोणी चहाडी केली असेल तर ती पुरुष विद्यार्थ्यानींच ! आपण काय अपराध केला तो न सांगतां बेमूर्वतपणाचं माप त्यांनीं माझ्या पदरांत बांधलं असेल म्हणूनच एकदां रुजवात झालेली बरी. या गोष्टी लहान वाटतात खऱ्या, पण वेळीं उपाय केला नाहीं तर सहज कांट्याचा नायटा होईल. "

" काय वाटेल तें कर. पण माझं नांव मात्र त्यांत गुंतवूं नकोस. " मंजुळा थोडीशी तिरसटपणानें म्हणाली.

मी हंसत उत्तर दिलें, " तसं कसं होईल ? आम्हां दोघींमुळेंच या भेकड पोरांनीं या कुचाळ्या आरंभिल्या आहेत. खरं पाहिलं तर माझ्या बाबतींत फारसा जोराचा आरोप नाहीं. माझ्यावर जर कांहीं आरोप येत असेल तर तो बेमुर्वत-पणाचा. तुझ्या बाबतींत मात्र तसं नाहीं. वऱ्हाडच्या काकाच्या नांवाशीं तुझा भलता संबंध जोडूं पाहताहेत, याची तुला आठवण आहे का ? या कुचाळ्या अशाच चालू राहिल्या तर एक तुझ्या अब्रूला काळिमा तरी लागेल किंवा तुला काकाशीं भाषण वर्ज्य तरी करावं लागेल. "

एक दीर्घ निश्वास टाकून मंजुळा म्हणाली, "हल्लीं मी तसंच केलं आहे. कशाला उगाच कुणाला कारण द्या? बोलल्यावांचून कांहीं अडत नाहीं, मग बोला तरी कशाला? दादाचं कांहीं पत्र आलं तर परभारें काकांकडे पाठवून देईन—"

"त्याच्यावरूनही हे लोक धागेदोरे जुळवूं लागतील!" मी म्हटलें, "या भेकडांना भिऊन चालायचं नाहीं. शालजोडीतले सुद्धां नव्हेत—चांगले उघड उघड जोडे दिले म्हणजे मुकाट गप्प राहातील. साऱ्याच गोष्टी मी प्रिन्सिपॉल साहेबांना सांगणार आहे. त्यांना एकदां चांगली चौकशी करूं दे म्हणजे खरं खोटं आपोआप कसाला लागेल."

"जसं तुला वाटेल तसं कर!" असें बोलून मंजुळा स्वस्थ राहिली.

दुसऱ्या दिवशीं मी प्रिन्सिपॉलसाहेबांपाशीं जाऊन उभी राहिलें. माझ्या येण्यामुळें ते थोडेसे आश्चर्यचकित झाल्यासारखे दिसले. यापूर्वी कुठल्याही मुलीनें त्यांच्याकडे कसलीच तक्रार नेली नव्हती. मी आलेली पाहतांच अर्थातच त्यांना आश्चर्य वाटलें.

झालेली सर्व हकीकत मी त्यांना जशीच्या तशी सांगितली. कांहीं सुद्धां चोरून ठेवलें नाहीं. मथूताईनें सांगितलेली बातमी देखील मी त्यांना सांगितली, त्यावेळीं ते म्हणाले, "हें साफ साफ खोटं आहे. मला हा प्रकार कळला होता. पण तो ज्या व्यक्तीकडून कळला त्या व्यक्तीवर माझा फारसा भरंवसा नाहीं. असल्या विषयांची फारशी वाच्यता करूं नये असंच मला वाटतं. तुमचीं भांडणं तुम्हींच भांडा. तीं माझ्यापर्यंत येऊं नयेत हेंच बरं. पण झाला हा प्रकार बरा झाला नाहीं, असंच एकंदरींत मला वाटतं."

मी ठांसून विचारलें, "कोणता प्रकार आपल्याला आवडला नाहीं? मुलें बायकांची कुचाळी करतात तो कीं स्वसंरक्षणार्थ मी त्यांची कानउघाडणी केली तो?"

"दोन्हीही!" प्रिन्सिपॉलसाहेब म्हणाले, "दोन्हीही गोष्टी मला आवडल्या नाहींत."

मी शांतपणानें विचारलें, "दोन्हीही गोष्टी आपल्याला आवडल्या नाहींत हें आपल्यापरीनं खरं आहे. पण आमची काय वाट? पुरुष विद्यार्थी आमच्या कुचाळ्या करण्यांत दिवसेंदिवस जास्त जास्त सरसावत आहेत. ती एक त्यांची

शिळोप्याची करमणूक होऊन बसली आहे. पण त्यामुळं आमची अब्रू बद्दु होते त्याची काय वाट ? मंजुळेच्या भावाचा आणि काकाचा लहानपणापासूनचा स्नेह आहे—दोन्ही घरण्यांचाच आहे ह्मणाना—त्यांनी एकमेकांशीं बोलूं सुद्धां नये का ? नुसतीं मुलं कुचाळी करतात एवढ्यासाठीं घराण्याचे हे लागेबांधे तोडून टाकायचे का ? काय बिघडलं त्यांत ? पुरुष पुरुष नाहीं का आपसांत एकमेकांशीं बोलत ? मग बायकाच बोलल्या तर यांच्या नजरेला त्यांत पाप कां दिसतं ? पुरुषांची संख्या फार मोठी आहे—त्या मानानें आह्मी विद्यार्थिनी अगदींच थोड्या आहोंत—या गोष्टीचा फायदा घेऊन त्यांनी आमच्यावर वाटेल ते आरोप करावे का ? असल्या तक्रारी आपल्याकडे येऊं नयेत असं आपण ह्मणतां. कॉलेजच्या या आवारांत आपण आह्मांला आईबापांच्या जागीं आहांत. आपल्याकडे तक्रार आणायची नाहीं तर न्यायची तरी कुणीकडे ? आपण कानांवर हात ठेवले तर आमचा छळ नाहीं का वाढत जाणार ? पुरुषांना अब्रूची चाड नसते, पण अब्रूची चाड सोडून आम्हां मुलींचं चालणार नाहीं. मंजुळेवर या लोकांनीं वाटेल ते आरोप करावे, भिंतीवरून अचकट विचकट लिहून ठेवावं आणि आह्मी तें मुकाट्यानं सहन करावं ! कां ह्मणून ? आह्मी मुली ह्मणून ? आमची संख्या कमी आहे ह्मणून ? आपण या गोष्टींची दाद घेतली नाहीं तर आमची दाद कोण लावणार ? आपण दाद घेत नसाल तर आह्मी मुली अधिकार आमच्या हातीं घेऊं आणि या पोरांना वाटेल ती शिक्षा करूं. मग मात्र आपण आह्माला दोष देऊं नये."

प्रिन्सिपॉल साहेब क्षणभर माझ्याकडे टक लाऊन पाहात राहिले. मला चीड आली होती खरी—पण ती मुद्रेवर दिसूं न देण्याचा मी प्रयत्न करीत होतें. माझ्या स्वभावाला अनुसरून तो प्रयत्न मला साधला नाहीं. बोलतां बोलतां माझा स्वर चढत गेला. मी प्रिन्सिपॉल साहेबांशीं बोलत आहें ह्याची क्षणभर मला विस्मृती झाली.

तशीच टक लावून पहात त्यांनीं मला विचारलें, " मुली तुझं वय काय ? " मी माझें वय सांगतांच ते ह्मणाले, " पंधराच ? तुझा नंबर पहिला आला होता नव्हे का ? तूं जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर आहेस, नव्हे ? मुली, मला वाटतं हा यशाचा कैफ तुला पचवतां आला नाहीं. तुला अभिमान झाला आहे. एवढ्या लहान वयांत साऱ्या मुंबई युनिव्हर्सिटींत पहिला नंबर आल्यामुळं तुला 'ग' झाला आहे. त्यामुळंच असले विचार तुझ्या डोक्यांत येतात—"

मी सवेंच ह्मटलें, “ थांबा, मला क्षमा करा. मला अभिमान झाला असेल तर त्यांत कांहींच वावगं नाहीं. पहिला नंबर मिळविण्यासाठीं मी वशिला लावला नाहीं किंवा लांचही दिला नाहीं. अभ्यास करण्याच्या बाबतींत मी जिवापाड परिश्रम केले आहेत. माझ्या रत्नागिरीच्या शिक्षकांनीं माझ्या अभ्यासावर स्वतंत्र रीतीनें चांगलीच मेहनत घेतली आहे. त्यामुळंच मी स्कॉलर्शिप मिळविली. कां मला अभिमान होऊं नये ? पण त्या अभिमानापायीं मी ही तक्रार आणिली नाहीं. मी वयानं लहान आहें याची मला जाणीव आहे–पण मी मनानं मात्र अज्ञान नाहीं. चांगल्या सज्ञान माणसापेक्षांही माझं मन वळकट आहे. कॉलेजांतल्या पुरुष विद्यार्थ्यांचा हा धुमाकूळ सारखाच चालू आहे. मुली तो सहन करतात ह्मणून दिवसेंदिवस मुलगे शेफारून जाऊं लागले आहेत. परवां कुणी त्यांना उत्तर दिलं नव्हतं–मी दिलं–अगदीं अनपेक्षित रितीनं दिलं–त्याचा त्यांना धक्का बसला. एवढीशी चिमुरडी पोर ! ही आह्मां तुह्मांला उत्तरं देते !–असें वाटून त्यांना चिरड आली. आपण या गोष्टीची चौकशी केली पाहिजे होती––आह्मां मुलींची संख्या अगदींच कमी आहे हें ध्यानांत घेऊन तरी आपण चौकशी केली पाहिजे होती. पण तशी ती केली नाहीं–आणि वर मला अभिमान झाला ह्मणतां ? क्षमा करा––हा अभिमान नाहीं––ही चिरड आहे. आपण आमच्या जागीं आहांत अशी एक क्षणभर कल्पना करा आणि मग मला अभिमान झाला असं वाटेल तर खुशाल ह्मणा. आपण वडील आहांत. या परक्या जागीं आपण आह्मांला आईबापांच्या जागीं आहांत–ह्मणून स्वस्थ रहावं लागतं. तसं नसतं तर आपणही याच पुरुषांच्या जातीचे–ह्मणूनच पुरुषजातीची तरफदारी करणारे–असा उघड उघड दोषारोप करावा असं मला वाटलं असतं. ”

मी कितीही आळा घातला तरी उद्वेगाच्या भरांत माझ्या वाणीचा तिखटपणा वाढत होता. मी कुणबी असतें तर सडकून त्यांना चार शिव्या हाणल्या असत्या. वडील माणूस ह्मणूनसुद्धां गय केली नसती. एका मुलीचा पहिला नंबर आला याचा प्रिन्सिपॉल साहेबांनासुद्धां मत्सर वाटावा ना ?

पुढें कांहींच न बोलतां तडक निघून जावें असेंसुद्धां क्षणभर माझ्या मनांत आलें. पण तसें केलें असतें तर माझ्या पदरीं भ्याडपणा आला असता, ह्मणून मी तोंड

मोकळें सोडलें. इतकें टाकून बोलण्याचा परिणाम कदाचित् वाईट होईल, अशी निसटती भीतिही माझ्या नजरेसमोरून निघून गेली.

पण फ्ड खाणें मला अशक्य होतें. निष्कारण मी काय ह्मणून नमतें घेऊं? अपराध असता तर मी शंभर लोटांगणें घातलीं असतीं. तशावेळीं माझा अभिमान मुळींच आड आला नसता.

पण प्रिन्सिपॉल साहेबांनीं माझा अभिमान काढला, याची मला चीड आली. चौदा वर्षांची मुलगी मॅट्रीकच्या परिक्षेंत पहिली आली—जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर झाली—याचा विषाद या एवढ्या मोठ्या माणसाच्या मनांत कुठं तरी डांचत होता, याचेंच मला दुःख झालें.

" ठीक, ठीक, मी या प्रकाराचं लवकरच निराकरण करीन " असें आश्वासन देऊन प्रिन्सिपॉल साहेबांनीं मला निरोप दिला.

झालेली हकिकत मी मंजुळेला सांगितली. कांहींसुद्धां चोरून ठेवलें नाहीं. ती म्हणाली, " एवढा धीर तुला कसा झाला, याचंच मला आश्चर्य वाटतं. एवढीशीं तूं, पण अशी तडातड उत्तरं द्यायला तुझी जीभ वाहिली तरी कशी? प्रिन्सिपॉलसाहेबांचा स्वभाव सहनशील आहे म्हणून निभावलं. तसाच कुणी माथेफिरू प्रिन्सिपॉल असता तर त्यानं काय केलं असतं कोण जाणे! बाई ग, आपण बायका आहोंत. बायकांच्या जातीला सडेतोडपणा शोभत नाहीं—"

" कां शोभत नाहीं? " मी चिडून ओरडलें, " असं ' शोभत नाहीं, शोभत नाहीं ' म्हणूनच आम्हीं अशा चिरडल्या जातों आहोंत. आम्हीं दुबळ्या आहोंत, असा समज आम्हीं मनाशीं खिळवून टाकिला आहे. आम्हीं दुबळ्या आहोंत असं आम्हालाच जर वाटूं लागलं—आम्हीं दुबळ्या आहोंत असं आम्हींच जर ओरडून ओरडून सांगूं लागलों, तर पुरुषांनीं तरी आम्हांला कां तुडवूं नये? चुकतं आहे तें इथंच! आम्हांला त्रास होत असला तर त्याला आमच्या आम्हींच जबाबदार आहोंत. आम्हीं दुबळ्या आहोंत, असं एकदां आम्हीं कबूल केलं कीं भेकड पुरुषांना आपण बलवानू आहोंत असं वाटूं लागतं. मग ते आमचा छळ करूं लागतात—बदनामी करूं लागतात. आम्हीं दुबळ्या आहोंत, असा आमचा समज असल्यामुळें आम्हीं तो छळ आणि ती बदनामी मुकाट्यानं चालवूं देतों. त्यामुळं होतं काय—कीं आमचा जन्माचा सत्यानाश आणि त्यांचा जन्माचा वरचष्मा.

वान्हाळाच जिथं आमची खात्री नाहीं, तिथं दुसऱ्यानीं केलेल्या छळाबद्दल रडा-यचं तरी कुणापुढं ?"

मंजुळा स्तब्ध राहिली. तिनें पुढें उत्तर दिलं नाहीं. पण मी थोडीच स्वस्थ बसणार होतें ?

मी म्हटलें, "मंजुताई, आतां स्वस्थ कां राहिलीस ? स्वस्थ राहून कसं चाल-णार ? हे लोक आज तुझ्या नांवाचा संबंध काकाच्या नांवाशीं जोडताहेत ! यांत त्यांचं नुकसान होणार नाहींच पण काकाचंही कांहीं नुकसान होणार नाहीं. तो पुरुष आहे. वेळीं प्रसंगीं त्याची बदनामी झाली तरी त्याचं यत्किंचितही वाकडं होणार नाहीं. रडावं लागणार तुलाच ! तुझी बदनामी झाली–तुझ्यावरचे आरोप ठाम ठरत गेले–तर तुझ्या जन्माचा सत्यानाश होईल, याची तुला आहे का चाड ?"

"जाऊं देत, या गोष्टीच नको आतां !" असें म्हणून मंजुळा पुस्तक उघ-डून अभ्यास करीत बसली.

माझी खात्री झाली, कीं बायकांच्या जातीच्या नाशाला बायकाच कारणीभूत आहेत.

दुसऱ्या दिवशीं बोर्डावर नोटीस लागली. प्रिन्सिपॉल साहेबांनीं त्यांत पुरुष विद्यार्थ्यांची चांगलीच हजेरी घेतली होती.

त्या दिवसापासून आमची उघड उघड कुचाळकी करणारा कंपू बराच थंडावला. ज्वालामुखी आंतून धुमसत होता खरा, पण त्याला तोंड फुटायला संधी नव्हती.

सुट्टी पडली आणि मी रत्नागिरीला गेलें. दादाही सुट्टींत घरीं आला होता. पुण्याच्या विद्यार्थ्यांनीं माझी हकीकत त्याच्या कानापर्यंत पोंचवली होती. आधींच तो माझें उणें पहाण्यासाठीं टपून बसलेला–त्यांत एवढें कोलीत हातांत सांपडतांच आग चेतवण्याची बुद्धी त्याला कां न व्हावी ? मी येण्यापूर्वींच आई–बाबांसमोर त्यानें माझ्या किर्तीचा डांगोरा पिटला होता.

नित्याच्या संवयीप्रमाणें बाबांनीं ती गोष्ट फारशी मनावर घेतली नाहीं. आईच्या मनाला मात्र ती गोष्ट फार लागून राहिली.

मी आल्यावरोबर तिचा पहिला प्रश्न तोच होता. झालेली सर्व हकीकत मी तिला सांगितली. कॉलेजच्या वातावरणाचें समग्र विवरण केलें. पुरुष विद्यार्थ्यांच्या

चटोरपणाचीं इत्थंभूत कारस्थानें तिला स्पष्ट करून सांगितलीं. प्रिन्सिपॉल साहेबांनीं बोर्डावर लाविलेल्या नोटीशीची नक्कल मी बरोबर आणली होती, तिचें शब्दशः भाषांतरही मी तिला सांगितलें. त्यावेळीं तिची खात्री झाली.

आधींपासून माझ्यावर तिचा विश्वास होताच, पण माझ्याबद्दलच्या बातम्या दादानें अशा कांहीं तिखटमीठ लावून सांगितल्या होत्या, कीं त्यामुळें तिलाही शंका आल्यावाचून राहिली नाहीं.

शंकेचें समाधान होतांच तिला दादाचाच राग आला. ती म्हणाली, "त्याला सुद्धां तुझा मत्सर झाला आहे. तूं त्याच्यापेक्षां लहान कीं नाहीं? एवढ्या लहान वयांत तूं पास झालीस—पहिली आलीस आणि कॉलेजांत गेलीस—हें त्याला तरी कसं सहन व्हावं? बहिणीचा अभिमान वाटण्यापेक्षां पुरुषजातीचा अभिमान जास्त बळावला. झालं तें एकापरीनं ठीकच झालं; पण तिथली परिस्थिती कशी काय आहे याचा तुझ्या सांगण्यावरून मला अचूक अंदाज करतां येत नाहीं. एकंदरींत तिथलं वातावरण कांहीं तरी वेगळंच आहे, एवढं मात्र मला पटलं. तिथं कसं वागावं हें सांगायचा मला अधिकार नाहीं. तूं लहान असलीस तरी आतां सज्ञान झाली आहेस. आतां तुझं तूंच पहा. यापुढं माझ्यावर विसंबून चालायचं नाहीं. उपदेश करायची माझी मर्यादा संपली. आतां यापुढं तूं नुसता मला रिपोर्ट द्यायचा—आणि मी तो ऐकून घ्यायचा—आणि म्हणायचं होतं तसा फायलीला लावायचा, एवढंच माझं काम!"

आईच्या भाषणानें माझें समाधान झालें नाहीं. आईनें मला पूर्वीप्रमाणेंच चार शब्द सांगावे अशी फार आशा वाटत होती. पण पड खाऊन तिनें मला निराश केलें. कॉलेजांत गेल्यामुळें मी मोठी झालें—सज्ञान झालें—असें तिलासुद्धां वाटूं लागलें, याचा माझ्या मनाला चटका लागला.

---

## प्रकरण ५ वें.

# सिंहावलोकन

दुसऱ्याच दिवशीं संध्याकाळीं मी डॉक्टरसाहेबांच्या बंगल्यावर गेलें. मी गेलें त्यावेळीं डॉक्टर घरीं नव्हते. लिमये बुवा बाहेरच्या व्हरांड्यावर चंची उघडून तंबाखूचा बार भरीत होते. मला पाहतांच आपल्या सुटलेल्या लांब शेंडीला गांठ मारीत तोंडांतील तंबाकूच्या बोळयानें बोबड्या झालेल्या आवाजानें ते ह्मणाले, "यावं विदुषी, कशी काय झाली पुण्याची सफर? काय ह्मणतं तुमचं कॉलेज?"

मी हंसत हंसत उत्तर दिलें, "मला बसूं तरी द्याल कीं नाहीं? आणि मी विदुषी केव्हां झालें? इथनं गेलें तेव्हांच्या आणि आतांच्या माझ्यांत असा काय फरक पडला?"

गंभीरपणाचा आव आणून बुवा ह्मणाले, "का बरं? फरक पडलाच. नुसतं मॅट्रिक झाल्यानं पहिला नंबर आला तरी माणूस कांहीं मोठं होत नाहीं. पण कॉलेजला पाय लागला कीं माणसाची कळा एकदम बदलते. आत्मविश्वास वाढूं लागला कीं चेहेऱ्यावर त्याचं तेज फाकतं. कॉलेजांत गेल्याबरोबर आत्मविश्वास झट्कन् वाढतोच कीं नाहीं? सहा महिन्याच्या आंत माणसाला आपण मोठे झालों असं वाटूं लागतं. तीच कळा तुझ्या तोंडावर दिसते."

मी क्षणभर मनाशीं विचार केला. मलासुद्धां वाटलें, कीं माझ्यांत कांहीं फरक झाला होता. तसा फरक झाल्यासारखें मला जाणवूं लागलें होतें. मी उत्तर दिलें, "असेल, तसं अगदींच अशक्य नाहीं. एखाद्या गांवच्या हवेंत जशी माणसाची शरीरप्रकृति बदलते, तशींच निराळ्या वातावरणांत मनःप्रकृतीही बदलत असेल. उगीच खोटं कशाला बोलूं? तुह्मी ह्मणतां तसं मलाही वाटतं. कॉलेजांत गेल्यापासून मोठेपणा कसा आंगी खेळतो आहे! तिथं मीच काय ती लहान मुलगी आहे. मुलंगे तर बहुतेक सारे भले मोठेच आहेत. मुलीही—मुली कसल्या त्या—चांगल्या कर्त्यासवरत्या बायकाच आहेत. साऱ्या जणी मला 'चिमुरडी, चिमुरडी' ह्मणत असतात—"

बुवा मधेंच ह्मणाले, " मग तिकडे कांहीं भांडणं केलींस कीं नाहीं ? "

" होय तर ! " असें ह्मणून मी पुण्याचा बहुतेक सारा पाढा बुवांपुढें वाचला.

माझें भाषण संपतें न संपतें तोंच साहेब आले. मला पाहतांच पट्टेवाल्याच्या हातीं टोपी देऊन खुर्चीवर बसत बसत ते ह्मणाले, " एकूण तूं पुण्याहून आलीस तर ! काय खबर पुण्याची ? "

बुवानां सांगितलेली सर्व हकिकत मी पुन्हां साहेबांना सांगितली. ती ऐकत असतांना त्यांतील प्रत्येक प्रसंगाचा त्यांच्या मनावर झालेला परिणाम त्यांच्या चेहेऱ्यावर अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसत होता.

माझी हकिकत संपतांच ते ह्मणाले, " असं कांहीं तरी होईल असं मला वाटलंच होतं. तुला मुंबईला पाठवली असती तर एकंदरींत बरं झालं असतं. तुझ्यासारख्या कज्जेदलाल मुलीला पुण्याला पाठवलं हें बरं झालं नाहीं. आगरकरांच्या खुर्चीवर बसले खरे, पण महादेवराव ह्मणजे एक शास्त्रीबुवाच आहेत. तुझ्यासारख्या मुलीला कसं वागवून घ्यावं हें त्यांना कळणं मोठं कठीण आहे. त्यांचं तें ' हिंदुधर्म आणि सुधारणा ' हें पुस्तक वाचलंस का ? त्यावरूनच त्यांचीं मतं कळतात. तसलीं मतं तुला नाहीं पटायचीं. माझी प्रत्यक्ष ओळख नाहीं; पण मला त्यांची माहिती आहे. आगरकरांच्या खुर्चीवर ते कसे बसले याचंच मला आश्चर्य वाटतं. मिशनरी कॉलेजांतले प्रोफेसर पत्करले, पण हे लोक—जाऊं द्या—उगीच गुरूची निंदा विद्यार्थ्यांसमोर करूं नये. पण एकंदरींत तें वातावरण कांहीं ठीक नाहीं. मी गोखल्यांना सांगत होतों, पण काय त्यांना वाटलं कोण जाणे—त्यांनी तुला पुण्यालाच पाठवली. मुलगा मुंबईच्या कॉलेजांत होता, मग मुलीलाच तेवढी पुण्याला कां पाठवली ?—"

इतक्यांत शिबानें हुक्का आणून समोर ठेवला. त्याच्या लांब नळींतून झुरके घेतांना धुराचे फवारे सोडीत ते कांहीं वेळ स्तब्ध राहिले.

क्षणभरानें आठवण झाल्यासारखें करून ते ह्मणाले, " मराठ्याची मुलगी आहे ह्मणतेस ? काय नांव तिचं ? मंजुळा नव्हे का ! आश्चर्य आहे. मला वाटतं, कॉलेजांत जाणारी ही पहिलीच मराठ्याची मुलगी असावी. तिचा छळ होणारच ! मराठ्याची मुलगी कॉलेजांत गेलेली तिथं कुणाला पाहवणार नाहीं. मुंबईच्या कॉले-

जातील मुलंही चहाटळपणा करीत नाहींत असं नाहीं; पण त्यांत विषारीपणा नसतो ! माझा अनुभव तुला कांहींच उपयोगी नाहीं. तुझा अनुभव तूं स्वतःच घेतला पाहिजेस. मन मोठं खंबीर केलं पाहिजे. मला वाटतं, तुला बराच त्रास सहन करावा लागेल. तुझ्या वयाचा मुलगा जरी कॉलेजांत गेला असता, तरी त्याचा छळ झाला असता. एवढ्या लहान वयांत कॉलेजांत जाणारीं मुलं फारच विरळा–त्यांतून तूं मुलगी ! ईश्वरच तुला मार्गदर्शक होवो. मला कांहींच सांगतां येत नाहीं. पण एकंदरींत मला वाटतं, आज ना उद्यां तुला मुंबईला जावं लागेल.”

थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर मी चहा घेऊन साहेबांचा निरोप घेतला. जातांना गाण्याची तालीम पुन्हां सुरू करण्याची आठवण देण्यास साहेब विसरले नाहींत.

घरीं आलें त्यावेळीं माझें मन फार अस्वस्थ झालें होतें. आईनें निराशा केली, पण साहेबांच्याकडे तीच पाळी येईल, असें मला वाटलें नव्हतें. मला जाणवूं लागलें, कीं कॉलेजांत गेल्यामुळें मी एकदम लहानाची मोठी झालें. पूर्वी प्रत्येक-जण परोपरीनें मला उपदेश करीत असे, पण मी कॉलेजांत जातांच मला चार चांगल्या मार्गाच्या गोष्टी सांगायला कुणीच धजावेना. बाबीशेट तर बोलून चालून रत्नागिरींतले—ते कांहीं कॉलेजांत गेले नव्हते. किंवा त्यांना कॉलेजची माहितीही नव्हती.

बाबीशेटना कॉलेजांतल्या हकिगती सांगितल्या, त्यावेळीं ते ह्मणाले, “ हें पहा गोदे, मला हें सारंच अपूर्व वाटतं. पोरी कॉलेजांत जातात हें ऐकूनच माझ्या आंगावर कांटा उभा राहातो. मोठ्या भानगडी दिसतात तिथं. अगदीं डोळ्यांत तेल घालून तिथं वागलं पाहिजे, असं वाटतं. कॉलेजांत जायचं ह्मणजे अभ्यास करून नुसत्या परीक्षा द्यायच्या एवढंच मला वाटत असे. पण या तिथल्या बोर्डिंगामुळं तिथं बऱ्याच भानगडी उपस्थित होत असाव्यात असं वाटतं. तुझी तूं समर्थ आहेस ह्मणा. पण एकंदरींत प्रसंग मोठा कठीण दिसतो. संभाळून वाग बरं कार्टे, संभाळून वाग !”

बनी रत्नागिरींतच होती. कॉलेजांतल्या या भानगडी मी तिला सांगितल्याच नाहींत. ती आपल्याच दुःखांत चूर होती. तिच्या सावत्र आईनें तिच्या ताईचा छळ चालवला होता. गोडबोले त्या गोष्टीची कदरच करीत नसत. त्यांचा पूर्वीचा

जमदग्नीचा अवतार एकाएकीं नाहींसा झाला होता. बायकोनें तोंडांतून एक शब्द काढतांच ते एकदम नांगी टाकीत असत. त्यामुळें बिचाऱ्या ताईला कुणीच वाली नाहींसा झाला होता.

तिनें याबद्दल माझ्याजवळ मुळींच तक्रार केली नाहीं. उलट, बनी मला तिची हकिगत सांगू लागली, तेव्हां ती तिलाच दाबूं लागली. ती ह्मणाली, " उगीच कशाला कुणाला दोष द्या ? अदृष्टांत जसं असतं तसंच होतं. पूर्वजन्मीं काय पातकं केलीं, तीं या जन्मीं भोगतें आहे, असं समजून देवावर भार टाकून राहाण्यासारखं सुख नाहीं.– "

बोलत असतांना ती मधेंच थांबली आणि विषय बदलण्याच्या उद्देशानें मला कॉलेजांतल्या हकिगती विचारूं लागली.

तिच्याकडे मी कांहीं चोरून ठेवलें नाहीं. मंजुळेची हकिगत ऐकतांना तिच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. एक दीर्घ निश्वास सोडून ती ह्मणाली, " ती तुझी मंजुळा मोठी हळवी दिसते. तिला ह्मणावं, असं हळवं होऊन चालायचं नाहीं. मन अगदीं घट्ट केलं पाहिजे. पूर्वी मला वाटत असे, कीं या पोरींना कशाला शाळेला पाठवतात ? पण आतां तसं वाटत नाहीं. हल्लीं चालत असलेले हे आमच्या घरचे एकंदर प्रकार पाहिले ह्मणजे वाटतं, कीं मुलांना शाळेंत न पाठवले तरी चालेल, पण मुलींना आधीं विद्वान् केलं पाहिजे. माझ्याकडेसच पहा–धड सासर नाहीं आणि असून माहेरही नाहीं. हीच आज जर मी एकादी परिक्षा दिलेली असतें, तर कुठं तरी मास्तरणीबिस्तरणीची नोकरी पत्करून काळ कंठला असता. हें असलं धर्माचं अन्न खात जीव धरून राहण्यापेक्षां मरण आलेलं बरं, असं वाटूं लागतं. गोदूताई, तूं चांगल्या परीक्षा दे–चांगली मोठी हो–चांगला नांवलौकिक मिळीव आणि मग माझ्यासारख्या गरीब गाईंच्याकडे नजर टाकायला सुरवात कर. "

बोलत असतांना ती रडली नाहीं खरी, पण तिच्या प्रत्येक शब्दांत तिळतिळ तुटणारा जीव दिसत होता. अंतःकरण पिळवटून निघणारे ते थोडेच शब्द ऐकून माझ्या डोळ्यांना पाणी आलें.

पदरानें माझीं आसवें पुशीत ती हंसतमुखानें म्हणाली, " तूं रडतेस गोदूताई ? एवढी खंबीर तूं–मोठमोठ्या साहेबांसमोर देखील घडाघडा बोलतेस, ती

माझ्या दोन शब्दांसाठीं अशीं टिपं टाकतेस? बाई ग, हें असंच चालायचं! कुणी चौकशी करायचं नाहीं आमची! सारीं पुढंच चालत असतात. मागं काय चाललं आहे तें कुणीच पहात नाहीं. तूं तशी नाहींस म्हणा–पण तुझ्या जागीं दुसरी कुणी असती, अशी परीक्षा देऊन मोठी झाली असती, तर माझ्यासारखीची तिला आठवणसुद्धां झाली नसती. तूं तशी नाहींस म्हणूनच पुण्याहून आल्याबरोबर आम्हांला भेटायला आलीस. अशीच बुद्धि ठेव. आमच्यासारख्यांची आठवण ठेव!–"

आतां मात्र ताईच्या डोळ्यांना पाणी आलें.

बनी कांहींच बोलत नव्हती. ताई गहिंवरलेली पाहून तिच्याही डोळ्यांना टचकन् पाणी आलें. मला वाटलें, ताईप्रमाणेंच बनीलाही वाटत असेल का? मी सहज कयास काढण्यासाठीं तिला विचारलें, "का, बने, बोलत कां नाहींस? तुलादेखील ताईसारखंच वाटतं का?"

एक मोठा सुस्कारा टाकून बनी ह्मणाली, "काय वाटतं तें कसं सांगूं? माझ्या सासरची हकीगत मी तुला सांगितली आहे ना? वाटलं मला पण त्याचा उपयोग काय होणार? आतां यानंतर का मला कुणी शाळेंत घालणार आहे? बोलण्याची सुद्धां जिथं चोरी—पुस्तक उचललेलं जिथं पहावत नाहीं–तिथं लग्न झालेल्या मुलीला शाळेंत कोण घालणार? तुझ्याकडे पाहिलं ह्मणजे काय वाटतं तें सांगतां येत नाहीं. सासरीं–माहेरीं जाण्यायेण्याची हौस असते खरी, पण तूंही कॉलेजांत जाण्यासाठीं पुण्याला गेलीस—पुण्याहून आलीस–हें पाहिलं, कीं असा तुझा राग येतो—पण तें न बोललेलंच बरं! भाग्यानं मुलीला चांगला नवरा मिळतो असं म्हणतात; पण त्यापेक्षां चांगले आईबाप मिळायचं भाग्य जास्त मोठं वाटतं. अंगावर चार दागिने नसले तरी चालेल, पण असं वाटतं, कीं चार परीक्षा द्याव्या. तूंही पास झालीस, पहिली आलीस, स्कॉलर्शिप मिळवलीस, सर्वांनीं तुझी स्तुती केली,—सर्वांच्या बरोबर मी सुद्धां तुझी स्तुति केली, पण खरं सांगायचं ह्मणजे अंतरांत कांहीं मला तसं वाटत नव्हतं. आम्हीं अशा ह्या लग्न होऊन दुसऱ्या घरीं गेलों आणि तूं मात्र तेवढी कॉलेजांत गेलीस, याचा कसा अगदीं जळजळून मत्सर वाटला!—"

ताई ह्मणाली, "तुला कॉलेजांत पाठवण्याजोगी बाबांची स्थिति का आहे?"

अगदीं चिरडीला येऊन बनी म्हणाली, " कॉलेज राहूं दे, चार–दोन वर्षं शाळेंत तरी राहूं द्यायचं होतं ! नुसती मुलकी परिक्षा दिली असती तरीदेखील पुरेसं झालं असतं. मराठी शाळेंत मास्तरणीची नोकरी तरी मिळाली असती. तेवढादेखील टिका लागूं दिला नाहीं. मेली ही लग्नाची घाई मागं होती ना ! लग्न झालं—काय विशेष झालं यांत ? कांहीं सुख लागलं का मला ? पण तुम्हां वडील माणसांचा जीव खालीं पडला. ' बनीचं एकदाचं लग्न झालं ' म्हणून मोर नाचूं लागलांत. पण लग्न झालेल्या ताईचं काय झालं याची होती का आठवण आमच्या बाबांना ?—"

मी मधेंच म्हटलें, " पण त्यांनीं स्वतः लग्न केलं त्या पोरीचं पुढं काय होणार, याचाच जिथं विचार नाहीं, तिथं मुलीच्या लग्नाचा कोण विचार करतो !—"

माझ्या तोंडावर हात ठेऊन ताई म्हणाली, " असलं कांहीं बोलूं नकोस बरं इथं. चटकन् बाईसाहेब आल्या तर कुरुक्षेत्र माजवतील. नकोत ह्या लग्नाच्या गोष्टी. त्यापेक्षां तुझ्या कॉलेजांतल्याच गोष्टी सांग. "

मी कॉलेजांतल्या गोष्टी सांगायला सुरवात केली. पण नाना, काका किंवा मंजुळा यांच्या भानगडी सांगण्याचें आजिबात टाळलें. मला वाटलें, ताईला त्या गोष्टी पटणार नाहींत. तिनें भिन्न मत द्यावें आणि मग आपण तिच्याशीं वादविवाद करावा, हें मला कसेंचसें वाटलें असतें. म्हणूनच मुद्दाम मी तो विषय टाळला.

मी छबीच्या घरीं जाणार होतें; पण ती मुंबईला गेल्याचें कळलें. पुण्याला जाण्यापूर्वी केव्हां तरी एक दिवस तिच्या आईला भेटून यावें असें मनाशीं ठरवलें.

बनीकडून घरीं आलें त्यावेळीं दादा माझ्याबद्दल बाबांशीं कांहीं बोलत होता. मी आलेली पाहातांच तो एकाएकी मधेंच बोलायचा थांबला. मी म्हटलें, " थांबलास कां दादा ? माझ्याच गोष्टी चालल्या होत्या वाटतं ? चहाड्या कशाला ? सरळ सरळ तोंडावर सांगितलंस तर त्यांत काय बिघडेल ? "

बाबा म्हणाले, " खरं आहे, खरं आहे. तो कांहीं चहाड्या करीत नव्हता खरा. पण गोष्टी तुझ्या संबंधीच चालल्या होत्या. तूं आलेली पाहातांच थांबायचं कांहीं कारण नव्हतं—"

दादा कांहीं न बोलतांच झटकन् निघून गेला. बाबांना देखील तें कसेंसेंच वाटलें.

ते मला ह्मणाले, " तुझ्या दादानं सांगितलेल्या गोष्टी जर खऱ्या असतील तर एकंदरींत तें कांहीं बरं नाहीं. माझ्या मुलीला कुणी नांवं ठेवतां कामा नयेत. पुण्यांत माझे पुष्कळ स्नेही आहेत—हॉस्टेलमधल्या गोष्टी कांहीं गांवांत आल्याखेरीज राह्मणार नाहींत—त्यांच्या कानीं त्या हकीकती गेल्या आणि त्यांनीं माझं नांव घेऊन तुला नांवं ठेवली, तर तें मला बरं वाटणार नाहीं. मला एक कांहीं तरी दर्जा आहे. नोकरींत आहें तोंपर्यंत तो दर्जा मला संभाळला पाहिजे. ह्मणजे पेन्शन घेतल्यावर मला संभाळायला नको असं ह्मणत नाहीं—पेन्शन घेतल्यावर पुण्यालाच स्थायिक व्हावं असा माझा मनोदय आहे—पेन्शन घ्यायला मला आतां मला फार दिवस राह्यले नाहींत. तूं बी. ए. व्हायच्या सुमाराला मला पुण्यांत घर करावं लागेल. तोंपर्यंत तुझ्या कर्तबगारीचीं पुराणं वाढूं लागलीं, तर पुण्यांत राहणं मला कठीण जाईल."

दादाचा मला भारी राग आला होता. पण त्यानें बाबांना काय सांगितलें तें बाबांकडून काढून घ्यावें, असें मला वाटलें नाहीं.

बाबांना मी तसें सांगितलेंही आणि त्याबरोबरच खडानूखडा सर्व हकीकतीचा पाढा बाबासमोर वाचला.

बाबा क्षणभर स्वस्थ राहिले. त्यांना काय वाटत होतें तें त्यांच्या चेहऱ्यावरून कळून येत नव्हतें. ती त्यांची संवय होती. मॅजिस्ट्रेट ह्या नात्यानें काम चालवतांना दोन्ही पक्षांना न्यायाधिशाचें धोरण कळूं नये ह्मणून चेहरा निर्विकार ठेवण्याचा त्यांनीं अभ्यास केला होता.

ते कांहींच बोलत नाहींत असें पाहून मी ह्मटलें, " दादानं तुह्मांला काय काय सांगितलं तें कळून घ्यायची माझी इच्छा नाहीं. जी कांहीं हकीगत घडली ती जशींच्या तशी मी तुह्मांला सांगितली आहे. त्यांत एक शब्दसुद्धां खोटा नाहीं. किंवा एखादा प्रसंगसुद्धां मी चोरून ठेवलेला नाहीं."

बाबा गंभीरपणानें ह्मणाले, " तुझ्या आणि दादाच्या हकीकतींत फारच अंतर आहे यांत शंका नाहीं. पण ती त्याची चूक नव्हे. हकीकती त्यानं जशा ऐकल्या तशाच मला सांगितल्या. त्याला हकीकती सांगणाऱ्यांची ती चूक असेल किंवा लबाडीही असेल. पण गोदूताई, मी सांगतों तें एक ध्यानांत ठेव. तूं मुलगी आहेस, मुलगा नाहींस. अजून फारशा मुली कॉलेजांत जाऊं लागल्या नाहींत. शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या वाढली पाहिजे, असं मला वाटतं—तुलाही तसंच वाटत असेल—अंतःकरणपूर्वक जर तुला तसं वाटत असेल तर तुला आपलं वर्तन

बदललं पाहिजे. या जातिप्रकरणांत शिरल्यानं कधीं कुणाचं कल्याण झालं नाहीं. सर्वसाधारण लोकांची मतं शेकडों वर्षांपासून ठरून गेलीं आहेत. तुझ्याप्रमाणेंच मला देखील वाटतं, कीं ह्या पंक्तिप्रपंचाच्या बंडांत कांहीं अर्थ नाहीं. पण लोकांना तसं वाटत नाहीं. आपल्याला चार लोकांत वागायचं आहे. उद्यां तुझं लग्न व्हायचं आहे. तूं बी. ए. होईपर्यंत तुझ्या लग्नाचं नांव काढणार नाहीं असं वचन मी तुझ्या आईला दिलं आहे–पण तूं बी. ए. झाल्यावर तुझ्या लग्नाचा विचार केला पाहिजे. एव्हांपासूनच ती गोष्ट माझ्या नजरेसमोर खेळते आहे. मॅट्रिक झालेल्या सुद्धां मुली दिसून येत नाहींत. मॅट्रिक झालेल्या मुलीला बी. ए., एम. ए. नवरा शोभून जाईल. पण उद्यां तूं बी. ए. झालीस, तर तुझ्या तोडीचा कोणत्या दर्जाचा नवरा पाहावा, याची एव्हांपासून मला काळजी लागून राहिली आहे—"

मधेंच तोंड घातलेलें बाबांना आवडत नसे, हें माहीत असूनही मी म्हटलें, "बी. ए. च्या तोडीचा नवरा म्हणजे काय? बी. ए. च बी. ए. च्या तोडीचा असणार! त्यांत आणखी कसली तोड पाहायची?"

"चुकते आहेस बरं गोदे!" बाबा मोठ्या आवेशानें म्हणाले, "फार मोठी चूक करते आहेस. बी. ए. च्या तोडीचा म्हणजे बी. ए. केव्हांहीं नव्हे. इतर व्यवहारांत एक बी. ए. दुसऱ्या बी. ए. च्या तोडीचा ठरेल खरा; पण लग्नाच्या प्रपंचांत तें 'स्केल' लावतां यायचं नाहीं. लग्नाच्या बाबतींत नवऱ्या मुलाच्या आणि नवरी मुलीच्या वयांतलं अंतर पाहावं लागतं. मुलीपेक्षां लग्नाचा मुलगा वयानं कमींत कमी तीन–चार वर्षांनीं तरी मोठा पाहावा लागतो—"

मी पुन्हां मधेंच म्हटलें, "कां?"

बाबा एकदम चिडून म्हणाले, "आतां अशी एक भडकावली असती! म्हणे कां! कां काय? नवरीपेक्षां नवरा मोठा असला पाहिजे हें तर ठरूनच गेलं आहे."

"आणि तसा तो मोठा नसला तर?" मी म्हटलें, "सारख्याच वयाचा असला–किंवा समजा, तिच्यापेक्षां वयानं लहान असला–तर?"

बाबा उत्तर देतांना घुटमळले, पण म्हणाले, "छेः छेः, असं कधीं झालं आहे? तशी रूढि आहे. शास्त्राधारही तसेच आहेत.—"

मी म्हटलें, "पण समजा, ही रूढि आणि हा शास्त्राधार न मानणारा कुणी

निघाला आणि सारख्या वयाच्या दोन मुलामुलींचीं लग्नं झालीं, तर काय होईल ? ”

बाबा ह्मणाले, “ तर तें जोडपं विजोड दिसेल. समज, एकुणीसाव्या वर्षी तुझं लग्न झालं–तें एकुणीस वर्षांच्याच मुलाशीं झालं–तर तें जोडपं कसं दिसेल याची कल्पना कर. तूं एकुणीस वर्षांचे मुलगेही पाहिले आहेस आणि एकुणीस वर्षांच्या मुलीही पाहिल्या आहेस—”

मी पुन्हां मधेंच ह्मटलें, “ नाहीं. एकुणीस वर्षांची मुलगी मी अजून पाहिली नाहीं. एकुणीस वर्षांच्या आया मात्र पुष्कळ पाहिल्या आहेत एकुणीस वर्षांच्या मुलीची कल्पना मला करतां येत नाहीं. ”

बाबा मोठमोठ्यानें हंसून ह्मणाले, “ खरं आहे, खरं आहे ! काय खव्याळ पोर आहे ही ! पण हें पहा गोदुताई, हें विषयांतर होतं आहे. आपण बोलत होतों तो विषय कॉलेजांतल्या तुझ्या वागणुकीसंबंधाचा होता. त्याचा ह्या लग्नाच्या प्रश्नांशीं कांहीं संबंध नव्हता—”

मी ह्मटलें, “ संबंध नव्हता ना ? मग तो प्रश्न कशाला काढलात ? मी लग्नाचा उल्लेखसुद्धां केला नव्हता. विषयांतर केलंत तुह्मीं आणि आतां विषय काढला तर मला कां दोष देतां ? ”

“ खरं आहे, खरं आहे ! ” बाबा डोकें खाजवीत ह्मणाले, “ माझंच चुकलं. पण हें पाहा, कॉलेजांत जाणाऱ्या मुलीनं का असेना, पण प्रत्येक मुलीनं आपलं लग्न होणार आहे हें ध्यानांत ठेऊनच जगांत वागलं पाहिजे. तुझ्यासारख्या समंजस मुलीला यापेक्षां अधिक सांगण्याची जरुरी नाहीं. ” असें म्हणून बाबा माडीवर निघून गेले.

एक चमत्कार झाला यांत शंका नाहीं. साऱ्या आयुष्यांत बाबांनीं मला पहिल्यांदा ‘ खव्याळ ’ म्हटलें, ‘ पोर ’ ह्मटलें. हाताखालच्या लोकांनीं मला गोदूताई ह्मणावें, ‘ अहो जाहो ’ म्हणावें म्हणून अट्टाहास करणाऱ्या बाबांनींच मला ‘ खव्याळ पोर ’ म्हटलें, याचा मला पोट भरून आनंद झाला. मी ‘पोर’ आहें तशीच ‘खव्याळ’ही आहें, हें बाबांना एकदाचें कळलें याचेंच मला समाधान वाटलें.

आई दाराजवळ उभी राहून ऐकत होती. मी आंत येतांच मला पोटाशीं धरून माझें मस्तक कुरवाळीत ती ह्मणाली, “ शाबास पोरी, आज मात केलीस ! ”

फारा दिवसांनीं मला पुन्हां आठवण झाली, कीं मी कुणीतरी आहें !

## प्रकरण ६ वें

# श्रीमंती आणि विद्वत्ता

रत्नागिरीला असल्या मुदतींत माझा बहुतेक वेळ साहेबांच्या बंगल्यावर जात असे. त्यांची लायब्ररी फार मोठी होती. शक्य तेवढी वैद्यकीचीं पुस्तकें टाकून बाकीचीं सर्व पुस्तकें पालथी घालण्याचा उपक्रम मी सुरू केला होता. वैद्यक पुस्तकांपैकीं कांहीं पुस्तकें त्यांनीं माझ्याकडून मुद्दाम वाचवून घेतलीं. त्यांतील बहुतेक ' सेक्स प्रॉब्लेम ' संबंधाचीं होतीं. हीं पुस्तकें वाचतांना पहिल्यांदा मला बराच संकोच वाटला. पण शास्त्रीय दृष्ट्या साहेबांनीं ज्यावेळीं त्या विषयाचें विवेचन केलें त्यावेळीं माझा संकोच आपोआप दूर झाला. त्या विषयाकडे पाहाण्याची माझी दृष्टी बदलली. शास्त्रीयदृष्ट्याच मी तीं पुस्तकें वाचूं लागलें आणि पुढील आयुष्यांत ह्या वाचनाचा मला मोठा उपयोग झाला.

याशिवाय संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासाची मला एक संधि लाभली. त्यावेळीं रत्नागिरीला खारेघाट या नांवाचे डिस्ट्रिक्ट जज्ज होते. ते पार्शी होते खरे, पण त्यांना संस्कृताच्या अभ्यासाचा मोठा नाद होता. ते एक साधुवृत्तीचे गृहस्थ होते. रत्नागिरींत त्यांना सर्व ' देवमाणूस ' ह्मणत असत. त्यांच्या कारकिर्दीत रत्नागिरींत एकही खुनी फांसावर लटकला नाहीं. साहेबांनीं त्यांची माझी ओळख करून दिली त्यामुळें त्यांच्या संस्कृत पुस्तकांचा संग्रह मला पालथा घालतां आला.

पुन्हां रत्नागिरीला केव्हां येतां येईल याची खात्री नव्हती. बाबांची तेथून बदली होण्याचा बराच संभव होता, ह्मणून रत्नागिरींत जेवढें कांहीं पाहाण्यासारखें असेल तेवढें पाहून घेण्याचा उपक्रम मी सुरू केला.

गायनाचें शिक्षणही तितक्याच जोरांत सुरू होतें. दिवस थोडे असल्यामुळें मुख्यमुख्य सर्व रागांची बुवा मला जुजबी ओळख करून देत होते. त्यावेळीं कॉलेजांत गायनाचा अभ्यास करतां येणें शक्य नव्हतें. मला वाटतें अजूनपर्यंतही नाहीं. हल्लीं इंग्रजी–मराठी शाळांतून गायनशिक्षक ठेवले असून शिस्तवार गायनाचा अभ्यासक्रमही सुरू झाला आहे. कॉलेजांतही तसाच उपक्रम कां होऊं नये ? पण जिथें अध्यापक वर्गच गानबधिर आहे तिथें विद्यार्थ्यांच्या गायन-

लालसेची दाद कुणाच्या कानीं पोचणार ? एवढ्याचसाठीं मी आलेली संधि साधून घेत होतें. चांगली दोन अडीच महिन्यांची सुटी असल्यामुळें सर्व विषयांवर सरसहा ओरबाड घेणें मला शक्य झालें होतें. सुटीच्या बाबतींत हायस्कूलपेक्षां कॉलेज बरें असें एवढ्यामुळेंच मला वाटे.

मी काय करतें इकडे बाबांचें पूर्णपणें दुर्लक्ष असे. आई जितक्या कळकळीनें या माझ्या तात्पुरत्या अभ्यासक्रमाच्या बाबतींत जितकी चौकशी करीत असे तितकीच दादाही करीत असे. मात्र दादा मला प्रत्यक्ष असें कांहीं विचारीत नसे. तो बाहेरून बाहेरून चौकशी करीत असे. या त्याच्या तेढ्या वृत्तीचा मला राग येई.

पुण्याच्या बातम्या कळल्यापासून त्यानें माझ्याबद्दल डोक्यांत कांहीं तरी वेड घेतलें होतें. मी स्कॉलर होऊन पहिली आल्याचा मत्सर त्याच्या हृदयांत कुठें तरी धुमसत होताच. प्रिव्हियस आणि इंटरच्या दोन्ही परीक्षांत त्याला स्वतःला सेकंड क्लास सुद्धां मिळाला नव्हता; त्याचमुळें प्रत्यक्ष पाठच्या बहिणीशीं वैषम्य मानण्याची मत्सरी वृत्ति त्याला अनावर झाली होती.

किर्तीकरसाहेबांच्या पट्टेवाल्याकडे ज्या वेळीं तो माझी चौकशी करूं लागला त्यावेळीं मात्र माझ्या सहनशीलतेची मर्यादा संपली.

मी त्याला उघड उघड विचारलें, "दादा, मी ही रोज तुला घरीं भेटतें आहें. कांहीं विचारायचं असलं तर सरळ मला विचारतां येण्याजोगं आहे, असं असतां तूं डॉक्टरसाहेबांच्या पटेवाल्याकडे कशाला माझी चौकशी करीत होतास ?"

माझ्या प्रश्नामुळें तो थोडासा बावरला, पण शक्य तितकी पुरुषी ऐट आणून म्हणाला, "मी चौकशी केली असेल किंवा नसेल, त्याच्याशीं तुला काय करायचं आहे ?"

मी म्हटलें, "दुसऱ्या कुणाची चौकशी केली असतीस तर मी फारसं मन घातलं नसतं. पण प्रत्यक्ष मी स्वतः हजर असतां माझ्या पश्चात् माझी चौकशी एका शिपाई माणसाकडे करतोस, याचं मला कांहींच का वाटणार नाहीं ?"

माझ्या डोळ्याला डोळा न देतां तो म्हणाला, "तुला विचारून काय उपयोग ? तूं सांगशील त्यानं माझें समाधान होणार नाहीं. लंब्याचौड्या बाता मारून तूं रोज आईला फसवीत असतेस, हें मी पाहातों आहें. बाबा कांहीं चौकशी करीत

नाहींत त्यामुळें तुला कसलंच बंधन राहिलेलं नाहीं. गांवांत सर्व लोक बोलतात हें बाबांच्या कानीं जात नाहीं. माझ्या कानीं आलं ह्मणजे मला डोळे झांकून स्वस्थ राहावत नाहीं. मला माझ्या मनाची खात्री करून घ्यायची असते, त्यामुळें मला वाटेल त्या माणसाला विचारावं लागतं. तूं एक बायको माणूस आहेस–माझी बहीण आहेस–याची आठवण तुला नसली तरी मला आहे. हाच भाऊ असता तर मी फारसं मनावर घेतलं नसतं. पण तूं बहीण आहेस ह्मणूनच मला एवढ्या बारकाईनं चौकशी करावी लागते आहे. मला वाटेल तें मी करीन, तुला वाटेल तें तूं कर. तुझ्या हकीकती मला कळूं नयेत अशी तुझी इच्छा असेल तर कड्या–कुलपांतून राहात जा. असे उघडे चाळे करूं नकोस."

मी पुढें कांहीं बोलेन या भीतीनें त्यानें तिथून पळ काढला. झालेली हकीकत मी आईला सांगितली तेव्हां ती कांहींच बोलली नाहीं. दादाचें वर्तन तिला आवडलें नाहीं असें तिच्या मुद्रेवरून वाटलें खरें; पण तिनें तसें उघडपणें बोलून दाखविलें नाहीं.

माझा नित्यक्रम जसा होता तसाच चालू होता. त्यांत मधेंच थोडासा व्यत्यय आला.

मुंबईहून छबी रत्नागिरीला आली. आल्याबरोबर तिनं मला निरोप पाठवला. थोड्याच मुदतींत छबीच्या स्वरुपांत बरेंच रुपांतर झालें होतें. ती प्रकृतीनें मूळचीच सुदृढ होती, त्यामुळें आतां ती एखाद्या जाणत्यासवरत्या बाईसारखी दिसूं लागली होती. तिला पाहातांच मी उद्गारलें, " छबे, केवढी ग तूं मोठी दिसतेस ? जशी कांहीं दोन मुलांची आईच !—"

" अगदीं हेंच–अगदीं हेंच ! " छबी ह्मणाली. " प्रत्येकजण अगदीं हेंच ह्मणतं आहे आणि ह्मणूनच माझ्या आईबापांना फांस लागल्यासारखं वाटत होतं. पण आतां एकदाचं त्यांचं समाधान झालं.–" असें ह्मणून ती स्तब्ध राहिली.

मी विचारलें, " कसलं समाधान झालं ? "

अगदीं कठोर मुद्रेनें छबी उद्गारली, " आतां त्यांच्या डोळ्याचं पारणं फिटेल. कळलं ? माझं लग्न ठरलं. कुणाशीं तें सांगूं का ? मी आतां मुंबईतल्या एका भल्या मोठ्या दारू दुकानाची मालकीण होणार आहें—"

माझ्या काळजांत चर्रे झालें. तिचे शब्दच इतके कठोर—इतके हृदयद्रावक

होते ! तिच्या प्रत्येक शब्दांत त्वेषाचें जळजळीत स्वरूप दिसत होतें. कांहींतरी बोलायचें ह्मणून मी ह्मटलें, " असं का? छान झालं. पुढलं आयुष्य चांगलं श्रीमंतींत जाईल. '

छबीच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. ती ह्मणाली, " तूंही अशीच ? मला वाटलं होतं, कीं तूं तरी माझ्यासाठीं दोन टिपं टाकशील. पण पाहावं तर हें असं ! जो तो श्रीमंतीलाच भाळतात."

" नाहीं बरं," मी वरहिवरून ह्मटलें, " मी कांहींतरी बोलायचं ह्मणून बोललें. त्या शब्दांना कांहीं अर्थ नव्हता. पण ह्या बाबतींत तुझ्या आईबापांना काय वाटतं ?"

ती चिडून ह्मणाली, " त्यांना काय ! दर्याभर आनंद झाला आहे. दोन घोड्यांची गाडी आहे ना तिथं ? दोन चाळी आहेत मालकीच्या ! भाडंच नुसतं दरमहा अडीच तीन हजार येतं. शिवाय दुकानाचं उत्पन्न. गोदुताई, त्या श्रीमंतीनंच माझा घात घेतला. आमच्या परीनं आह्मी दिखील थोडीशीं श्रीमंतांतच मोडतों ना ! मग स्थळ आमच्या तोलाचंच नको का ?—नव्हे, थोडंसं आमच्याहून वरचढच असावं लागतं. मुलीला सासर आपल्यापेक्षां वरचढ मिळालं तर वाईट वाटायच्या ऐवजीं आईबापांना उलट आनंदच होत असतो. "

मला बाबांचे उद्गार आठवले, 'बी. ए. झालेल्या मुलीला बी. ए. नवरा तोडीचा ठरत नाहीं.' मॅट्रिक मुलीला बी. ए. तर बी. ए. मुलीला कोणता नवरा हें त्रैराशिक त्या दिवशीं चांगलेंसें सुटलें नव्हतें, त्याची मला आठवण झाली. लग्नाच्या बाबतींत विद्वत्तेची असो किंवा श्रीमंतीची असो, सारखी चढाओढच चालली पाहिजे का ? मुलगी जितकी विद्वान असेल त्याच्यापेक्षां सासरची श्रीमंती जास्त मोठी असली पाहिजे का ? कोणत्याही बाजूनें वरपक्षाचा चढाव ठरवल्याखेरीज लग्नें जुळतच नाहींत का ?

मी कांहींच न बोलतां विचारांत राहिलेली पाहून छबी ह्मणाली, " आतां कां बोलत नाहींस, गोदुताई ? कसल्या विचारांत पडलीस ? माझ्या लग्नाबद्दल तुला काय वाटतं ?"

काय उत्तर द्यावें, याचा मला विचार पडला, तरीही मी ह्मटलें, " त्याचाच मी विचार करतें आहें. मुलीचं लग्न करण्याचा एवढा हा अट्टाहास कां ? बरं,

ठरल्या मुदतींत मुलींचं लग्न झालंच पाहिजे असं जर आईबापांना वाटत असेल, तर हीं वरपक्षाची वरचढगिरी कां शोधतात? कर्तासवरता मुलगा असला तर नाहीं का चालायचं?"

छबीचा त्वेष इतक्यांत कमी झाला होता. थोड्याशा खालच्या स्वरांत येऊन ती ह्मणाली, "तें काय सांगावं? माझ्यासमोर असा प्रश्न येतो, कीं उद्यां मला मुलगी झाली तर तिच्या लग्नाच्या वेळीं माझी नजर अशीच होईल का? श्रीमंतीनं मला सौख्य होईल, असं माझ्या आईबापांना वाटतं. पण या श्रीमंतीचा उपयोग मला केव्हां मिळणार? कोणत्या प्रकारानं मिळणार? माझ्यासाठीं निश्चित केलेल्या माझ्या वराचं दुकान आह्मी रहातों त्या चाळीच्या शेजारींच आहे. रंगरूप कांहीं कुणाच्या हातचं नाहीं. पण मनाची छाया चेहऱ्यावर पडते हें जर खरं असेल, तर पुढं माझं काय होणार याची एव्हांपासूनच मला भीति वाटूं लागली आहे. आमच्या घरचे हमाल सुद्धां यापेक्षां पाणीदार दिसतात. सकाळीं नऊ वाजल्यापासून रात्रीं नऊ वाजेपर्यंत सारखं दुकानावर ठाण, संबंध दारुड्यांशीं,—व्यवहार दारुड्यांशीं—आणि घरीं श्रीमंती आली आहे ती गरिबागुरिबांचीं घरं दारूपायीं ओस पडल्यामुळं! त्या दारुड्या श्रीमंतींत मिळालेल्या गाडीघोड्यांतून आह्मी मिरवणार! दारुवाल्याची बायको ह्मणून लोक माझ्याकडे बोट दाखवणार आणि उभ्या दिवसांत ह्या दारूवाल्या श्रीमंताची आणि माझी कधीं गांठभेट सुद्धां होणार नाहीं. रागाऊं नकोस गोदुताई, पण या श्रीमंत दारुवाल्याची जर एखादी रखेली असती तर तिच्यांत आणि त्याच्या लग्नाच्या बायकोंत काय फरक दिसून आला असता? आणि या असल्या श्रीमंतीसाठीं माझीं आईबापं हुरळून गेलीं आहेत. नुसत्या अंदाजानं भीति वाटते. कोणत्या भाषेंत तुला सांगूं? तें ध्यान पाहिलं कीं वाटतं— काय सांगूं गोदूताई! बावळ्या मूर्खांवरच का लक्ष्मी प्रसन्न होत असते?—"

डोळ्याला आलेलें पाणी पुसून ती मन घट्ट करून पुन्हां बोलूं लागली, "तो मला पाहायला आला होता. त्याच्याबरोबर त्याचे कांहीं मित्र आले होते. काय त्यांची भाषा! काय त्यांचे विचार! काय त्यांचे आचार! तरी तुमच्या पांढरपेशांसारखे त्यानें प्रश्न मात्र केले नाहींत. नुसता टकमक माझ्या तोंडाकडे पाहात राहिला. चांगली डोळ्याला डोळा देऊन मी पाहूं लागलें, तेव्हां घाबरल्यासारखा दिसला. पण क्षणभरानं बाजूच्या मित्रांकडे वळून ज्यावेळीं त्यानं डोळे मिचकावले त्या-

वेळीं तर मला भिरभिरीच आली. बाबा त्याच्या बोटांतल्या आंगठ्यांच्या हिऱ्याकडे पाहात होते. ते हिरे खरोखरच पाणीदार होते. झळकन् त्यांचा प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर पडला, कीं तिथला मूर्खपणा जास्त खुलून दिसे. हंसतांना त्यानं आकर्ण तोंड वासलं, कीं वाटे, एक थोबाडींत द्यावं आणि कांहीं झालं नाहीं असं समजून सरळ पुढं जावं—"

तिच्या हृदयांतून मोठमोठे सुस्कारे निघत होते. काय ह्मणावं हें मला कांहींच सुचेना; पण ती माझ्या उत्तराची अपेक्षाच करीत नव्हती.

ती पुढें बोलूं लागली, "आणि हें ध्यान माझा पतिदेव होणार! या मालकाच्या सहवासांत मला रहावं लागणार!—सारा जन्म कंठावा लावणार! त्या कल्पनेनेंच मला कापरं भरलं. मी झटकन् आंत निघून गेलें आणि आईला विचारलं—या समारंभासाठीं आई मुद्दाम मुंबईला आली होती—आईला विचारलं तेव्हां ती ह्मणाली, 'काय झालं? आमचीं नव्हतीं का लग्नं झालीं? आह्मी कधीं रागावलो होतों का अशा? बायकांच्या जातीला पुरुषांना अशीं नांवं ठेवतां येतात का?' मी उगीच राहिलें. बोलण्यांत काय अर्थ होता? कुणाला माझी भाषा कळणार होती? अजून लग्न झालं नाहीं तोंच कुठंतरी पळून जावंसं वाटलं. दुसरी कुणी असती तर जीव द्यायच्या गोष्टी बोलली असती. माझं मन तेवढं दुबळं नाहीं. पण मनानं मी खंबीर असलें तरी त्याचा उपयोग काय होता? आईबाप ज्या घरांत घालतील त्या घरीं आयुष्य काढणं मला भाग होतं. याला कांहीं उपाय नाहीं का? पोरींच्या जातीवर आईबापांची जी ही सत्ता चालते त्यांतून बाहेर निघायला कांहींच मार्ग नाहीं का? ज्या माणसाकडे नुसतं पाहिलं तरी मला शिसारी येते त्या माणसाबरोबर मी जन्मभर राहूं तरी कशी? त्यानं अंगाला हात लावला तर माझ्या अंगावर कांटा उभा राहील, असं नुसत्या कल्पनेनंच वाटतं. तिथं त्याच्या सहवासांत—"

बोलत असतांना ती एकदम थांबली. तिची मुद्रा दगडाच्या पुतळीसारखी झाली होती. बोलत असतांना नकळत तिच्या मुठी वळत होत्या. मला प्रश्न पडला, कोणत्या शब्दांनीं तिचें सांत्वन करूं?

ती ह्मणाली, "मनाचा भार हलका करण्यासाठीं तुझ्याकडे बोलतें आहें. आंतून कसं रसरसून येत होतं! कुठं एकदां ओकून टाकीन असं झालं होतं ह्मणूनच तुला बोलवायला पाठविलं. खरं ह्मटलं तर मीच तुला भेटायला हवं होतं. पण ही मनची घाण मला ओकायची होती!—हुंः बोलूं नकोस. तुला यांत

कांहीं करतां यायचं नाहीं. मला द्वेष येतो आहे म्हणून फार तर तुला वाईट वाटेल. यापेक्षां माझ्या अंतःकरणांत काय जळतं आहे, याचा अंदाज तुला व्हायचा नाहीं. तुझ्या लग्नाच्या गोष्टी अजून निघाल्या नाहींत आणि निघाल्या तरी काय होणार ? तूं कांहीं भंडाऱ्याची मुलगी नाहींस. दारुड्या श्रीमंतींत लोळायचं भाग्य तुला कधीं म्हटल्या कधीं सुद्धां लाभायचं नाहीं—जाऊं दे, आतां तुझ्या कॉलेजच्या गोष्टी मला सांग—"

मलाही हायसें वाटलें. कॉलेजच्या साऱ्या गोष्टींची ळेट आणखी एकदां छबी-पुढें लावली. घटकाभर तिला तेवढाच विरंगुळा झाला. रत्नागिरींतल्या कार्य-क्रमाचा पाढाही मी तिच्यापुढें वाचला आणि पुन्हां भेटायला यायचें कबूल देऊन मी घरीं गेलें.

सारी रात्र मला झोंप आली नाहीं. छबीच्या तोंडून तिच्या लग्नाच्या बोज-वाऱ्याची हकिकत ऐकत असतांना माझ्यावर जो परीणाम झाला होता, तो नुसता अंदाजी होता. छबीच्या परिस्थितीशीं स्वतः कल्पून ज्या वेळीं मी विचार करूं लागलें, त्यावेळींच मला छबीच्या भाषणाची उत्कटता पटूं लागली. कुणी सांगावें, श्रीमंतीमुळें छबीवर जो प्रसंग आला, तो विद्वत्तेपायीं माझ्यावर येणार नाहीं कशावरून ? आय. सी एस. झालेल्या एखाद्या मूर्ख दारुड्याच्या पदरीं, तो आय. सी. एस. आहे एवढ्याच कारणामुळें जर पडलें, तर माझें काय होईल ? मी ऑफिसर लोक पाहिले होते. बाबाही एक ऑफिसर असल्यामुळें मूर्ख ऑफिस-रांचे चवचाल चाळे माझ्या कानावर आले होते. असल्या एखाद्या चवचाल मूर्खाच्या भाग्याशीं जन्म भिडवण्याची पाळी आली तर माझें काय होणार ? हा जळजळीत प्रश्न माझ्या समोर उभा राहिला. लग्न ! लग्न ! ! लग्न ! ! ! लग्नाशिवाय मुलींच्या जातीला गत्यंतरच नाहीं का ? परिस्थितीनें असो, पदवीनें असो किंवा श्रीमंतीनें असो, मुलीशीं तुलना करतां नवऱ्या मुलाचा वरचष्माच राहिला पाहिजे, हा नियम केव्हांपासून अमलांत आला ?

या बीभत्स विचारानें माझें मस्तक भणाणून गेलें. मी निरनिराळ्या कल्पना करून पाहिल्या, त्या परिस्थितीचा अचुक अंदाज येईल इतकीं चित्रें डोळ्यांसमोर उभीं केलीं, त्यावेळीं माझ्या अंगावर शहारून कांटा उभा राहिला.

त्या भेदरलेल्या स्थितींतच मला झोंप लागली.

---

# प्रकरण ७ वें.

# रत्नागिरी ते पुणें

झोंपेंत आणि स्वप्नांत देखील त्याच विषयावर माझे सारखे विचार चालले असावे. स्वप्नांत मला दिसलें, कीं छबीचें लग्न झालें. लग्न झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या उभयतांचें भांडण होऊन त्यांनीं काडीमोड केली. छबीनेंही त्या काडीमोडीनंतर दुसरें लग्न केलें. त्यांच्या जातींत अशा प्रकारें एक नवरा असतांना त्याच्याशीं काडीमोड केल्यावर दुसरें लग्न करण्याची रूढी असल्यामुळें कुणालाच त्याचें कांहीं वाटलें नाहीं. मला मात्र त्या बातमीमुळें धक्का बसला. माझी जिवलग मैत्रीण छबी एक नवरा असतांना दुसरें लग्न करते याबद्दल आजूबाजूच्या लोकांनीं, माझा प्रत्यक्ष संबंध नसतांही, माझी टवाळी करण्यास सुरवात केली. अर्थातच तें माझ्या मनाला लागूं लागलें. मी छबीला जाऊन विचारलें. माझ्या पहिल्याच प्रश्नासरशीं अचानक तिनें माझ्या थोबाडींत लगावली—आणि त्याच वेळीं मी जागी झालें.

माझ्या बिछान्याशेजारीं असलेल्या कपाटांतून दादा कांहीं पुस्तकें काढीत होता, त्याच्या हातून एक पुस्तक निसटलें व तें माझ्या गालावर पडलें.

दादा म्हणाला, " कॉलेजांत गेल्यापासून किती आळशी झालीस तूं, गोदे ! आठ वाजून गेले, तरी अजून झोंपा काढते आहेस ! हीच का तुझ्या फर्ग्युसन कॉलेजची शिस्त ! "

अंगावरचें पांघरूण फेंकून मी उठून बसून म्हणालें, " आमचं आपलं गांवठी कॉलेज, तिथं कसली आली आहे शिस्त ? तुझ्या कॉलेजसारखे कडक शिस्तीचे पाद्री प्रोफेसर कुठं आहेत आमच्या कॉलेजांत ? आमचं आपलं हें असंच चालायचं. "

माझें वाक्य संपण्यापूर्वीच दादा निघून गेला होता.

मला स्वप्नाची आठवण झाली. हें स्वप्न खरें तर होणार नाहीं ? अशी अंधुक कल्पना मनांत येऊं लागली. स्वप्नावर माझा विश्वास नव्हता खरा, पण या स्वप्नांत कांहीं तथ्य होतें. स्वप्नांत दिसतें त्याच्या उलट घडून येतें असें म्हण-

तात, तसें तर होणार नाहीं ना ? कीं माझ्याच मनांत जें वाटत होतें, त्याचा प्रतिध्वनी स्वप्नांतून निघाला ? कसेंही होवो पण बिचारीचें कल्याण होवो, अशी भावना मनांत धरून मी क्षणभर देवाची करुणा भाकली, आणि तो विषय मनांतून दूर सारला.

डॉक्टरसाहेबांच्या बंगल्यावर मी गेलें त्यावेळीं मुद्दामच मी हा विषय चर्चेसाठीं काढला. पाश्चिमात्त्य देशांतील काडीमोडीचा इतिहास त्यांच्या उत्तरादाखल त्यांनीं मला सांगितला.

ते ह्मणाले, " आपल्याकडे देखील काडीमोडीला शास्त्रांतून आधार आहेत. नवरा परागंदा झाला, संन्यासी झाला, पुरुषत्वहीन ठरला, किंवा धर्मभ्रष्ट झाला तर कुणाही स्त्रीला पुन्हां लग्न करण्याची शास्त्रांनीं परवानगी दिली आहे. या प्रश्नासंबंधींचे निरानिराळ्या स्मृतींतून असलेले आधार गोळा केले, तर त्यांतून चौदा बाबी निघतात. त्यांत एकमेकांचा स्वभाव किंवा वृत्ती एकमेकांशीं न जुळणें हें देखील कोणत्याही स्त्रीला पुन्हां दुसरा पति करण्यास पुरेसें कारण समजलें गेलें आहे. तुझ्या छबीची बाब याच सदराखालीं येते. पण रूढी कदाचित् या प्रकाराला विरोध करील. बौद्धांच्या आणि मुसलमानांच्या राजवटीमुळें आमच्यांतील कांहीं चांगल्या पद्धती जशा नाहींशा झाल्या आहेत, तशाच कांहीं नव्या रूढीही, आह्मांला नकळत, आमच्या घरांत घुसल्या आहेत. स्मृती एक ह्मणतात तर रूढ भलतेंच सांगते, असा प्रकार असल्यामुळें समाजाचा बुद्धिभेद झाला आहे. योग्य काय आणि अयोग्य काय हें ठरवतांच येत नाहीं, असं झालं आहे. यांतून सीधा मार्ग कधीं दिसेल तो सुदिन. " असें ह्मणून साहेबांनीं हुक्क्याच्या नळींतून धुराचे फवारे सोडण्यास सुरुवात केली.

विषय तिथेंच संपला असें गृहीत धरून मी तंबोरा काढून बसलें. चित्त ठिकाणावर नव्हतें खरें, तरीही बुवा सांगतील ते स्वर कसे तरी घेण्याचा मी प्रयत्न करीत होतें.

माझी तारांबळ बुवांच्या ध्यानांत आली. ते ह्मणाले, " हें पहा मोदूताई, आज तालमीकडे तुमचं लक्ष दिसत नाहीं. डोकं कुठं तरी भ्रमण करतं आहे असं वाटतं. तुमचं चित्त जर ठिकाणावर नाहीं तर उगाच मला उरस्फोड करायला कशाला लावतेस ! "

मी गावाकडे आलें. सुट्टीचे दिवस थोडे राहिले होते. गायनाच्या शिक्षणाच्या दृष्टीनें एकेक दिवस मोलाचा होता. पुढल्या सुट्टींत बुवांची भेट होईल की काय, याची सुद्धां शंका होती. मी सर्व विचार बाजूला सारले, बुवांची क्षमा मागितली, आणि लक्षपूर्वक तालीम घेण्यास सुरवात केली.

सुट्टीच्या राहिलेल्या थोड्या दिवसांत गायनावरच भर देण्याचा मी निश्चय केला आणि त्या अनुरोधानें इतर सर्व उपव्द्याप बाजूला टाकले.

सुट्टी संपण्यापूर्वी एकदां बनीची आणि छबीची भेट घेतली. मधल्या मुदतींत मी त्यांना मुळींच भेटत नव्हतें असें नाहीं—तशी आठवड्यांतून एक दोन वेळ आमची भेट होत असे—पण यावेळीं भेट घेतली, ती मन मोकळें करून बोलण्याकरितां. भेट होईल किंवा नाहीं याची सारखी शंका वाटत होती, ह्मणून दोघानींही एकदां मन मोकळें करून, पोटभर बोलून घेतलें.

त्या बोलण्यांतून कांहीं निष्पन्न होणार होतें असें नाहीं. नुसतें माझ्या मनावरचें नसतें ओझें थोडें हलकें करून घेतलें एवढेंच.

सुट्टी संपल्यावर पुण्याला आलें. कॉलेजचा कार्यक्रम पूर्ववत् सुरू झाला. तीच खोली, तेंच जेवण, तीच पंगत, तीच अभ्यास, तीच टेकडी, तीच पूल—सर्व कांहीं पूर्वीप्रमाणें होतें-पण टवाळ्या कुटाळक्यांचें प्रमाण मात्र बरेंच कमी झालें होतें.

बऱ्हाडी बायकांशीं बोलण्यांत मंजुळा आतां मुळींच संकोच बाळगीत नव्हती. त्या उघड बोलण्याचालण्याचा विपर्यास करण्याचें काम पडद्याआडून चाललें होतेंच.

मात्र त्यांत एक चमत्कार झाला होता. गेल्या टर्ममध्यें आमची टवाळी करण्यांत पुढारी असणारा नाना या टर्मला अगदींच बदलला होता. आमच्याशीं तो अनपेक्षित सालसपणानें वागत असे. मंजुळा आणि मी रस्त्यांत भेटलों, तर हंसतमुखानें आह्मांला नमस्कार करून शिळोप्याच्या गोष्टी भर रस्त्यांत बोलण्याइतका धीटपणा त्याच्या अंगीं आला होता.

पूर्वी तो आमची थट्टा करीत असे, पण बाकीचे विद्यार्थी आतां उलट त्याचीच थट्टा करूं लागले. जितक्या निर्लज्जपणानें पूर्वी तो आमची टवाळी करीत असे, तितक्याच निर्लज्जपणानें तो आतां त्यांच्या टवाळीबद्दल बेफिकीर रहात असे.

मला या गोष्टीचें राहून राहून आश्चर्य वाटे. नुसती प्रिन्सिपल साहेबांनीं कानउघाडणी केल्यामुळें त्याच्यांत हें स्थित्यंतर झालें, असें गृहीत धरण्याइतकी

मी भाबडी नव्हतें. या त्याच्या वर्तनाच्या मुळाशीं कांहीं तरी स्वच्छ हेतु आहे, हें मला उघड उघड दिसत होतें. मंजुळेलासुद्धां नानाच्या या स्थित्यंतराचें कारण उकलतां येईना.

ती ह्मणाली, "मला वाटतें, यांत त्याचा कांहीं तरी खोल उद्देश आहे. अंतःकरणाच्या मुळाशीं सूडाची कल्पना आहे. प्रिन्सिपल पुरागमतवादी आहेत, या कल्पनेनें तो आमच्यावर नसतीं बालंटं घेत होता खरा, पण प्रिन्सिपल साहेबांनीं त्या कामीं त्याला तोंडघशीं पाडलें. पश्चात्ताप होण्याइतका चांगुलपणा या टवाळखोर पोराच्या अंगीं असेल, अशी कल्पनासुद्धां करवत नाहीं. खरं पाहिलं तर, तशी परिस्थितीही उत्पन्न झाली नाहीं. प्रिन्सिपलसाहेबांनीं कांहीं त्याची कानउघाडणी केली नाहीं. तशी चांगली कसून कानउघाडणी केली असती, मुद्देसूद त्याचा अपराध त्याच्या पदरांत घातला असता, तर कदाचित् त्याला पश्चात्ताप झाला असता. पण प्रिन्सिपल साहेबांनीं तसं कांहींच केलं नाहीं. थोडीशी तंबी दिली खरी, पण तीही अगदीं मिळमिळीत—उत्तेजन दिलं असं वाटण्याइतकी मिळमिळीत. शिस्तीच्या दृष्टीनं त्यांनीं नुसतं आपलं कर्तव्य बजावलं. विषयाचं मूळच जिथं त्यांना पटलं नाहीं, तिथं नानाला तंबी देण्याइतका जोर त्यांच्या वाणींत येईल तरी कुठून? ह्मणूनच मला वाटतं, कीं या त्याच्या चांगुलपणाच्या मुळाशीं सूडाची कल्पना असली पाहिजे."

मंजुळेची ही विचारसरणी मला पटली. नानाच्या वृत्तींतच इतका फरक झाला होता. काल जाणूनबुजून दुष्टपणा करणारा माणूस कांहीं कारण नसतां आज इतका सज्जन कां व्हावा? त्यानें कितीहि चांगुलपणा दाखविला, तरी त्याच्याशीं वागतांना चांगलीच सावधगिरी ठेवण्याचा मी निश्चय केला.

पण गौरीनें आमचे डोळे उघडून दिले. आमचा अंदाज कांहीं अगदींच चुकला नव्हता. पण गौरीच्या अंदाजाप्रमाणें आमच्या अंदाजाला निराळें स्वरूप आल्याचें दिसून येत होतें. तिच्या सांगण्यांत माझ्याविषयीं कळकळ होती असें नाहीं. नानाविषयीं मी सावध रहावें म्हणून तिनें ही धोक्याची सूचनाहि दिली नव्हती. तिला माझी टवाळी करायची होती; पण ती टवाळीच मला मार्गदर्शक झाली.

तिनें विषय काढला तो पंक्तीवर. त्यावेळच्या तिच्या भाषणांत देखील माझ्याविषयीं मोठीशी सहानुभूति नव्हती.

गौरी म्हणाली, " कसं काय गोदूताई, तुम्ही लहानपणी चिपळूणलाच होतां ना ? "

मी होय म्हणतांच तिनें पुढें बोलावयास प्रारंभ केला. " असं का ? मग चिपळूणची हवा तुम्हांला मानवणार यांत शंकाच नाहीं. पुन्हां चिपळूणला जाऊन रहावं असं साहजिकच तुम्हांला वाटणार ! बालपणीं ज्या गांवचा लळा लागतो, त्या गांवाकडे मोठ्या वयांत साहजिकच मन ओढ घेतं. माझे बाबा हल्लीं धुळ्याला असतात. पण धुळ्याकडे कांहीं माझा ओढा नाहीं. सारं बालपण गेलं साताऱ्याला ! तेव्हां सहाजिकच वाटतं, कीं सासर मिळावं तें साताऱ्याचंच ! आतां या सुट्टींत धुळ्याला गेलें, कीं बाबांना मी सांगणारच आहें, कीं माझ्या-साठीं साताऱ्याचं स्थळ शोधा म्हणून ! तुला चिपळूणचा ओढा वाटतो, याचं मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. "

बोलत असतांना ती शेजारच्या मुलीकडे पाहून डोळे मिचकावित होती. ती मुलगीही मिस्किलपणानें मधून मधून गालांतल्या गालांत हंसत होती.

यांत कांहींतरी कुचाळी आहे असा तिच्या खव्याळ भाषणावरून मला संशय येत होता खरा; पण तिनें हा बाण कुठल्या मर्मावर योजला होता, याचा मला कयास करतां येईना.

मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती आश्चर्यचकित झाल्याचा आव आणून म्हणाली, " एवढंसुद्धां का कळत नाहीं ? कीं मुद्दामच सोंग आणतां आहांत गोदू-ताई ? अगदीं मनोमन साक्ष जुळलं आहे, हें खुद्द त्यानंच मला सांगितलं—"

मी कांहींतरी प्रश्न विचारावा म्हणून ती मुद्दाम थांबली खरी, पण मी तिची निराशा केली. माझ्याकडून प्रश्नाची सुरुवात होत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " कुठल्या त्यानं म्हणून नाहीं विचारलंत ? मीच वेडी. कुठल्या गोष्टी विचाराव्या आणि कुठल्या विचारूं नये, हें कळण्याइतकी मला बुद्धी असती, तर साऱ्या मुंबई इलाख्यांत मी पहिली नसतें का आलें ? पण हा बायकांचा स्वभाव ना ! चौकसपणा फार. तो टाकून देणं सर्वांनाच कांहीं साधत नाहीं. त्यांतून तोच माझ्याकडे बोलला ! आणि मूळ चिपळूणचा ओढा ! मला तरी कां खोटं वाटावं ? त्यांतून तुमच्यासारखं हें सुंदर रूप—कोण भाळणार नाहीं ? आम्ही आपल्या ह्या काळ्यासावळ्या, नकट्या—चोकड्या ! पुरुष माणसं रस्त्यानं गेलीं, नजरेला नजर

गेली तर छत्री आड करितात ! आमच्या सारख्यांना पाहून कुणाला मूर्च्छा आली तर ती भीतीनं ! प्रेमाची मूर्च्छा यायला तुझ्यासारखं सांडून राहिलेलं सौंदर्य असावं लागतं. असल्या सौंदर्याला चिपळुणचा नाना भाळला तर त्यांत आश्चर्य कसलं ? मी पुरुष असतें तर प्रेमासाठीं तुझे पायच धरले असते ! ”

साऱ्या जणी मोठमोठ्यानें हंसल्या. हृदयांतून राग सळसळून आला होता, तरी मीही हंसलें. सर्वांची खात्री झाली, कीं कळलेली बातमी बरोबर आहे.

मंजुळा मात्र हंसली नाहीं. खोलींत येतांच ती रागारागानें मला म्हणाली, “ हें ग काय गोदे, असा गैरसमज कशाला वाढवितेस ? त्यांना खरं नाहीं का वाटायचं तें ? ”

तितक्याच बेफिकीरपणानें मी म्हटलें, “ वाटेल ! काय बिघडलं त्यांत ? पण आधीं मला असं सांग, मी खरोखरच का सुंदर आहे ? ”

सारा राग विसरून मंजुळा हंसली आणि म्हणाली, “ शेवटीं मूळ पदावर आलीस ! गौरीनं म्हटलं तें कांहीं खोटं नव्हे. स्त्री स्वभावाला उपाय नाहीं. तुझ्यावर आळ घेतला त्याचं तुला कांहींच वाटलं नाहीं. कां, तर तिनं तुला सुंदर म्हटलं—फार सुंदर म्हटलं !– Vanity ! Vanity ! thy name is Woman ! सौंदर्याच्या स्तुतीला भाळलीस ! ऐकलंस गोदे, खरोखरच तूं सुंदर आहेस. साऱ्या कॉलेजांतील सारीं पोरं तुझ्या पायांशीं लोळण घेतील—इतकी तूं सुंदर आहेस. खोटं कशाला, आरशांत पहा म्हणजे तुझी खात्री होईल. तूं म्हणशील, कीं केंस विंचरतांना मी रोज आरशांत पहातें, पण तें पहाणं खरं पहाणं नव्हे. पुरुषांच्या नजरेनं पहा, किंवा एकाद्या कुरूप मुलीच्या नजरेनं पहा—म्हणजे तुला खरी नजर येईल. ”

मी लगेच आरशांत पाहिलें आणि मंजुळेनें सांगितल्याबरहुकूम मला खरोखरच नजर आली. त्या अनुरोधानें मी विचार करूं लागलें आणि, त्याबरोबरच माझ्या नजरेसमोर नवी सृष्टी उभी राहूं लागली..

## प्रकरण ८ वें.

# " गोदु, आय् लव्ह् यू ! "

गौरीच्या थट्टेमुळें—थट्टेमुळें कसला, बातमीमुळें—माझ्या डोक्यांत जो नवा प्रकाश पडला त्याच्यावर मी विचार करूं लागलें.

नुसत्या विचारानें समाधान होण्याजोगें नव्हतें. त्या विचारांच्या जोडीला प्रत्यंतर पाहिजे होतें. आह्मां मुलींच्या गोटांत जरी प्रत्यंतर मिळालें असतें, तरी तें एकतर्फीच झालें असतें.

केस विंचरण्याच्या वेळीं रोज मी आरशांत पाहात असें—नाहीं असें नाहीं. पण आज आरशांत मला निराळें दृश्य दिसूं लागलें. माझा आरसा लहानच होता; जेमतेम चेहरा दिसण्यापुरता होता. तो आरसा लहान आहे असें त्या क्षणापर्यंत मला वाटलें नव्हतें. गौरीच्या भाषणामुळें मला तो आरसा लहान वाटूं लागला. एकादा मोठा आरसा घ्यावा असें देखील माझ्या मनांत येऊं लागलें.

पण त्याचबरोबर मी नवा मोठा आरसा आणला तर त्याच्यावर कोट्या करून बाकीच्या मुलींना करमणुक करण्याचें एक साधन करून दिल्यासारखें होईल, असें मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

मी त्या आरशांत निरखून पाहूं लागलें. नव्या दृष्टीनें पाहिलेल्या आरशांतील त्या माझ्या प्रतिबिंबाकडे पाहातांना मला अभिमान वाटला. मी नथ घालीत नसें, पण त्यामुळें आरशांतील प्रतिबिंब विरूप दिसत नव्हतें.

खरोखरच माझी खात्री झाली, कीं मी सुंदर आहे. सौंदर्याची जाणीव यापूर्वी माझ्या हृदयांत उत्पन्न झाली नव्हती. नटण्या-मुरडण्याकडे पाहिल्यापासूनच माझी प्रवृत्ति नसल्यामुळें आरशांतील प्रतिबिंबाकडे मी यापूर्वी त्या नजरेनें पाहिलेंच नव्हतें. आतां मात्र मला वाटलें, कीं बाकीच्या मुलींची टीका कांहीं खोटी नव्हती.

कितीतरी वेळ आरशांत दिसणाऱ्या त्या माझ्या चेहऱ्याकडे मी पाहात राहिलें होतें. तें प्रतिबिंब पाहाण्यांत मी इतकी तन्मय झालें होतें, कीं मंजुळा मागें येऊन उभी राहिली तें माझ्या मुळींच ध्यानीं आलें नाहीं. आरसा लहान असल्या-

सुळें आणि तो असिनीवर लहानशा पेटीला टेंकून तिरपा ठेवलेला असल्यामुळें मागें उभी राहिलेली मंजुळा मला दिसून आली नाहीं. सहज पाहातां पाहातां मागल्या बाजूला कुणाचे तरी लुगड्याचे ओचे दिसूं लागल्यानें मी चमकलें; मागें वळून पाहिलें तों मंजुळा उभी !

तिची माझी दृष्टादृष्ट होतांच ती हंसली आणि ह्मणाली, "नुसतीच आरशांत किती वेळ पाहात होतीस ? ही नवीन संवय केव्हांपासून पैदा केलीस ? आज-पर्यंत मी ह्मणत होतें.—मी समजत होतें, कीं तुझ्या ठायीं इतर मुलींसारखा नटवेपणा नाहीं. पण आज आरशांत पाहून तूं आज त्याशींच हंसत होतीस हें जेव्हां माझ्या दृष्टीला आलं तेव्हां मलाही फार आश्चर्य वाटलं."

"खरं आहे," मी ह्मटलें. "तुझं ह्मणणं अक्षरशः खरं आहे, मंजुताई ! आजपर्यंत एक विशिष्ट प्रकारची जाणीव माझ्या कल्पनेंत सुद्धां आली नव्हती, ती आज प्रत्यक्ष झाली. कालच्या गौरीच्या भाषणाचा हा परिणाम ! मी सुंदर आहें हें कालपर्यंत मला माहित नव्हतं. आज मला हें कळलं. तें कळलं म्हणूनच मी आरशांत इतका वेळ पाहात राहिलें होतें. म्हणूनच मी आपल्याशींच हंसत होतें.—नव्हे, हंसत असतांना माझा चेहरा किती खुलतो हें आरशांत पाहात होतें." असें ह्मणून मी आरसा दूर सारला.

मंजुळा अगदीं तटस्थ उभी राहून तारवटलेल्या नजरेनें माझ्याकडे पाहात होती. क्षणभरानें तिला वाचा फुटली आणि ती म्हणाली, "अगदीं उघड उघड कबूल करते आहेस कीं ! संकोच सुद्धां वाटत नाहीं ?"

मी हंसलें. हंसत असतांना माझा चेहरा आरशांत पाहिल्याइतका खुलून दिसल्याची मला जाणीव झाली. मी म्हटलें, "त्यांत कसला संकोच ? जें वाटलं तें तुला सांगितलं. मैत्रिणीशीं कसली चोरी !—"

"खरोखरच तूं सुंदर आहेस." मंजुळा म्हणली. "तुझ्या सौंदर्याची तुला जाणीव कशी नाहीं, याचं राहून राहून मला आश्चर्य वाटे. मी कांहीं सुंदर नाहीं, पण मला कुणी कुरूप म्हणाला नाहीं, तरी मी सुंदर नसल्याबद्दल मला खंत वाटते. म्हणूनच विशेष प्रकारानं केस फिरवून चेहरा खुलण्यासाठीं मी त्यांची प्रभावळ करतें. सौंदर्य नसलं तरी नीटसं दिसलं पाहिजे म्हणून चेहऱ्याची जितकी काळजी घेतली पाहिजे तितकी मी घेत असतें. या गोष्टीकडे तुझं लक्ष

नसे. केव्हां केव्हां मला याबद्दल आश्चर्य वाटे, तर केव्हां कौतुकहि वाटे. माझ्या नजरेनं पाहाणाऱ्या मुलींनं यापूर्वी तुला वेंधळी झटलं असतं. तूं रोज केस विंचरीत होतीस खरी, पण ते विंचरतांना त्यांच्याकडे तुझं लक्ष नसे. कसाबसा बुचडा बांधून टाकतांना तूं नीटसपणाकडे लक्ष देत नव्हतीस खरी, पण त्या वेंधळ्या बुचड्यामुळेंच तुझ्या चेहऱ्याला जास्त सौंदर्य येत होतं, याची जाणीव तुला नव्हती. तूं सुंदर आहेस हें आज तुला कळलं, व तें कळल्यामुळंच तूं आज केस विंचरण्याकडे विशेष लक्ष दिलंस आणि त्याचा परिणामही झाला. पुरुषाच्या नजरेला तो परिणाम कसा दिसेल याची कल्पना मला नाहीं. पण मला मात्र तो कसासाच दिसला. नकळत बांधून टाकलेली केसांची गांठ, विशेषशी काळजी न घेतल्यामुळें भुरभुर उडणारे कुरळे केस या पूर्वी तुझ्या चेहऱ्याला खुलवीत होते. आज तसं दिसत नाहीं. आज सुंदर दिसण्यासाठीं तूं केस विंचरले आहेस, हें सुंदर दिसण्यासाठीं प्रयत्न करणारी माझ्यासारखीच एखादी मुलगी सांगूं शकेल. या जाणिवेमुळंच तुझं सौंदर्य मर्यादित झालं. त्याची रेषा आंखली गेली." असें म्हणून ती तिरक्या मानेनें माझ्याकडे पाहात राहिली.

मला कसेंसेंच वाटलें. दूर लोटलेला आरसा मी हातीं घेऊन माझ्या चेहऱ्याकडे पाहिलें. त्यावेळीं मंजुळेची टीका मला पटली. मी आरसा दूर लोटून दिला, केसाच्या बुचड्याची गांठ सोडली, हातांत फणी घेऊन पुन्हां एकदा केस विंचरले आणि नवी जाणीव विसरून पुन्हां त्यांना गांठ दिली.

"आतां मात्र तूं रोजची गोदूताई दिसतेस खरी !" नाजुक नाजुक हंसत मंजुळा म्हणाली. मी ताडकन् उठून उभी राहिलें. मी असें कां केलें हें माझें मलाच कळलें नाहीं, माझा मलाच राग आला. अशी चूक पुन्हां न करण्याचा मी मनाशीं निश्चय केला.

आरसा लाथेनें भिरकावून दिला, तो भिंतीला आपटून खाळकन् फुटला. त्यासरशीं ओरडून मंजुळा म्हणाली, "काय केलंस हें? आपणा दोघींत मिळून तो एकच आरसा होता ना? आतां मी काय करूं ?"

"जी माझी गैरसोय तीच तुझी. या पुढें मी नटणार नाहीं आणि तुलाही नटूं देणार नाहीं." माझ्या भाषणाचें मंजुळेला काय वाटेल, याचा विचार न करतां मी तडक अंग धुण्यासाठीं निघून गेलें.

त्या दिवसापासून आमच्या खोलींतला आरसा नाहींसा झाला. पहिल्या पहिल्यानें मंजुळेची थोडी गैरसोय होत असे खरी; पण माझ्यामुळें तिनेंही थोडें शहाणपण घेतलें. कुंकु लावतांना पहिल्या पहिल्यानें थोडेसें अवघडल्यासारखें वाटे, पण हळूहळू संवय झाली, तेवढ्यासाठीं देखील आरशाची जरुरी भासेनाशी झाली.

नानाची वृत्ति जी बदलली होती ती तशीच कायम होती. रस्त्यांत भेट होतांच तो तितक्याच आतुरतेनें आम्हां दोघींना नमस्कार करीत असे. त्याजबद्दल मनांतल्या मनांत मला हंसूं येई. एकदोन वेळ त्यानें नमस्कार केल्यावर मी तुच्छतेनें हंसूनही पाहिलें. पण त्याचा परिणाम उलटा झाला. माझ्या हंसण्यामुळें तो कावराबावरा झाला, त्याचे डोळे तारवटले, आणि हृदयांत धक्का बसल्याप्रमाणें तो माझ्याकडे पाहूं लागला.

माझी चूक माझ्या ध्यानांत आली. मी हंसलें एवढेंच फक्त त्याच्या लक्षांत आलें. तें हंसणें तुच्छतेचें होतें कीं इतर कोणत्या प्रकारचें होतें याचा त्यानें विचारहि केला नसावा असें दिसून आलें. माझ्या हंसण्यानें—त्या तुच्छतेच्या हंसण्यानें देखील तो हुरळून गेला.

चुकीची दुरुस्ती करण्यासाठीं दुसऱ्या दिवसापासून त्यानें केलेल्या नमस्काराला प्रतिनमस्कार न करतां मी कपाळाला आंठ्या घालूं लागलें. या गोष्टीचाही त्याच्या मनावर परिणाम झालेला स्पष्ट दिसूं लागला.

कित्येक दिवस असें चाललें होतें. एके दिवशीं मी उलट नमस्कार करीत नाहीं असें पाहातांच तो थांबला आणि ह्मणाला, " गोदूबाई, मला क्षमा करा. माझ्या हातून काय चूक घडली ?"

साहजिक रुक्षपणानें मी त्याला उत्तर दिलें, " चूक कोणती आणि ती कशाबद्दल ? जिथं कांहींच नाहीं तिथं बरोबर काय आणि चूक काय याची वाटाघाट कशाला ? '

तो बावरल्यासारखा दिसला. तोंडावर घुटमळणारे शब्द मागें घेऊन तो म्हणाला, " पूर्वी मी तुमचा गुन्हा केला होता; पुढें माझी चूक माझ्या लक्षांत आली. मी गृहस्थपणानं वागूं लागलों, जातायेतांना नमस्कार केला तर तुह्मी नमस्कार घेत होतां; केव्हां केव्हां त्या नमस्काराबद्दल तुह्मांला कौतुक वाटल्याचंही दिसून येत होतं—पण मध्येंच तुमची वृत्ति बदलली. माझ्या नमस्काराचा स्वीकार करण्याचं तुह्मीं एकदम बंद केलंत. तें कां ? माझी कांहीं चूक झाली का ?"

मला हसूं येत होतें, पण हंसलें असतें तर नानानें त्याचा भलताच अर्थ घेतला असता या कल्पनेमुळें तें हंसें आवरून मी झटलें, "कुणाची चूकच झाली असेल तर ती माझीच. तुमच्या नमस्काराला मी प्रतिनमस्कारच करायला नको होता. पण तुमच्या नमस्कारामुळं साहाजिक हात वर जात असत आणि नमस्कार होत असे. तो नमस्कार बुद्धिपुरस्सर नव्हताच. मला वाटलं, त्या नमस्कार करण्याचा विपर्यास होतो आहे—ही चूक ध्यानीं येतांच मी प्रतिनमस्कार करण्याचंच बंद केलं."

पुढलें भाषण ऐकण्याची अपेक्षा न करतां मी तेथून चालती झालें. वाटेंत गौरी भेटली; मंजुळा तिच्याबरोबरच होती.

कुचेष्टेनें हंसत गौरी झणाली, "असं. एकूण ह्यावर मजल आली! चोरट्या भेटी होऊं लागल्या! मंजुळाताई, हीच ना तुमची सडेतोड गोदु गोखले? आतां कुठं गेला तो सडेतोडपणा? कशा गुलुगुलु गोष्टी चालल्या होत्या त्या तुझीं प्रत्यक्ष पाहिल्या ना? त्यापेक्षां आपल्या आझींच बऱ्या. उगीच मिरवीत नाहीं कीं 'लव्ह अॅफेअर्स' ही करीत नाहीं."

मला अगदीं मिरमिरी आली होती. काडकन् एक थोबाडींत देण्यासाठीं माझे हात वळवळत होते. पण आत्मसंयमन करून मी झटलें, "कोणतीही स्त्री कुठल्याही पुरुषाबरोबर बोलली, कीं तें 'लव्ह-अॅफेअर'च होतं का?"

मोठमोठ्यानें हंसत गौरी झणाली, "असं कुठं मी झटलं! बहिण भावाशीं बोलत असली, किंवा बाप मुलीशीं बोलत असला, तर कुठं कोण कांहीं झणतं आहे? पण नाना कवि आहे. एका अज्ञान प्रणयिनीवर त्यानं लिहिलेल्या कविता साऱ्या कॉलेजांत 'सर्क्युलेट' झाल्या आहेत. ही अज्ञात प्रणयिनी झणजे गोदूच कीं काय असं कुणी सूचकतेनं विचारलं, तर तो नुसतं हंसतो, लाजतो, पुरुषी मुरका मारतो. साऱ्या कॉलेजांत हा विषय सर्वतोमुखीं झाला आहे. अशा वेळीं तूं एकटीच त्याच्याशीं किती वेळ बोलत राहिलीस तर माझ्यासारखीच्या मनांत जें कांहीं येतं तें मी नुसतं बोलून दाखवलं. त्याला 'लव्ह अॅफेअर' झणायचं नसेल, इंग्लिश नांव द्यायचं नसेल, तर एखादा संस्कृत शब्द सांग—तूं संस्कृत स्कॉलर आहेस कीं नाहीस? तुलाच तो सुचेल—यापुढं मी तो शब्द वापरीत जाईन."

गौरीच्या भाषणाचें मंजुळेलाही वाईट वाटल्यासारखें दिसलें. ती म्हणाली, " हिचं काय ऐकतेस गोदूताई ? स्वभावाला औषध नाहीं. कॉलेजच्या आवारांत हें असं व्हायचंच. अभ्यासाच्या वेळाखेरीज राहिलेल्या रिकाम्या वेळीं कांहीं तरी करमणुक पाहिजे असते ना ? कॉलेजच्या आवारांत ह्या असल्या करमणुकी चालायच्याच. यापेक्षां त्याला जास्त किंमत देऊं नये. " असें म्हणून तिनें माझा हात धरला आणि जवळजवळ मला ओढीतच आंत नेलें.

मला भांडणाचें अवसान आलें होतें. मंजुळेनें मला ओढून नेलें नसतें, तर गौरीबरोबर मी चांगलाच वादविवाद केला असता. मला मंजुळेचा राग आला.

मी स्पष्टपणें तिला तसें सांगितलें, तेव्हां ती म्हणाली, " पण वादविवादांत कांहीं अर्थ नाहीं. यापूर्वी तूंच मला उपदेश करीत होतीस ना ? आतां तेंच तूं कसं विसरतेस ? बाई ग, कोळसा उगाळावा तेवढा काळाच होतो. उत्तराला प्रत्युत्तर देतांना आवेशाच्या भरांत चुकून एखादा शब्द जातो आणि गौरीसारखी माणसं तेवढ्या एका शब्दाच्या राईचा पर्वत करतात. अशा वेळीं न बोलण्यासारखं सुख नाहीं. चिडणारालाच कुणी तरी चिडवीत असतं. या कॉलेजच्या आवारांत सहनशीलतेसारखं दुसरं पांघरूण नाहीं. "

गौरीच्या कुचेष्टेनें मस्तकाला चढलेलें रक्त खालीं उतरतांच माझी चूक माझ्या ध्यानांत आली. पुन्हां या विषयावर वादविवाद न करण्याचा मी मनाशीं निश्चय केला.

दुसऱ्याला उपदेश करणारी मी, ती मीच अशा चुका कशा करूं लागलें, याचें माझें मलाच आश्चर्य वाटूं लागलें. विचाराअंती माझ्या स्वभावांत कांहीं तरी फरक पडत आहे, असें मला दिसून आलें. वाढत्या वयामुळें असो किंवा परिस्थितीमुळें असो, होत असणारा फरक ताब्यांत ठेवला पाहिजे याची जाणीव होऊं लागली. शक्य तेवढें करून मी गौरीच्या वाटेला जाण्याचें सोडून दिलें.

नानाच्या बाबतींतही मी तोच उपक्रम सुरू केला होता. तो समोरून येतो आहे असें दिसून आलें, कीं मी रस्ता बदलूं लागलें. पण माझ्या ह्या वर्तनाचाही विपर्यास होऊं लागला. गौरीच्या वाटेला मी जात नसें खरी; पण क्लासांत तिला टाळणें शक्य नसे. क्लासांत आम्ही मुली सर्वांतील पुढल्या रांगेत असलेल्या एका बाजूच्या बांकावर बसत असूं. त्यावेळीं मला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें मा

प्रकाराबद्दल चर्चा करून भलभलते कुतर्क काढण्याचा उपक्रम गौरीनें सुरू केला होता. ती माझ्याच क्लासांत होती त्यामुळें तिला टाळणें मला शक्यच नव्हतें. ती कांहींही बोलली, तिच्या त्या बोलण्यामुळें कितीही चीड आली, तरी त्या गोष्टी-कडे दुर्लक्ष करायचें असेंच मी ठरविलें होतें. याच प्रकारामुळें आत्मसंयमनाचे पाहिले धडे मला घेतां आले.

कॉलेजच्या परिस्थितींत याच वेळीं एकदम एक फरक घडून आला. विलायतेहून रँग्लर होऊन आलेले आणि कॉलेजांत कांहीं दिवस प्रोफेसरीचें काम करीत असलेले एक प्रोफेसर एकदम प्रिन्सिपल झाले. ते वयानें अगदींच तरुण होते---अगदीं पोरसवदा होते. जुन्या खोडांना टाकून एका तरुणाला एकदम प्रिन्सिपॉलची जागा दिल्यामुळें पुष्कळांना वैषम्य वाटत होतें. कॉलेजांत मुलांमुलींतसुद्धां तो चर्चेचा विषय होऊन बसला होता. वाटाघाट करायला एवढा मोठा विषय मिळाल्यामुळें मुलांचें लक्ष कांहीं दिवस माझ्यावरून दूर झालें. तेवढीच मला विश्रांति मिळाली.

या सार्वजनिक चर्चेत मी कधींच भाग घेतला नाहीं. साहाजिकच माझी सहानुभूति प्रिन्सिपलसाहेबाकडेच होती. कमी वयाच्या व्यक्तीला मोठा मान मिळाला तर सामान्य लोकांना त्याचें कसें वैषम्य वाटतें याचा मला स्वतःलाच अनुभव होता. त्या अनुभवामुळेंच माझी सहानुभूति प्रिन्सिपलसाहेबांकडे वळली होती.

इतर प्रोफेसरांच्या मानानें हे नवे प्रिन्सिपल जरी वयानें अगदींच लहान होते, तरी स्वभावानें मोठे बाणेदार होते. गणित हा त्यांचा विषय असल्यामुळें आणि माझा तो विषय नसल्यामुळें अध्यापक ह्या नात्यानें त्यांच्याबद्दल मला कांहींच मत देतां येत नव्हतें. पण कुणी त्यांचें तरुण वय आणि अधिकार यांची सांगड घालून त्यांना दोष देऊं लागला तर माझ्या विवादी जिभेला नकळत चलन मिळत असे.

या गोष्टींचीही थट्टा होऊं लागली. पण त्या थट्टेंत कुचेष्टेचा पाया असण्याइतका जहरीपणा नव्हता. गौरी म्हणत असे, " आमच्या गोदूताईदेखील आतां रँग्लर होणार आहेत. त्यांचे वडील मोठे ऑफिसर आहेतच कीं नाहींत ! ते सहज त्यांना विलायतेला पाठवतील. आणि विलायतेहून त्या रँग्लर होऊन परत आल्या, म्हणजे त्यांना देखील एखादी प्रिन्सिपलची जागा मिळेल. म्हणून त्या रँग्लरच्या पदपानं

एवढ्या भांडतात ना ! चौदाव्या वर्षी मॅट्रिक होणाऱ्या मुलीनं जर रँग्लर व्हायचं नाहीं, तर काय मंजुळेसारख्या बुड्ढ्या आजीबाईनं व्हायचं ? "

तिच्या ह्या थट्टेचा मला राग येत नसे. उलट कौतुकच वाटे.

ही प्रिन्सिपलसोहळ्यांची चर्चा हळुहळु मावळूं लागली. सर्वांचें लक्ष पुन्हा नानाकडे वळलें.

त्याला एक कारण झालें. क्लासांत मी ज्या बांकावर बसत असें त्या बांकावर बसण्याची माझी एक ठराविक जागा होती.—किंबहुना, सर्वच मुलींच्या अशा ठराविक जागा होत्या. त्यांतील माझ्या त्या जागेवर एके दिवशीं 'कॅपिटल' अक्षरांनी लिहिलेलें दिसून आलें: "Godu, I love you.—yours Nana."

तो विचित्र लेख माझ्या दृष्टीला पडतांच मी माझ्या अध्यापकाच्या तो नजरेला आणला. कांहीं तरी विशेष झालें आहे असें दिसून येतांच क्लासांतील सारेच विद्यार्थी गोळा झाले. प्रत्येक विद्यार्थी येऊन मोठ्यानें तें वाक्य वाचून जाऊं लागला. प्रत्येकाच्या तोंडून निघालेलें तें वाक्य ऐकतांच मी लाजेनें अर्धमेली होऊन गेलें. ही नवीन संवेदना माझ्या ठायीं कुठून उत्पन्न झाली,—एवढी सडेतोड मी, मला लाज कां वाटूं लागली, याचें निदान मला मुळींच करतां येईना.

शिपायाकरवीं प्रोफेसरांनी तें वाक्य पुसून टाकलें खरें, पण माझ्या वर्गबंधूंच्या अंतःकरणांतून तें पुसलें गेलें नाहीं. मी रस्त्यानें जाऊं लागलें तर मला ऐकूं येईल एवढ्या मोठ्यानें प्रत्येकजण नानाच्या नांवासकट तें वाक्य उच्चारूं लागला.

दुसऱ्या दिवशीं एक चमत्कार झाला. मंजुळा आणि मी खोलींत अभ्यास करीत बसलों असतां खुद्द नानाच तिथें आला.

प्रकरण ९ वें.

# बाणासुराख्यान !

आम्ही दोघीही आश्चर्यानें थक्क झालों. आधीं आम्हां मुलींच्या राहण्याच्या जागेकडे कुणी पुरुष विद्यार्थी येतच नसे; कॉलेजच्या शिस्तीप्रमाणें त्यांना त्या बाजूला येण्याची बंदी होती. असें असतांना नाना आला—एवढें धाडस त्यानें केलें. हें असें धाडस त्यानें कां केलें याचाच आम्हांला प्रश्न पडला.

पहिली कल्पना मनांत आली ती ही, कीं नाना आजपर्यंत जो दांभिकपणा दाखवित होता, आमच्याशीं सभ्यपणानें वागण्याचा जो आव आणीत होता त्याच्या निराकरणाशींच त्याच्या येण्याचा संबंध आहे. तें तसलें वाक्य बांकावर लिहिल्यानंतर त्यानें यावें हेंच मोठें चमत्कारिक होतें. कॉलेजांतील प्रत्येक विद्यार्थ्याच्या चर्चेचा तो विषय झालेला असल्यामुळें उघड उघड त्यानें आमच्या खोलीकडे येण्याचें धाडस कसें केलें याचेंच मला स्वतःलाही आश्चर्य वाटलें.

क्षणभर एकमेकींकडे आणि क्षणभर नानाकडे पाहात कांहीं क्षण गेले. नाना येऊन उभा राहिला त्यावेळीं आम्हां दोघींपैकीं कुणींच कांहीं बोललों नाहीं. 'या बसा' म्हणण्याचा औपचारिक विधीही केला नाहीं किंवा निघून जाण्याचीही इच्छा दर्शवली नाहीं.

त्याचमुळें त्याच्या मनाचा घोटाळा उडाल्यासारखा दिसत होता. जावें कीं राहावें, बोलावें कीं न बोलावें त्याचा त्याला कांहीं निश्चय करतां येत नव्हता असें त्याच्या चर्येवरून दिसत होतें. त्याचे ओठ हालत होते, पण तोंडांतून शब्द बाहेर फुटत नव्हता. वेळ सकाळची होती, पण त्याच्या मस्तकावर डबडबून घाम आला होता. त्याची ती स्थिती पाहून मला वाटलें, कीं बोलण्याला सुरवात आपणच करावी.

मी विचारलें, "हॉस्टेलचे नियम माहित असतांना तुम्ही इकडे आलांत, हें शिस्तीच्या विरुद्ध झालं नाहीं का ?"

"आग लागो त्या शिस्तीला !" असें म्हणून तो भरकन् खुर्चीवर बसला. आधींच त्याचे पाय लटपटत होते, पण शब्द तोंडांतून बाहेर पडतांच त्याचें सारें उसनें अवसान जेथल्या तेथें नाहींसें झालें.

तो पुन्हां ह्मणाला, " आग लावा त्या शिस्तीला ! क्षमा करा,—पण काय करूं ? काळीज पेटलं ह्मणजे असभ्य शब्द तोंडावाटे बाहेर जातात. कुणातरी दुष्टानं माझा दावा साधला, माझ्या नांवाची बदनामी करण्यासाठीं कुणी तरी दुष्टानं तें तसलं वाक्य—" त्यानें डोक्याची टोपी काढली आणि खिशांतील रुमाल काढून डोक्याचा घाम पुसला. त्याची जीभ कोरडी पडल्यासारखी झाली होती. तो ह्मणाला, " प्यायचं पाणी आहे का इथं ? "

मोठी पंचाईत आली. माझी खात्री होती, कीं नाना ज्यावेळीं खोलींत आला त्यावेळीं तो आल्याचें पाहिलेंच असलें पाहिजे कुणी ना कुणीतरी; किंवा साऱ्याच जणी खोलीच्या आजूबाजूला टेहेळणी करीत असल्याच पाहिजेत. मी होऊन नानाला पाणी आणून दिलें असतें तर त्याच्यावर भलत्याच इमारती रचल्या गेल्या असत्या. मंजुळा नुसती पाहात राहेली होती. मी तिला नुसती डोळ्यानें खूण केली. ती नुसत्या मानेनें नाहीं ह्मणूं लागली. नानाच्या तें नजरेला आलें व तो ह्मणाला, " तुह्मांला संकोच नको; पाणी कुठं आहे तें दाखवा, मीच घेतों. "

पाण्याचें भांडें पुस्तकांच्या कपाटाच्या आड होतें. मी तें हातानेंच पुढे लोटलें. मी आपल्या जागयावर बसत होतें, तोंच नाना पाणी घेण्यासाठीं पुढें सरसावला; आणि त्याबरोबरच बाहेर टाळ्यांचा कडकडाट झाला. नानाच्या हातून पाण्याचें भांडें खालीं पडलें.

मी खोलीबाहेर येऊन पाहातें तों हॉस्टेलमधील साऱ्या मुली तेथें गोळा झाल्या होत्या. मला त्यांचा अनावर राग आला होता खरा; पण तो तसाच गिळून मी शांतपणानें म्हटलें, " या, साऱ्याजणी आंतच या. बाहेर कां उभ्या राहिलांत ? "

गौरी पुढें सरसावून म्हणाली, " आम्हीं कशाला आंत येऊं ? आमचा काय संबंध आहे ? आमच्या प्रेमाचे शिलालेख कांहीं बांकावर लिहिले जात नाहींत ! "

मी ह्मटलें, " पण मंजुळा आहे ना आंत ? एक काय आणि एकवीस काय, सर्व सारख्याच. "

गंभीर चेहेरा करून गौरी म्हणाली, " असं कसं होईल ? उषेचीं रहस्यं चित्रलेखेला माहिती होतीं; अनिरुद्ध आला म्हणजे चित्रलेखा कांहीं दूर जात नसे. पण बाणासुराजवळ उषा चोरीच करीत होती कीं नाहीं ? "

मी हंसत हंसत म्हटलें, " खरं आहे, पण ही उषा कांहीं कुठल्या बाणासुराला भीत नाहीं. जिथं अनिरुद्धच नाहीं तिथं बाणासुराची भीति कशाला? तेव्हां म्हटलं, सर्व बाणासुरांनीं कृपा करून आंत यावं."

कोणी येतात कीं न येतात तें न पाहातां मी आंत आलें. मंजुळा नानाकडे न पाहातां पुस्तक घेऊन वाचीत होती. पाणी पिऊन नाना पुन्हां मुळच्या जागीं येऊन बसला होता. झालेल्या प्रकारामुळें तो पूर्वीपेक्षांहि कावराबावरा झाला होता. मी आपल्या जागीं जाऊन बसतांच तो कांचरत कांचरत म्हणाला, " सर्वांसमक्ष? या साऱ्या भुतावळीसमक्ष?—"

" हो, सर्वांसमक्ष. ही जर भूतावळ असेल तर मी त्यांतली बडी हडळ आहे, हें ध्यानांत ठेवा."

माझ्या तोंडून हें वाक्य निघतें न निघतें तोंच सर्व मंडळी आंत आली. मी म्हटलें, " ही घ्या आली सारी भुतावळ. आतां बोला."

" म्हणजे? यापूर्वी कांहींच का बोलणं झालं नाहीं?" गौरी म्हणाली.

" नाहीं." नाना म्हणाला. आतां त्यालाहि जरा आत्मविश्वास आला होता. " नाहीं, यापूर्वी कांहींच बोलणं झालं नाहीं. आणि मला जें कांहीं बोलायचं आहे त्यांत कांहीं चोरी नाहीं."

" मग भूतावळीसमक्ष बोलायचं नाहीं असं का म्हणालांत?" गौरी म्हणाली.

नानानें शांतपणानें उत्तर दिलें, " तत्कालीन भ्याडपणाची मला लहर आली होती, ती आतां मेली. तुम्ही साऱ्या जणीं एकदम आंत आल्यानं मला आत्मविश्वास उत्पन्न झाला. बोलायचंच, मग चोरी कां? आड बोलल्यानं उत्पन्न झालेले गैरसमज माझ्या आठवणींत आहेत. ऐका, काल बांकावर जें वाक्य लिहिलं होतं त्याच्याशीं माझा यत्किंचितही संबंध नाहीं. माझं अक्षर जर तुम्ही पाहिलं असतं—"

गौरी मध्येंच म्हणाली, " पाहिलं असतं; पण एवढं कुठं आमचं भाग्य? आमच्यासारख्यांना थोडेंच तुम्ही पत्र पाठविणार आहांत!"

मंजुळा रागावून म्हणाली, " प्रसंगाचा गंभीरपणा तुला कांहीं कळतो का गौरी? इतक्या जणी तुम्ही इथं जमला आहांत त्यांत तो बिचारा एक पुरुष

प्रसंगानं सांपडला आहे, मनमोकळं करून बोलतो–बोलणार असं ह्मणतो आहे, त्याला तेवढी संधिसुद्धां नाहीं का यायची ? "

नानानें सुरवात केली, " तुह्मी माझं अक्षर पाहिलं असतं तर थांकावर लिहिलेलं अक्षर माझं नव्हे हें तुह्मांला तेव्हांच कळलं असतं. मी तें लिहिलं नाहीं आणि इतक्या उघड लिहिण्याइतका मी मूर्खही नाहीं. मला काय वाटतं किंवा काय वाटत नाहीं, हें दुसऱ्या कुणाला सांगतां यायचं नाहीं. चर्चेसाठीं क्षणभर गृहीत धरलें, कीं मला तसं कांहीं वाटत होतं, तर उघडपणें मी तें लिहिन काय ? पत्रव्यवहार करायचा असता तर तो मी गुपचुप केला असता. पहिल्यापासून मी गोदूबाईंची बदनामी करीत आलों होतों, त्यांत कांहीं विष नव्हतं—बोर्डिंगबोर्डिंगांतून अशा कुचाळ्या चालायच्याच. पण पुढें माझे डोळे उघडले. त्याला कांहीं विशेष कारण झालं असं नाहीं. पण कांहीं दिवसांनीं माझी मलाच लाज वाटूं लागली. इतरांनीं माझ्या कुचाळ्या करण्यास सुरवात केली होती. त्याचं मला काय वाटतं याचा मी ज्या वेळीं विचार करूं लागलों त्यावेळीं माझ्या वेडेपणाची मला साक्ष पटली. मला पश्चात्ताप झाला. इतरांच्या कुचाळ्या सुरू होत्या. आणि मी मात्र त्यांत भाग घेत नव्हतो. मी त्यांच्यांतून फुटलों असं त्यांना वाटलं. माझ्यावर सूड उगवण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि—त्यांनीं हा असा सूड उगवला. "

गौरीनें विचारलें, " त्यांनीं ह्मणजे कुणी ? एवढंसं लिहायला इतकी का माणसं लागतात ? "

नाना ह्मणाला, " लिहायला इतकी माणसं लागत नाहींत खरी; पण काम काय करायचं,–कशा रितीनें माझी फजिती करायची—माझी बदनामी करायची हें मात्र सर्वांनी संगनमत करून ठरवलं. लिहिलं एकानेंच आणि तें अशा माणसानं लिहिलं कीं—" असें ह्मणून तो स्तब्ध राहिला.

" कुणी लिहिलं ? " गौरीनें विचारलें.

पुन्हां एकदां कपाळावरचा घाम पुसून नाना ह्मणाला, " तोही माझ्यासारखाच एक पश्चात्ताप झालेला माणूस आहे. कॉलेजांतल्या ' लेडीज ' ची पूर्वी मी कुचाळी करीत होतों त्यावेळीं तो त्यांची तरफदारी करीत होता. मला पश्चात्ताप झाला, मी कुचाळी करण्याचं बंद केलं; त्याला पश्चात्ताप झाला, त्यानें कुचाळी करायला सुरवात केली—"

नाना पुन्हां स्तब्ध राहिला.

" कोण तो ?" गौरीनें पुन्हां विचारलें.

नाना क्षणभर स्तब्ध राहिला. सर्व मंडळी अगदीं कान टवकारून राहिलीं होती. नुसता एखादा श्वासोच्छ्वाससुद्धां सुटत नव्हता. सर्वांचा प्राण जणूं काय डोळ्यांत आला होता. तो एवढासा क्षण मला सुद्धां केवढा तरी मोठा वाटला.

मान खालीं घालून नाना ह्मणाला, " काका. "

" कोण ?" मंजुळा मोठ्यानें उद्गारली.

"होय, काकाच." नाना ह्मणाला. " तुमचं नांव गोवून यापूर्वी ज्याची आह्मी थट्टा करीत होतों तोच काका."

" शक्य नाहीं." मंजुळा धीमेपणानें ह्मणाली. " काका असं केव्हांही करणार नाहीं. निदान गोदुताईच्या बाबतींत तरी खास नाहीं. यांत तुमचा कांहीं तरी डाव आहे. करून सवरून आपलं किटाळ दुसऱ्यावर घालायचा हा कावा आहे."

नाना पुन्हां क्षणभर स्वस्थ राहिला. मलाही थोडी शंका आली. नव्हे, मंजुळे-सारखेंच मलाही वाटलें. नानाचा चांगुलपणा हें ढोंग आहे कीं काय, असा प्रश्न यापूर्वीच माझ्या मनांत येत असे. आतां जवळ जवळ खात्री झाली.

नाना शांतपणानें ह्मणाला, " खरं माना किंवा मानूं नका; आहे ही वस्तुस्थिति अशी आहे. पन्नास जणांदेखत काकानं ही गोष्ट कबूल केली आहे. नव्हे, मोठ्या दिमाखानं सांगितली आहे. माझा सूड उगवण्यासाठीं असं केलं, असं कबूल करायलाही तो चुकला नाहीं. माझे डोळे उघडले. काकाची लायकी मला कळली. चांगुलपणाचा त्याचा आव उघडा पडला. ज्यावेळीं त्यानं हें सांगितलं त्यावेळीं तुह्मी तिथं असता तर मी जें केलं तेंच तुह्मी केलं असतं."

" काय केलं तुह्मीं ?" गौरीनें विचारलें.

"मी त्याच्या एक थोबाडींत भडकावली." असें ह्मणून नानानें पुन्हां रुमालानें घाम पुसला. तो पुढें ह्मणाला, " आज ही तक्रार प्रिन्सिपॉलसाहेबाकडे जातच आहे; त्यावेळीं तुमची आपोआप खात्री होईल. " असें ह्मणून नमस्कार करून तो खोलीबाहेर चालता झाला.

सर्वजणी कांहीं वेळ एकमेकाकडे टकमक पाहात राहिल्या.

गौरी ह्मणाली, " कोण साव आणि कोण चोर हें कांहींच सांगतां

यायचं नाहीं. पण नानाच्या शब्दावर विश्वास ठेवावा की नाहीं याची-अजूनही मला शंका येते. त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलं, कीं तो जाणूनबुजून सभ्य-पणाचा आव आणीत होता असं उघड उघड फुटून पडत होतं. आह्मी–तुह्मी काकाची कुचेष्टा करीत होतो, आह्मींसुद्धां मंजुळाबाईंचा छळ केला नाहीं असा नाहीं, पण असलं कांहीं करण्याइतकी आमची मजल गेली नाहीं ! कांहीं ह्मण गोदूताई, पण यांत नानाचा डाव दिसतो. अक्षर ताडून पाहण्यापूर्वी पुसून टाकण्यांत प्रोफेसर साहेबांनीं उगीच घाई केली."

मी ह्मटलें, "पुरुषांचा कड पुरुष घेणारच; पण त्यांत थोडीशी आह्मीही चूक झाली. काय झालं कोण जाणें, पण मला त्यावेळीं मोठं चमत्कारीक वाटलं. इतक्या मुलांनी तें येऊन तें वाक्य पुन्हां पुन्हां वाचलं, कीं त्यामुळें माझा थर-कांप झाला, माझी नित्याची प्रवृत्ति विसरली गेली. झाल्या गोष्टीचा पुरा तपास करण्याचा आग्रह मी धरला पाहिजे होता. पण तें तसलं वाक्य पुन्हां पुन्हां इतक्या मुलांच्या तोंडून ऐकूं येऊं लागल्यामुळं मी घाबरीघुबरी झालें. केव्हां एकदां कुणी तें पुसून टाकील, असं मला वाटलं. प्रोफेसरसाहेबांनीं तें पुसायला सांगितलं आणि मी त्यांना अडथळा केला नाहीं. आतां वाटतं, अक्षर ताडून पाहिलं नाहीं ही मोठीच चूक झाली."

आपापल्या परीनें या विषयाची चर्चा करीत सर्वजणी हळू हळू निघून गेल्या. मी आणि मंजुळा एकट्याच राहिलों. तिरीमिरीच्या शब्दांत मंजुळा ह्मणाली, "चल, अशीच जाऊन काकाला विचारूं."

"त्यांनीं शिस्त मोडली तशी आपल्याला मोडतां येत नाहीं. पुरुषांच्या चुकीकडे काणा डोळा होईल, पण आह्मीं तसं केलं तर त्याचा भलताच बोजवारा होईल."

मंजुळा क्षणभर अगदीं स्तब्ध राहिली. मीही तशीच विचार करीत स्वस्थ बसलें होतें. कांहीं तरी करून या प्रकाराचा पुरा तपास लावावा असें मलाही वाटत होतें; पण हें निराकरण व्हावें कसें ? कांहींच न करतां स्वस्थ बसावें, असें आह्मी दोघींनीं ठरवलें.

नानानें थोबाडींत भडकाविल्याची तक्रार त्याच दिवशीं प्रिन्सिपॉल साहेबाकडे गेली आणि या प्रकरणांत काकानें भलतीच कोल्हाट उडी मारली. आह्मी दोघी-

नाही बोलून प्रिन्सिपॉलसाहेबांनी सर्व हकीकत सांगितली. आम्ही समोर जातांच तेही एक प्रकारें कावरे बावरे झाले. बोलत असतांना त्यांनी आमच्या डोळ्याला डोळासुद्धां दिला नाहीं. ते म्हणाले, “ असले प्रकार माझ्या कॉलेजमध्यें होणं इष्ट नाहीं. काका म्हणतात, कीं नानानं स्वतःच तें वाक्य लिहिलं आणि त्याचा आळ काकावर घातला. पूर्वीपासून नाना तुमची दोघांचीही चेष्टा करीत असे, हें चौकशीअंती मलाही पटलं. अक्षर पुसून टाकण्यांत तुमच्या प्रोफेसरनीं घाई केली; नाहीं तर खरा प्रकार उघडकीस आणणं अशक्य झालं नसतं. दोघा-नींही चेहरे असे बेमालुम बनवले होते, कीं त्यांच्या चेहऱ्यावरची एक रेषाही हालत नव्हती. मुद्रेवरून अंदाज करायचा तर कोणता साव आणि कोण लुच्चा हें कोणालाच ठरवतां आलं नसतं, म्हणूनच दोघेही लुच्चे आहेत असं मी आपल्या मनाशीं ठरवलं. यामुळं तुम्ही उभयतांनी त्या दोघांशीं ओळखसुद्धां दाखवूं नये अशी माझी मित्रत्वाच्या नात्याची सूचना आहे. ”

तो सारा दिवस आम्हां दोघींनाही मोठा कंटाळवाणा गेला. कुणीच कुणाला कांहीं सांगत नव्हतें. दोघीही आपल्या मनाशींच विचार करीत होतों. सारख्या बडबडत राहाणाऱ्या आम्ही, पण त्या दिवशीं दोघींच्यामध्यें एक प्रकारची भिंत उभी राहिली.

काकाच्या चांगुलपणावर मंजुळेचा विश्वास होता. पूर्वीच्या इतिहासाकडे पाहिलें तर नानाचा टारगटपणा माझ्या दृष्टीनें पटला होता. काय असेल तें असो, एवढा सगळा प्रकार झाल्यानंतर नानाच सच्चा आहे असें मला वाटूं लागलें. कोणाचा तरी दांभिकपणा होता यांत शंका नव्हती. तो दांभिकपणाचा आळ काकावर लादावा, असें मला कां वाटूं लागलें, हें माझें मलाच समजेना.

कॉलेजच्या राहणीचा मला तिटकारा येऊं लागला. नको हें हॉस्टेल, कुठें तरी आपलें गांवांतच जाऊन राहावें असेंही मनांत येऊं लागलें. एकदा तर असेंही वाटलें, कीं मुळीं कॉलेजच सोडून द्यावें !

पण हा तात्कालिक भ्याडपणा फार वेळ टिकला नाहीं. मूळची वृत्ति उसळून वर उठली. चार टारगट पोरें कुचेष्टा करतात, एवढ्याचसाठीं जर मी कॉलेज सोडून गेलें तर माझा अभिमान तो काय राहिला ? इतर मुलींपेक्षां मी निराळी

आहे-इतर मुली भ्याड आहेत, मी धीट आहे असें प्रतिस्पर्धी सिद्ध करून देण्याचा जो माझा अट्टाहास चालत असे त्याची काय वाट ?

काय होईल तें होवो, जो प्रसंग येईल त्याला तोंड द्यायचें असें मी ठरवलें. नाना-काकाच्या प्रकरणांत कुणालाच शिक्षा झाली नाहीं. बांधावरच्या लिखाणाचाही मुद्देसूद पत्ता लागला नाहीं. हा प्रकार मी विसरून जाईन असें मला वाटलें होतें; पण तसें झालें नाहीं. तें वाक्य म्हणजे कॉलेजच्या पुरुष विद्यार्थ्यांचें एक वेदवाक्य होऊन बसलें. पुलावरच्या समितीचे सभासद वाढूं लागले. मी रस्त्यानें जाऊं लागलें, कीं दोन बाजूला दोन टोळ्या करून ते बसत असत. एकानें पहिलें वाक्य म्हणावें आणि दुसऱ्या टोळीनें 'पुरवसे नाना' असें म्हणावें असें प्रत्यहीं चालावें.

तरीही आम्हीं माघार घेतली नाहीं. टोळीच्या मधून फिरायला जाण्याचें बंद केलें नाहीं.

इतक्यांत एक चमत्कार झाला. एके दिवशीं नानाचें मला पत्र आलें.

---

# प्रकरण १० वें.

# पुणें सोडलें.

पत्रावर अगदीं उघड उघड पाठविणाराचें नांव घातलें होतें. ही धिटाई पाहून मला आश्चर्य वाटलें. या गोष्टीचा बभ्रा झाल्यावांचून राहाणार नाहीं ही कल्पना येतांच पत्र तिथल्या तिथेंच फाडून टाकावें, असा पहिला विचार मनांत आला.

पण फाडून टाकण्यांत काय अर्थ होता? नानाचें पत्र आलें आहे, याचा एकदा आरडाओरडा झाल्यावर तें मी वाचलें असें गृहित धरलें जाणारच.

एकदा मनांत असें आलें, कीं पत्र न उघडतां तसेंच्या तसेंच प्रिन्सिपलसाहेबांच्या हवालीं करावें. पण मनांतल्या जिज्ञासेचा वरचष्मा होत होता. इतक्या धिटाईनें पाठविलेल्या पत्रांत असें लिहिलें आहे तरी काय, हें जाणण्याची थोडीशी उत्कंठाच वाटत होती.

पत्र हातांत घेऊन न उघडतांच मी तें उलटून पालटून पाहात होतें, तोंच मंजुला तेथें आली. कांहीं न बोलतां कव्हर मी तिच्यापुढें केलें. तिनें तें पाहिलें आणि तिलाही आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें.

ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून मी ह्मटलें, "काय करायचं? उघडून पाहायचं कीं असंच परत करायचं? फाडून टाकायचं कीं प्रिन्सिपलसाहेबांना नेऊन द्यायचं?"

ती पत्र हातांत घेऊन नुसतें माझ्याप्रमाणेंच उलटून पालटून पाहात होती. पत्र एक क्षणभर आपल्या नजरेपुढें धरून ती ह्मणाली, "मला वाटतं, उघडून पाहावं. प्रिन्सिपलसाहेबांना दाखवण्याजोगं असलं तर नंतर दाखवावं. कदाचित् आंत महत्वाचं असं कांहींच नसेल आणि प्रिन्सिपलसाहेबांच्या तें हातीं गेलं तर निष्कारण त्याची बदनामी होईल, त्यापेक्षां आपणच वाचलेलं काय वाईट?"

माझ्या डोक्यांत एक कल्पना आली. मी ह्मटलें, "असं कर, तूंच तें वाच. मला दाखवण्याजोगं असलं तर दाखीव, नाहींतर तूंच परभारें प्रिन्सिपलसाहेबांच्या हवालीं कर." असें ह्मणून मी बाजूच्या खुर्चीवर बसलें.

तिनें उघडून तें पत्र वाचलें. वाचीत असतांना तिच्या चेहऱ्यावर मधून

मधून हंसण्याची झुळुक येऊन जात होती; पण एकदम तिची मुद्रा पालटली आणि तिच्या तोंडून नकळत उद्गार निघून गेला, "चांडाळ आहे झालं!"

मी खुर्चीवरून न उठतांच विचारलं, "काय झालं?"

तिनें तें पत्र माझ्या अंगावर भिरकावलें. पत्रांतील मजकूर मोठा सोज्वळ होता असें नाहीं. सुरवातीला पूर्वी त्याच्या आणि आमच्या भाषणांत झालेल्या हकीकतीची पुनरुक्ति होती. त्यापुढील मजकूर साधारणपणें अशा अर्थाचा होता:—

"...बांकावर लिहिलेलें वाक्य जरी मी लिहिलें नव्हतें तरी विश्वासानें मित्र म्हणून समजलेल्या व्यक्तीजवळ मी काढलेला तो उद्गार त्यानें बांकावर लिहून ठेवला. मी पुन्हां सांगतों, बांकावरचें वाक्य मी लिहिलें नाहीं; तसें मी लिहिणार नाहीं, तरीही तो माझ्या अंतःकरणांतला उद्गार आहे यांत मात्र शंका नाहीं. वऱ्हाडी काकानें माझी फजिती होण्यासाठीं तें वाक्य बांकावर लिहिलें ही गोष्ट मात्र खरी आहे. त्यानें माझा विश्वासघात केला खरा, पण त्यामुळें माझ्या अंतः-करणांतील भावना तुला कळली हें एका परीनें बरें झालें. पण ती ज्याप्रकारें कळली त्याप्रकारें कळायला नको होती. केव्हांतरी मी माझें अंतःकरण तुझ्या-पुढें उघडें करणार होतों. काकाच्या मूर्खपणामुळें तसें करणें लांबणीवर टाकावें लागलें. आजवर वाट पाहिली आणि अंतःकरणांतल्या तीव्र भावना असह्य होऊं लागल्यामुळें लाज-भीड सोडून हें पत्र लिहिलें.—"

शब्द जरी अगदीं हेच नव्हते तरी त्याचा सारांश मात्र याच अर्थाचा होता. याच्या पुढील भाग निरर्थक काव्यमय शब्दांच्या अवडंबराचा होता. त्याच त्याच वाक्याची निरनिराळ्या शब्दांनी पुनरुक्ति केली होती.

माझें पत्र वाचणें संपलें असें पाहून मंजुळा म्हणाली, "काय, झाली खात्री? कवटाळ सारं त्याचंच. काकावर उगीच त्यानं आळ घेतला मात्र. शेवटीं माझाच अंदाज खरा ठरला, असं नाहीं का तुला वाटत?"

मी नुसतें म्हटलें, "प्रिन्सिपलसाहेबांना पत्र नेऊन द्यावं असं वाटतं का तुला?"

क्षणभर विचार करून मंजुळा म्हणाली. "मला वाटतं, देऊं नये. झाल्या गेल्या गोष्टी केव्हांच विसरून जातील. पत्र दिल्यानं पुन्हां चौकशीला सुरवात होईल आणि पुन्हां या विषयाची कॉलेजभर चर्चा होऊं लागेल. हें पत्र आलेलं कुणाला कळलंच असेल असं कांहीं म्हणतां येणार नाहीं. कळलं नसलं तर मुद्दाम आपणच डांगोरा पिटण्यांत काय अर्थ?"

कांहींच न बोलतां मी तें पत्र फाडून टाकलें आणि तुकडे गोळा करून शेजाऱ्याच्या डेस्कींत फेंकून दिले.

पत्र फाडलें खरें; पण त्यांतील मजकूर कांहीं फाडला गेला नाहीं. कुणाच्या तरी मनांत आपल्याविषयीं कांहीं विशिष्ट प्रकारच्या भावना उत्पन्न होऊं लागल्या आहेत या जाणिवेचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला. साऱ्याच कॉलेजांतून असे प्रकार घडत असतील का? या प्रकारांतून पुढें कांहीं लग्नें घडून येत असतील का? कीं तेवढ्या वेळापुरतेच हे पोरखेळ होऊन राहातात? मंजुळेला विचारलें, त्यावेळीं ती ह्मणाली, "क्षुल्लक गोष्टीला तूं फार महत्व देते आहेस. मला नाहीं वाटत, असल्या पत्रापत्रींतून कांहीं निष्पन्न होत असेल असं. फुटक्या तारवाच्या तुकड्यासारखीं चार ठिकाणचीं चार माणसं आज आपण इथं गोळा झालों आहोंत, परिस्थितीच्या बादळाबरोबर पुन्हां कुठल्या कुठं निघून जाऊं— कदाचित् पुन्हां एकमेकांची दृष्टादृष्टसुद्धां होणार नाहीं."

तो विषय तेवढाच राहिला. मला वाटलें, "दुसऱ्याजवळ चर्चा करण्याचा हा विषय नव्हे. जिचा तिनें स्वतःपुरता विचार केला पाहिजे. पत्राचा प्रत्यक्ष परिणाम जरी माझ्या मनावर विरुद्ध प्रकारचा झाला तरीही त्यांत कुठें तरी गुंतागुंत होती. एवढीं हजार-पांचशें मुलें कॉलेजांत आहेत, पण त्यांतल्या एकाच मुलाला असें पत्र लिहिण्याचा धीर कसा व्हावा? पुढल्या परिणामाची भिति त्याला कां न वाटावी? मागल्या परिस्थितीचा विचार सुद्धां त्याच्या पत्र पाठविण्याच्या कां आड येऊं नये? हा निर्लज्जपणा होता, भावनेची उत्कटता होती, कीं नुसता गद्धे-पंचविशींतला मूर्खपणा होता? तसें पाहिलें, तर त्यांत कांहींच वावगें नव्हतें. माझी परिस्थिति इतर मुलींसारखीच असती तर माझ्याकरितां बाबांनी त्याला मागणी घातली असती—मागणी न घालण्याइतकें हें स्थळ कांहीं टाकाऊ नव्हतें. इतर मुलांमुलींचीं लग्नें होतात त्याप्रमाणें माझें लग्न झालें असतें तर कदाचित् आपूर्वीच तो किंवा त्याच्यासारखा एखादा मुलगा आज माझा नवरा होऊन राहिला असता."

प्रसंग नवीन प्रकारचा होता, ह्मणूनच त्याचें एवढें कौतुक वाटलें. मुलीचा बाप मुलाला मागणी घालीत असतो हा शिष्टसंप्रदाय असतो. मुलाच्या बापानें मुलीसाठी मागणी घालणें हें उच्चवर्णीयांत कमी दर्जाचें लेखलें जातें. मग एखाद्या

मुलानें एखाद्या मुलीला परस्परांच्या वडिलांची संमती न घेतां मागणी घालणें हें कशीच्या अनुरोधानें त्या काळांत तरी असंबद्ध होतें.

नानानें हें मनोधैर्य दाखविलें, पण तें मनोधैर्य होतें कीं मूर्खपणा होता, याचा अंदाज करण्यास कांहीं साधन नव्हतें. हा विषय डोक्यांतून काढून टाकावा असें वाटे खरें, पण पुन्हां पुन्हां माझ्या नकळत तेच तेच विचार समोर उभे राहात असत.

मला आत्मविस्मृति झाली होती. पण कांहीं कारण नसतां एके दिवशीं लहानपणापासूनच्या सर्व आठवणी चटकन् ध्यानीं आल्या. लग्न झालेल्या माझ्या तिन्ही मैत्रिणींची गृहचित्रें नजरेसमोर आलीं; त्यांच्याबद्दलचे त्यावेळीं आलेले विचार पुन्हां आठवले; तेव्हां माझी मलाच लाज वाटूं लागली. एका विशिष्ट वयांत स्त्रीजातीच्या अंतःकरणांत उत्पन्न होणारी आत्मप्रतीति यावेळीं जागी झाली होती असा मला संशय आला. याच्या मुळाशीं नुसत्या सौंदर्याचाच अभिमान होता असें नाहीं, कुणा तरी व्यक्तीचें आपल्याकडे आकर्षण होतें—अगदीं बेफाम आणि निर्लज्ज होण्याइतकें आकर्षण होतें इतकी आकर्षक बुद्धि आपल्या अंगीं आहे असें वाटण्याची ती पहिली छाया होती.

'मी कुणी तरी आहे' असें पहिल्यापासूनच मला वाटत असे, तें नुसतें माझ्या बुद्धिवैभवापुरतेंच होतें. बुद्धीखेरीज दुसऱ्याला आकर्षण करण्याइतका आपल्या ठायीं आणखी एक गुण आहे आणि तो आपलें सौंदर्य या जाणिवेच्या अपघाताचा तो पहिला परिणाम होता.

जसजसा मी विचार करूं लागलें तसतशी माझी मलाच लाज वाटूं लागली. लग्नाच्या बाबतींत आपण इतरांना काय बोललों, कोणते प्रश्न केले, काय उत्तरें मिळवलीं आणि दुसऱ्याला निरुत्तर केल्याच्या अभिमानानें त्या वेळीं स्वतःला कसा आनंद झाला याचें सिंहावलोकन ज्या वेळीं झालें त्या वेळीं आपली बुद्धी कुठें तरी पांगळी पडत आहे याचा मला प्रत्यय आला.

तो विषय निग्रहानें मी मनांतून काढून टाकला आणि अभ्यासाकडे सर्व लक्ष लावलें; त्या वर्षी मी इंटर आर्ट्सची परीक्षा पास झालें. मंजुळा त्याच वेळीं बी. ए. होऊन कॉलेज सोडून गेली. त्यानंतर नानाचें पुन्हां मला पत्र आलें नाहीं. रस्त्यानें जात असतां समोर दिसल्यासही एका नेत्रविक्षेपानें देखील त्यानें ओळख दाखवण्याचा प्रयत्न केला नाहीं.

पण याचमुळें त्या विषयाला जास्त मोठें स्वरुप आलें होतें. पूर्वी तो माझी थट्टा करीत असे—मला विरोध करीत असे. पुढें त्यानें विरोध सोडून दिला आणि स्नेह संपादन करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतरचें बाकावरचें लेखन—आणि त्यानंतर ही अनोळख! हीं जीं चार स्थित्यंतरें झालीं त्यामुळेंच तो सर्वांच्या चर्चेचा विषय होऊन राहिला. इथें कुठेंतरी पाणी मुरतें आहे, असा प्रत्येकाला संशय येऊं लागला. मुलांनी त्याची थट्टा करावी आणि मुलींनी माझी थट्टा करावी असें चाललें होतें.

नुसती थट्टाच असती तर त्याचें मला कांहीं वाटलें नसतें. पण त्या थट्टेंत काळीज पिळवटून जाण्याइतका विषारीपणा भरलेला असे, त्याचाच मला तिटकारा येत होता. इतर मुलींची वागणूक माझ्यापेक्षां फार निराळी असे. पुरुष-विद्यार्थी दिसले तर उगीच वळण घेऊन निघून घ्यायचें, असा त्यांचा क्रम असे. मी त्यांच्या कधीं वाटेलाही गेलें नाहीं किंवा पुरुष येतात म्हणून वाटेची आड-वाटही केली नाहीं.

या वर्तनामुळेंच माझ्याबद्दल फार चर्चा होत असे. परीक्षेला बसेपर्यंत मंजुळा माझ्याबरोबर होती, तेवढाच मला आधार होता. पण यापुढें मनमोकळें करून बोलायला सुद्धां कुणी नाहीं, याची मला एकाप्रकारें भीति वाटली. इतर मुलींशीं माझें एक क्षणभर सुद्धां पटत नसे. मुलांशीं नुसत्या स्नेहसंबंधाच्या नात्यानें सुद्धां वागणें अशक्य होतें आणि माझा स्वभाव तर एकलकोंडा नव्हता. कोणता ना कोणता तरी विषय घेऊन—अभ्यासक्रमाबाहेरचा विषय घेऊन—त्याच्यावर तासचे तास चर्चा करीत बसण्याची मला फार आवड होती. मंजुळेलाही या माझ्या बडबडीचा वीट येत असे. बोलण्याचें काम जरी बहुतेक मीच करीत असे तरी विषयाला चालना देण्याइतकें नवीन प्रमेय उपस्थित करण्याइतकी ती कल्पक होती. म्हणूनच तिचें—माझें एवढें जुळलें होतें. म्हणूनच ती जाणार म्हणजे या कॉलेजच्या आवारांत आपल्याला कुणी मैत्रीण राहाणार नाहीं असें मला वाटूं लागलें.

परीक्षेचा निकाल लागण्यापूर्वी बाबांची बदली पुण्यालाच झाली होती. परीक्षा संपल्यावर रत्नागिरीला जाऊन मी माझ्या मित्रमंडळींना भेटेन—विशेषतः डॉक्टरना भेटेन आणि झालेल्या प्रकाराबद्दल मनमुराद चर्चा करीन अशी जी आशा

केली होती ती फुकट गेली. परीक्षेपुरती मी मुंबईला गेलें, आणि परत पुण्याला आलें. मात्र ती कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें न जातां गांवांतल्या आमच्या बिऱ्हाडीं आलें.

हें घरही पूर्वी मी आलेल्या बाबांच्या मित्राच्या घरासारखेंच होतें. त्या घराचें वातावरण मला आवडलें नाहीं. अगदीं माथ्यावर कोसळूं पाहाणारी तक्तपोशी दिसली, कीं मला त्याची चीड येत असे. घराच्या रचनेलाही कांहीं सुसंबद्धपणा नव्हता. जिने अगदीं काळोखांत आणि तेही अरुंद असल्यामुळें मला जिन्यांतून जाणें म्हणजे अंधारकोठडींत जाण्यासारखें वाटे. आजूबाजूला परसूं नाहीं, झाड-झुडुप नाहीं, चार फुलझाडांच्या कुंड्यासुद्धां नाहींत असें जेव्हां मी पाहिलें तेव्हां त्या जागेचा मला तिटकारा आला. आणि सर्वांत किळसवाणी गोष्ट म्हणजे घरांत प्रवेश करण्याच्या दाराजवळचा शौचकूप. हें घराचें शिल्प पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटे. एका काळच्या राजधानीचें शहर हें,—इथें घर बांधण्याच्या कलेची इतकी आबाळ कां असावी ? सर्वच घरें बहुतेक याच नमुन्याची. सुंदरतेची कल्पना कुठें मागमूसालाही राहिलेली दिसत नसे. कांहीं नवीन घरें होतीं, पण तीही या जुन्या घरांचीच बहुतेक अनुकरणें होतीं.

मी आईला विचारलें त्यावेळीं ती म्हणाली, " पुष्कळ घरं पाहिलीं, पण शेवटीं हेंच घर सोयीचं वाटलं. सगळींच घरं जिथं सारखीं तिथं आवडीनिवडीचं, वाट कुठं राहिली ? कोकणच्या प्रशस्त घरांत राहिल्यानंतर या कुजट खुराड्यांत राहायचा मला सुद्धां वीट येतो, पण त्याला कांहीं उपाय नाहीं. एकापरीनं बरं झालं. आतां तुला बोर्डिंगांत राहायला नको.—"

चटकन् माझ्या मनांत एक कल्पना आली. मी म्हटलें, " या असल्या घरांत अभ्यासावर लक्ष लागेल असं कांहीं मला वाटत नाहीं. आतां कॉलेजची दोनच वर्षं राहिलीं आहेत. ही शेवटची परीक्षा आहे. मधें एक वर्ष कांहीं परीक्षा नाहीं. आतां मला मुंबईलाच पाठवीनास कशी ! इथल्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांचं इंग्रजी बरंच कच्चं राहातं असं म्हणतात, आणि माझा अनुभवही तसाच आहे. शेवटचीं दोन वर्षं मुंबईला मिळाली तर तेवढा फायदा होईल. "

क्षणभर आई कांहींच बोलली नाहीं. पण ज्या वेळीं बोलली त्यावेळीं ती मन कठोर करून बोलत आहे असें वाटलें. ती म्हणाली, " कुठूनही तुला समाधान

झालं म्हणजे झालं. तुला जें आवडेल त्याच्या आड मी येणार नाहीं किंवा कुणाला आड येऊंही देणार नाहीं. इथं गांवांत तुझ्याबद्दलच्या एक एक गोष्टी ऐकल्या; तेव्हां थोडंसं चमत्कारिक वाटलं. आम्ही रत्नागिरीला होतों तेव्हां इकडे कांहीं झालं तरी त्याला तिकडे फाटे फुटत नसत. तूं इथंच असलीस तर हे गांवगप्पा कदाचित् जास्त वाढतील. कारण आतां तुला गांवांत राहावं लागणार आहे. हीं दोन वर्षं मी कशी काढलीं याची तुला कल्पना होणार नाहीं. मुलांपैकीं घरीं कुणीच नाहीं. तुम्हीं सुट्टींत आलांत तर नुसती पाहुण्यासारखीं—त्याचं मनाला कसंसंच वाटे. पुण्याला आलें त्यावेळीं आतां तूं सदोदित माझ्याकडे राहाशील असं वाटलं होतं. त्याच आशेनं पुणं मला बरं वाटलं होतं. पण इथं आम्ही आलों तेव्हांपासून जो अनुभव आला त्यामुळं तूं मुंबईला जाते म्हणतेस हेंच एका अर्थी मला बरं वाटतं. जें कुणी येतं तें तुझी निंदा करतं. जशी कांहीं तुझी निंदाच ऐकण्यासाठीं आम्हीं इथं आलों आहोंत ! तुझी निंदा करतांना एके काळा इतका उल्हास आलेला दिसतो, कीं मस्तक फिरून जातं. तुझी निंदा ऐकल्यावर मला—तुझ्या आईला आनंद वाटेल असं का लोकांना वाटतं ? पण बोलतात ती अशा वृत्तीनं बोलतात. परवा एक बाई आल्या होत्या. तिचा नवरा तिकडचा एक मित्र आहे. ती इतकं वाईट बोलली, कीं माझ्या अंगावर शहारे आले. तुला कॉलेजांतून काढून आधीं कुणाबरोबर तरी लग्न लाऊन टाकावं असा जिव्हाळ्याचा उपदेश करूं लागली. तेव्हां मला वाटतं, तूं म्हणतेस तेंच बरोबर आहे. मुंबईला जा, तिथल्याच बोर्डिंगांत जा. मुंबई अफाट आहे. कोण कुणाची चौकशी करीत नाहीं. जो तो आपल्या कामांत चूर असतो, इथल्या-सारखं तिथं रिकामटेकड्यांचं काम नाहीं. तुझा अभ्यास तरी सुखानं होईल."

बोलतांना तिच्या डोळ्यांना चटकन् पाणी आलं, माझा वियोग तिला दुःसह होत होता; पण माझ्या आवडीसाठीं ती मला मुंबईला पाठवायला तयार झाली होती. माझा मलाच राग आला. आईच्या समाधानासाठीं तरी मी पुण्यालाच राहाण्याचें धैर्य कां दाखवूं नये ? कांहीं तरी उत्तर द्यावें, म्हणून मी विचार करीत होतें. पण कांहींही बोललें तरी तें औपचारिक होईल, म्हणून मी उगीच स्तब्ध राहिलें.

तरीही माझें मन मळ खात होतें. आईची प्रकृती हल्लीं पूर्वीच्यासारखी नव्हती. तिला कोणतेंही दुखणें जरी अडलें नव्हतें, तरी एकदम पाहिल्याबरोबर ती नुकतीच एखाद्या मोठ्या आजारांतून उठल्यासारखी दिसे. अशा स्थितींत मी तिच्याजवळ राहाणें इष्ट होतें खरें, पण विचारांती माझें मत बदललें. मी पुण्यांत राहिलें असतें तर कॉलेजच्या वातावरणांतल्या किडक्या कंड्या तिखट-मीठ लाऊन आमच्या घरापर्यंत गांवांत पोंचल्या असत्या. त्याचें आईला जें दुःख झालें असतें त्यापेक्षां कांहीं दिवस माझा होणारा वियोग तिला जास्त सह-निय झाला असता.

माझ्या सूचनेला काकांनींही विरोध केला नाहीं आणि पुढल्या टर्मपासून मी मुंबईच्या विल्सन कॉलेजांत प्रवेश केला.

## प्रकरण ११ वें.

# नाना आला



मुंबईला आल्यावर मला पुष्कळच मोकळेपणा वाटूं लागला. पुण्याचीं तीं बंधनें, त्या टवाळ्या, ते रिकामटेकडे उद्योग बंद झाल्यानें मनाला केवढा तरी आराम वाटला.

मी येथें एका स्त्रियांसाठीं उघडलेल्या बोर्डिंग-हाऊसमध्यें राहात होतें. त्यांत सुमारें वीस-एक मुली होत्या. त्या सर्व निरनिराळ्या जातींच्या होत्या. जेवणाची व्यवस्था जरी एकाच ठिकाणीं होती, तरी पुण्यासारखा येथें पंक्तिप्रपंच नव्हता. कॉलेजांतील विद्यार्थ्यांचें मुलींशीं असलेलें वर्तनही फारच सभ्यपणाचें असे. उगीच निष्कारण कोणत्याही मुलीची कुणीही कुटाळकी करीत नसे.

आमच्या कॉलेजांतील प्रोफेसरवर्गही फार विद्वानांपैकीं होता. बरेचसे प्रोफेसर विलायती होते. कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. मॅकीकन् हे फार प्रेमळ स्वभावाचे होते. ते विद्यार्थ्यांवर वैयक्तिक लक्ष ठेवित असत. त्यामुळें ज्या त्या विद्यार्थ्याला प्रोफेसरसाहेबांबद्दलही वडीलपणाचें प्रेम वाटत असे.

फर्ग्यूसन कॉलेजमधील कांहीं प्रोफेसरांच्या बाबतींत जरी अशी परिस्थिति होती तरी वैयक्तिक प्रेमापेक्षां खाजगी आपलेपणा तेथें जास्त प्रबळ असे. मॅकीकनसाहेब मूळचे परदेशी असल्यामुळें त्यांच्या बाबतींत असा खाजगी आपलेपणाचा प्रश्नच येत नसे. आपल्या कॉलेजचा विद्यार्थी या नात्यानें त्यांना प्रत्येक व्यक्तीबद्दल जें प्रेम असे, तें सर्व विद्यार्थ्यांच्या बाबतींत अगदीं सारखें असे. तो विद्यार्थी कॉलेज सोडून निघून गेला तरी देखील त्यांचा जिव्हाळा यत्किंचितही कमी होत नसे.

विल्सन कॉलेजांतील माझे हे दिवस मोठ्या आनंदांत गेले. अभ्यास जोरानें चालला होता. आणि त्याच्याबरोबरच पुष्कळशा गोष्टींचें निरीक्षण करतां येथें सुलभ झालें होतें. पहिल्या वर्षी अभ्यासाचा बोजा विशेषसा नसल्यामुळें आणि परिक्षेचा ससेमिरा त्या वर्षापुरता जवळ आलेला नसल्यामुळें मला बऱ्याचशा किरकोळ वाङ्मयाचें वाचन

करतां आलें. मुंबईंत रॉयल एशियाटिक सोसायटी नांवाची एक बरीच जुनी संस्था आहे. त्या संस्थेंत अगदीं प्राचीन काळच्या ग्रंथांपासून आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपर्यंतचे ग्रंथ संग्रहित केलेले असत व अजूनही आहेत. प्रिन्सिपलसाहेबांच्या शिफारसीमुळें मला या संस्थेची मेंबर होतां आलें, त्यामुळें पुष्कळशा ग्रंथांचें वाचन या पहिल्या वर्षी मला करतां आलें. आमच्या विद्यार्थी वर्गांपैकीं फारच थोडे विद्यार्थी या संस्थेचा फायदा घेत असत. विद्यार्थिनींपैकीं तर मी एकटीच होतें.

या वेळांत मुंबईंतील निरनिराळ्या संस्थांचीही मी माहिती करून घेतली. विल्सन कॉलेजशीं संबंध आलेल्या बऱ्याचशा व्यक्तींचा निकट ऋणानुबंध असलेली मुंबईंतील एक प्रमुख संस्था म्हणजे प्रार्थनासमाज होय. मोठमोठे विद्वान या समाजाचे अनुयायी होते. दर रविवारीं समाजाच्या मंदिरांत कीर्तनें, प्रवचनें, व्याख्यानें होत असत. परदेशांतील किंवा हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्वानांचीही या संस्थेत आध्यात्मिक व धार्मिक विषयांवर वारंवार व्याख्यानें होत असत. अशा व्याख्यानांना हजर रहाण्याचें मी केव्हांही चुकविलें नाहीं. सनातनी हिंदुधर्मापासून ही संस्था फटकून निघालेली असल्यामुळें मुंबईंतील सर्वसाधारण समाजाचा या संस्थेबद्दल विरोध असे; पण त्यावेळीं जीं माणसें या संस्थेंत माझ्या पहाण्यांत आलीं, ती अंतःकरणपूर्वक या संस्थेंत सामील झाली होतीं, असेंच मला दिसून येत होतें. डॉ. कीर्तीकर हेही या संस्थेचे एक अनुयायी असल्यामुळें त्या संस्थेचा परिचय करून घेणें मला मुळींच अवघड झालें नाहीं.

एके दिवशीं चौपाटीवर फिरत असतां सहज राजारामशास्त्री भागवत यांची गांठ पडली. त्यांनीं पहिल्यानें मला ओळखलें नाहीं. त्यांच्या त्या अगडबंब रुमालावरून तेवढ्या मोठ्या जनसमुद्रांतही त्यांना मी सहज टिपून काढलें.

मला पहातांच त्यांना फार आनंद झाला. ते ह्मणाले, " केवढी मोठी झालीस पोरटे ! तूं कॉलेजांत असतेस होय ? विल्सन कॉलेजांत का ? खरं ह्मटलं तर तुझ्यासारख्या श्रीमंत बापाच्या मुलींनीं आमच्या झेवियर कॉलेजांतच आलं पाहिजे होतं, पण तुह्मां कोंकणी लोकांचा ओढा बहुतेक विल्सन कॉलेजकडेच असतो. गेलांत तर विल्सन कॉलेजांत, नाहींतर पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत. झेवियर कॉलेजांतील विद्यार्थी मंडळी बहुतेक मुंबईकर आहेत. त्यांतून श्रीमंत घराण्या

जाणाऱ्या समाजांतील वर्गाचीच संख्या मोठी. या कॉलेजांतील बरीच मोठी संख्या जशी ख्रिस्ती लोकांची आहे, तशीच पारशी मुलांमुलींचीही आहे. महाराष्ट्रीय आहेत, ते मुंबईचे शेणवी, प्रभू यांपैकींच जास्त. एकदां आमचं कॉलेज पाहयला तर ये. आमचे 'बाबा लोक' पाहून जा ना! 'बाबा लोक' म्हणजे तुला समजलें नसेल. प्रचारांत साहेबांच्या मुलांना त्यांचे नोकर 'बाबा लोक' म्हणतात; पण मी आमच्या कॉलेजांतील फादर्सनांच बाबालोक म्हणतों. हे बाबालोक आपल्या इकडील संन्याशासारखे आहेत. त्यांचीं लग्नं झालेलीं नसतात. सर्व आयुष्य त्यांनीं सेवेला वाहिलेलं असतं आणि त्याच नात्यानें ते अध्यापक म्हणून आमच्या कॉलेजांत शिक्षण देण्याचं कार्य करीत असतात. तुला यायचं असेल तर मी तशी व्यवस्था करीन."

ते मला बरोबर घेऊन गेले ते गिरगांव नाक्यावरील एका इराण्याच्या दुकानांत घेऊन गेले. हा एवढा शास्त्री, त्यांतून ब्राह्मण आणि इराण्याच्या दुकानांत जातो, हें पाहिल्याबरोबर मला मोठें चमत्कारीक वाटलें. त्या दुकानांत जाऊं कशी? याचीच पहिल्यानें मला पंचाईत पडली होती. माझे पाय पुढें जात नव्हते असें पाहून शास्त्रीबुवांनीं माझा हात धरून मला आंत खेंचलें. ते म्हणाले "लोकेषणा फार वाईट! जी गोष्ट आपल्या मनाला पटते ती करावी. लोक काय म्हणतील याचा यत्किंचितही विचार करूं नये असें म्हणणारा मी आहें, आणि म्हणूनच लोक मला नांवं ठेवतात. लोकांनीं नांवं ठेवण्याची जर तुला भीती वाटत नसेल तरच माझ्याबरोबर ये. नुसता मी बोलावतों म्हणून येऊं नकोस. माझ्याबरोबर तूं या इराण्याच्या दुकानांत आलीस म्हणजे लोक तुला नांवं ठेवणारच. कुणी विद्यार्थी आले असते तरी त्यांनाही नांवं ठेवलीं असतीं आणि तूं तर मुलगी! नुसत्या हिंदूच्या हॉटेलांत देखील अजून बायका जाऊं लागल्या नाहींत, तिथं तूं मुलगी इराण्याच्या हॉटेलांत येते आहेस हें ध्यानांत ठेव. लोक बाभाडे काढतील त्याला तोंड देण्याची तयारी असेल तरच माझ्याबरोबर ये, हें पुन्हा तुला बजावून सांगतों."

एक क्षणभरच मला विचार पडला. जावें कीं जाऊं नये असें मनांत येतें न येतें तोंच माझी बंडखोर वृत्ति उसळून वर आली. मी शास्त्रीबुवांबरोबर तडक

इराण्याच्या दुकानांत शिरलें. आंत विल्सन कॉलेजांतील बरेचसे विद्यार्थी होते. किंबहुना हें गिरगांवच्या नाक्यावरील इराण्याचें दुकान विल्सन कॉलेजच्या विद्यार्थ्यांचें त्या वेळेचें वसतिस्थानच होतें. आज ती परिस्थिति बदलली आहे, तरीही त्या हॉटेलचा इराणी अजून विल्सन कॉलेजमधील विद्यार्थ्यांची आणि प्रोफेसरांची ओळख विसरला नाहीं. आपले जुने गिऱ्हाईक आज मोठे मिराळ झाले असले तरी त्यांना ओळखून काढणारा कॉरनर रेस्टॉरंटचा इराणी फार प्रख्यात आहे.

आह्मांला पहातांच विद्यार्थ्यांत थोडीशी कुजबुज सुरू झाली, पण ती साध्या स्वरूपाची होती. त्यांत उगीच चिटवळपणाचें अंग नव्हतें. शास्त्रीबुवांनी कांहीं ओळखीच्या विद्यार्थ्यांना आपल्या टेबलावर चहा घेण्यासाठीं बोलावून घेतलें. ते येऊन बसले त्यावेळीं मला पहिल्यानें थोडा संकोच वाटला. एक क्षणभर विचार केल्यानंतर मला या गोष्टीचा संकोच वाटला, याचीच लाज वाटूं लागली. मी ज्या प्रकारची वृत्ति बाणावी असा प्रयत्न करीत होतें त्या प्रकारच्या वृत्तीला असा संकोच येणें अयोग्य होतें, हें त्यावेळीं माझ्या ध्यानीं आलें.

शास्त्रीबुवा बऱ्याच इकडल्या तिकल्या गोष्टी बोलत होते. त्यांच्या त्या बोलण्यांत बहुतेक सर्वांवरच टीका असे. त्या काळच्या सर्व प्रमुख समजल्या जाणाऱ्या व्यक्तींबद्दल त्यांचा सरसहा अनादर असे. तेही प्रार्थनासमाजांत जात असत पण प्रार्थनासमाजांत जाणाऱ्या सर्वच व्यक्तींबद्दल त्यांना पुरेसा आदर नव्हता. त्या व्यक्तींत दांभिक माणसांचा भरणा फार आहे असें त्यांचें ह्मणणें होतें. दांभिकपणाचा त्यांना फार तिटकारा असे आणि त्यामुळेंच त्यांना लोक पदोपदीं नांवें ठेवीत असत, अशी त्यांची सुद्धां तक्रार असे.

त्या दिव्यांतून मी पार पडलें आणि ज्या वेळीं बोर्डिंगांत गेलें त्या वेळीं झालेल्या हकिकतीबद्दल माझ्या मनांत निरनिराळे विचार आले. एक वेळ आपण शास्त्रीबुवांबरोबर इराण्याच्या दुकानांत चहा घेण्यासाठीं प्रवेश केला. आतां या बाबतींत आपण हा नित्यक्रम केला पाहिजे कीं काय? हा पहिला प्रश्न माझ्या समोर उभा राहिला. सहज एकदां जाण्यानें लोकमताला आडोसा करण्याचें कार्य सफल होत नव्हतें.

चर्चा झाल्याशिवाय मला समाधान वाटत नसे. कोणतीही गोष्ट चर्चेला पडली, त्याच्याबद्दल खल होऊं लागला, आणि मला मनमुराद वाटाघाट करायला

मिळाली, म्हणजेच माझ्या मनाला पुरेसें समाधान होत असे. कोणतीही गोष्ट लोकाचाराविरुद्ध असलेली करायची, मात्र ती आपल्या मनाला पटलेली असली पाहिजे. आणि मग त्या विषयाच्या बाबतींत इतरांबरोबर—विशेषत: विरोधकांबरोबर चर्चा करायची, ही माझी आवड. या चर्चेपासून मला स्वत:ला फार मोठा फायदा होत असे. चर्चेत निरनिराळे प्रश्न निघत असत आणि त्या प्रश्नांची मुद्देसूद उत्तरें देऊन विरोधकांचें समाधान करणें अवश्य असे. विरोधकांचें समाधान झालें म्हणजे आपण विचारानें केलेलें तेवढें बरोबर आहे कीं नाहीं याचा आपल्या मनालाच प्रत्यय येत असे. मनाचा निर्धार तेवढाच दृढ होत असे.

मुंबईस आल्यावेळीं ठकीचा तपास करण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला. पूर्वीच्या पत्त्यावर एकदां जाऊन पाहिलें. जेवढे छापखाने माझ्या पहाण्यांत येत असत त्या त्या छापखान्यांतून चौकशी करून पाहिली पण ठकीच्या नवऱ्याचा पत्ता लागला नाहीं.

तरीही एकंदरींत हे दिवस मोठ्या आनंदाचे गेले. कॉलेजांतील विद्यार्थीनींत हिंदु विद्यार्थीनींपेक्षां पारशी मुलींशींच माझा स्नेहसंबंध विशेष जडला. त्या मुलींतील नीटनेटकेपणा, प्रखर बुद्धि आणि मनमोकळेपणा यामुळें माझें अंत:करण त्यांच्याकडे सहजच ओढलें जात असे. त्याही माझ्याशीं अगदीं निर्मळ मनानें वागत असत. एकदां इराण्याच्या दुकानांतील चहा घेण्याची संवय झाल्यामुळें पारशी मुलींच्या घरीं जाऊन त्यांच्या घरचा आदरसत्कार घेण्यांत मला कोणत्याही प्रकारचा संकोच वाटेनासा झाला. पारशी लोकांबद्दल त्या वेळच्या आमच्या हिंदु लोकांत बराचसा गैरसमज आहे, असें मला अनुभवानें वाटूं लागलें.

या मुलींतील शीरीन पाठक नांवाच्या एका मुलीशी माझा विशेष स्नेह जमला. तिचें लग्न ठरलें होतें. ठरलेला वर रसायनशास्त्राचें शिक्षण घेण्यासाठीं विलायतेला गेला होता. तिकडील परिक्षा देऊन आल्यावर त्यांचें लग्न व्हायचें होतें. लग्न एक प्रकारें निश्चित झालें होतें. तरीही शीरीनबेन लग्नाच्या बाबतींत बरीचशी अनिश्चित होती. हें लग्न तिच्या वडील माणसांनीं ठरविलें होतें. तिचा या लग्नाला जरी विरोध नव्हता, तरी तिची संमति या कामीं हिंदु लोकांप्रमाणेंच घेतली गेली नव्हती. तिच्या मनांत ही अढी होती. त्यामुळें

नियोजित वर विलायतेहून परत आल्यावर त्याच्याशीं तिचें लग्न होईलच होईल, असा तिच्या मनाला मुळींच भरंवसा वाटत नव्हता.

माझ्या चरित्राच्या पुढील भागांत ही हकीकत येणारच असल्यामुळें आज त्या बाबतींत मी विशेष लिहीत नाहीं. एवढें मात्र खरें, कीं तिच्याशीं 'लग्न' या विषयावर माझी जी चर्चा होत असे, त्यानें माझ्या पूर्वीच ठरलेल्या तत्वांना बरीचशी बळकटी आली.

पहिलें वर्ष संपलें. दुसऱ्या वर्षाला सुरवात झाली आणि या दुसऱ्या वर्षाच्या आरंभाबरोबरच परिक्षेची जबाबदारी भयानक स्वरूपांत माझ्या समोर उभी राहूं लागली. आणखी माझ्या मताप्रमाणें संकट वाटणारी दुसरी एक गोष्ट त्याचवेळीं घडून आली.

ती ह्मणजे फर्ग्युसन कॉलेज सोडून नाना विल्सन कॉलेजांत येऊन दाखल झाला. नाना मुंबईला आला हें दिसून येतांच माझ्या मनावर जो परिणाम झाला त्याचें यथातथ्य चित्र मला देतां येणार नाहीं; पण माझ्या मनावर कांहींतरी अननुभूत असा परिणाम झाला यांत मात्र संशय नाहीं. मला गांठण्यासाठींच पुण्याचें कॉलेज सोडून नाना मुद्दाम मुंबईला आला, असेंच माझ्या मनानें घेतलें.

रस्त्यांत त्याची माझी चुकून गांठ झाली तर मी त्याला ओळख दाखवण्याचें टाळीत असें; पण कांहींना कांहीं तरी कारण काढून माझ्याशीं बोलण्याचा तो प्रयत्न करीत असे, असें मला दिसून आलें.

एके दिवशीं असा प्रसंग आला, कीं मला नानाशीं बोलणेंच भाग पडलें.

---

प्रकरण १२ वें

# नानाचें व्याख्यान



गोष्ट अगदींच क्षुल्लक पण तेवढ्यांत सुद्धां मला मनाविरुद्ध जावें लागलें. शनिवार–रविवारच्या सुट्टींत नाना पुण्याला जाऊन आला होता. आईनें कांहीं खाण्याचे जिन्नस त्याच्याबरोबर मला देण्यासाठीं दिले होते ते घेऊन तो आमच्या बोर्डिंगांत आला. आईचा पासपोर्ट हातीं असल्यामुळें अगदीं उजळ माथ्यानें त्याला आमच्या बोर्डिंगांत येणें सुलभ झालें. ही संधि मिळाल्यानें त्याला फार आनंद झाला होता, असें त्याच्या चर्येवरून दिसत होतें.

बोर्डिंगच्या व्यवस्थापकांची परवानगी घेऊन तो माझ्या खोलीकडे आला, त्यावेळीं मी अभ्यासाचीं पुस्तकें वाचीत बसलें होतें. नाना आलेला पाहतांच मला एक प्रकारचा धक्का बसला. मला भेटण्यासाठीं आमच्या मुलींच्या बोर्डिंगांत येण्याचें त्यानें धाडस कसें केलें, याचें मला आश्चर्य वाटत आहे तोंच तो म्हणाला, " गोदू, हा खाऊचा डबा तुझ्या आईनें दिला आहे. मी शनिवारीं पुण्याला गेलों होतों, त्यावेळीं माझ्या काकांच्या घरीं गेलों होतों. तुम्ही ज्या वाड्यांत राहातां त्याच्याच अर्ध्या भागांत ते राहातात. सहजी गोष्टी निघाल्या, तुझ्या आईनें सांगितलें आणि मी डबा घेऊन यायला कबूल झालों."

कांहींच न बोलतां त्याला जाऊं द्यावा असें माझ्या मनांत आलें खरें पण मनः-संस्कृतीचा शिष्टाचार मला तसें करूं देईना.

मी औपचारिक रीत्या " असं का ? ठेवा तो डबा तिथं—" असें म्हटलें. माझे शब्दच मला कसेसे लागले. त्या शब्दांच्या उच्चारांत यत्किंचितही खरेपणा नव्हता. प्रसंगानुरोधानें माझ्या हातून घडलेल्या या दांभिकपणाचा मला राग आला—आणि मी म्हटलें, " नाना, माझी गांठ घेण्यासाठीं मुद्दाम ही संधि साधलीत का ? "

औपचारिक शब्दानंतरच्या या अचानक उघड हल्ल्यानें तो चमकला आणि म्हणाला, " गोदू, मी असं करीन असं तुला वाटलं तरी कसं ? यापूर्वीच मला असं कारण काढतां आलं नसतं का ? पण अगदीं सहजीं तुझ्या आईची गांठ

पडली. मी इथं येणार म्हणून तिनं माझ्याकडे डबा दिला, त्याचा असा विपर्यास करूं नकोस—"

मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो पुढें म्हणाला, "गोदू, उगीच विपर्यास करूं नकोस. तुझी आई भेटली, मी तिला सर्व सांगितलं. माझा शनिवार आणि रविवार बहुतेक तिच्याशीं बोलत बसण्यांत गेला. गोदू, तूं खरोखरच मोठी भाग्यवान आहेस. अशी आई लाभणं हें हल्लींच्या काळांत कांहीं लहानसहान भाग्य नव्हे. जुन्या काळची बाई, पण तिचे विचार किती उदात्त ! खरोखर, मला मोठं आश्चर्य वाटलं ! जुन्या काळच्या बायकांत माझ्या पहाण्यांत तरी अशी बाई कांहीं आली नव्हती-—"

मी काय बोलतें हें पहाण्यासाठीं तो क्षणभर थांबला. मला आईबद्दल अभिमान होता आणि नानानें तिची तारीफ केल्यामुळें मी साहजिकच कांहींतरी बोलणार होतें; पण बुद्धिपुरःसर आत्मसंयमन करून मी त्याला उत्तर दिलें नाहीं.

पुन्हां मला वाटलें—हा माझा दांभिकपणा होतो आहे काय ?

मी कांहीं बोलत नाहीं असें पाहून नाना म्हणाला, "गोदू, मला क्षमा कर. पुण्याला असतांना मी तुला गोदूताई म्हणत होतों; पण या मुंबईत तसलीं तीं दांभिक विशेषणं लावलेलीं मला तरी बरीं वाटत नाहींत. फार दिवसांचा आपला परिचय आहे. तो परिचय पहिल्यानं अगदीं चमत्कारिक रीतीनें झालेला असल्यानं त्याला हें स्वरूप आलं. त्या प्रसंगाच्या गुंतागुंती सुटल्या. त्यांची आठवण धरून तरी तूं माझ्याशीं असं फटकून वागायला नको होतं ! हें बोलण्याची मी संधि शोधित होतों असं समजूं नकोस; पण योगायोगानं जर संधि आलीच आहे तर मी कां बोलूं नये ? पुण्यापेक्षां मुंबईचं वातावरण फार निराळं आहे. पुण्याला मुलीं मुंबईपेक्षां मोकळ्या वृत्तीनं हिंडत असतांना दिसतात खऱ्या, पण त्यांच्यांत एक प्रकारची चमकून जाण्याची जाणिव असते. लोकसंख्येच्या मानानं पाहिलें तर मुंबईत रस्त्यावर हिंडणाऱ्या मुलींपेक्षां पुण्याच्या रस्त्यावर हिंडणाऱ्या मुलींच्या संख्येचं प्रमाण शेंकडावारीनं जास्त पडेल. पण काय असेल तें असो, त्या मुलींत आणि इथल्या मुलींत माझ्या डोळ्यांना फरक वाटतो. पुण्याच्या मुलींना आपण मुलगी आहों, आपली जात पुरुषांपेक्षां भिन्न प्रकारची आहे, याची आठवण असल्यासारखी दिसते. मुंबईच्या मुली मी पहातों

त्यांच्यात ही भेदाभेदाची जाणिव बुद्धिपुरःसर असल्याचंच दिसून येत नाहीं. तुला नाहीं असं वाटत ? ”

आतां मला उत्तर देणें भाग व होतें. मी म्हटलें, “ नाना, तुम्ही मला अगदीं बोलायलाच लावतां आहांत. मी बोलणार नव्हतें पण तुम्ही प्रश्नच असा काढला, कीं बोलल्याखेरीज आतां मला गत्यंतर नाहीं. तुमचं म्हणणं बरोबर आहे; पण त्याला कारण आहे. तें तुम्हां पुरुषांना कळणार नाहीं. संख्येच्या बाबतींत तुम्ही जो अंदाज केला आहे तो खरोखरच बरोबर आहे; पण मुंबईतील मुलींच्या वृत्तींत जो एवढा उघड उघड फरक दिसतो, तो कां दिसतो याचा तुम्ही विचार केला आहे का ?—”

नाना थोडेसें स्मितहास्य करून म्हणाला, “ हा प्रश्न मी कां काढला हें तुला कळलं ना ? त्या प्रश्नाच्या उत्तराशींच माझ्या बोलण्याचा संबंध आहे. या पुढल्या टर्मला जर आपण पुण्याला असतों तर एकमेकाशीं एक शब्दही बोललों नसतों. पण सुदैवानें आतां मी मुंबईला आलों आहें—भेटीचा योगायोगही आला म्हणूनच बोलतों आहें,—म्हणूनच हा प्रश्न निघाला. मी या भेदाभेदाचा विचार केला आहे, त्याचं कारणही शोधून काढलं आहे, पण तें तूं शोधून काढलं आहेस कीं नाहीं हेंच मला पाहयचं आहे, म्हणून मी विचारलं. प्रश्न माझा आहे, उत्तर तुझं पाहिजे आहे ! ”

नानाचा धीर बराच चेपत चालला होता आणि काय असेल तें असो, आवडता विषय निघाल्यामुळें माझीही जीभ सैल सुटूं लागली होती. मी म्हटलें, “ अजून तरी तें मला कोडंच आहे. पुण्याला मी हॉस्टेलमध्यें राहात होतें. गांवांतील परिस्थिती असावी तितकी मला माहीत नव्हती—पण हा भेद मात्र अगदीं ठळकपणें नजरेला येत होता खरा. गृहस्थितीच्या दाबामुळें किंवा स्वाहजिक असलेल्या मनोवृत्तीमुळं त्या मुलींत अशा प्रकारच्या स्त्रीपणाची जाणिव जास्त आहे कीं काय असं मला वाटत असे; पण पुण्यांतील गृहस्थिती मला माहीत नसल्यामुळें एकदम सिद्धांत ठोकून देणं योग्य वाटलं नाहीं. ज्या गोष्टीची आपल्याला माहिती नाहीं त्या गोष्टीबद्दल उगाच ठोकून प्रमाण बांधण्याइतकी आज दोन–तीन वर्षें पुण्याला राहूनही मी ‘ पुणेरी ’ झालें नाहीं ! ”

माझ्या या उद्गारामुळें नाना मोठमोठ्यानें हंसला आणि ह्मणाला, " खरं आहे–खरं आहे! याचं कारण मी सांगतों. पहिलं कारण असं आहे, कीं पुणं ही लग्नपेठ आहे. लग्नाच्या सराईत पुण्याच्या इतकीं लग्नं महाराष्ट्रांतील कोणत्याही गांवांत होत नाहींत. उन्हाळ्याच्या सुटींत नागपूरपासून तों तहत कर्नाटकापर्यंत सगळे आशाळभूत बाप पुण्याच्या कॉलेजांतून आपल्या वाढलेल्या मुलीसाठीं नवरा शोधण्यासाठी येत असतात. तेथील प्रत्येक कॉलेजांतील मुलाला आपण एक लग्नाला योग्य झालेला वर आहों, ही जाणीव असते. कॉलेजांतील प्रत्येक मुलाला आपलं आतां लग्न व्हायचं आहे ही आठवण असते—"

असें ह्मणून तो घटकाभर थांबला आणि पुन्हा बोलूं लागला, " मी उघडपणें बोलतों याचें वाईट वाटूं देऊं नकोस; पण वस्तुस्थिती ज्या प्रकारची आहे त्या प्रकारची कबूली द्यायला प्रामाणिक माणसानं भितां कामा नये. मीही एक वेळीं त्याच मुलांतला होतों- मला त्याची आठवण आहे. अजून स्त्रियांनीं राजरोसपणें शाळा कॉलेजांतून जाण्याची पद्धत फारशी सुरू झालेली नाहीं. तरीही पुण्याला इतर कोणत्याही गांवापेक्षां शाळेंत आणि कॉलेजांत जाणाऱ्या मुली जास्त दिसून येतात. प्रत्येकाच्या हें डोळ्यांत सलतं. मुली शाळेंत जाताहेत, शिकताहेत, आज उद्यां त्या आपल्या मनगटाशीं मनगट घासायल्या उभ्या राहातील, याची जाणीव उत्पन्न झाल्यामुळं पुरुष विद्यार्थी शक्य तितके त्यांना नामोहरम करण्याच्या मार्गाला लागलेले असतात. लग्नपेठेच्या जाणिवेनं एक प्रकारची नवरेशाहीची संवेदना त्यांच्या हृदयांत उत्पन्न झालेली असते. पुरुषवृत्तीची अंध जाणीव ज्या वयांत हृदयांत उत्पन्न होतें त्याच वयाचे आह्मी कॉलेजचे विद्यार्थी असतों. कित्येकांच्या अंतःकरणांत या वृत्तीच्या बुडाशीं पाप असतें, बहुतेक विद्यार्थी सोज्वळ असतील असं मी धरून चालतों. मुली कॉलेजांत येताहेत, आमच्या तोडीच्या परीक्षा देणार आहेत, ज्या तोडीच्या परीक्षा देणं हे केवळ पुरुषवर्गाच्या भाग्याला लाभलं आहे त्या पायरीला त्या येऊन बसल्या आहेत; असं ज्यावेळीं दिसून येतं त्यावेळीं साहजिक त्यांना हाणून पाडण्याची वृत्ति आह्मां लोकांत उत्पन्न होते. हिंदी लोक I. C. S. होऊं लागले ह्मणजे युरोपियन I. C. S. ला जितका मत्सर वाटतो, तितकाच मत्सर स्त्रिया बी. ए. होण्याच्या संभवानें पुरुष विद्यार्थ्यांना वाटत असतो. त्या मत्सरामुळंच आह्मीं रस्तोरस्तीं त्यांची थट्टा करतों.

ही झाली एक बाजू. दुसरी गावगुंडांची. बाजीरावाच्या कालापासून—ह्मणजे दुसऱ्या बाजीरावाच्या काळापासून पुण्याच्या इतिहासाची आठवण कर. तें त्या काळचं भूत अजूनही पुण्यांत थैमान घालतं आहे. त्या वृत्तीचे विद्युत्किरण पुण्याच्या परमाणूं-तून खेळत आहेत, त्यांचाच परिणाम ही गावगुंडी! रस्त्यावरून जाणारी कोण-तीही मुलगी असो तिच्याबद्दल वाटेल तसे निरर्गल प्रलाप काढणं ह्मणजे त्यांना एक निर्भिडपणाचं प्रमाण वाटतं. हे निरर्गल प्रलाप, पुरुष विद्यार्थ्यांचा मत्सर आणि लग्नपेठेची जाणिव, या तीन प्रकारांमुळं पुण्याच्या मुली मोकळेपणा मिळूनही एक प्रकारच्या भित्र्या ह्मणजे Sex conscious वाटतात. मुंबई अफाट आहे. कुणी कुणाची दाद घेत नाहीं. जो तो आपल्या उद्योगांत गुंतलेला असल्यामुळें ही विशिष्ट प्रकारची वृत्ति इथं रस्त्यांतही दिसून येत नाहीं—आणि ह्मणूनच मी तुझ्याशीं बोलायला येण्याची ही संधि टाळली नाहीं. मी हा डबा कुणाबरोबर तरी तुझ्याकडे पाठवून दिला असता किंवा तुमच्या हॉस्टेलच्या सुप-रिंटेंडंटकडे दिला असता-पण बुद्धिपुरःसर मी तसं केलं नाहीं. मी प्रामाणिकपणें सांगतों, कीं मी ही संधि साधली असं ह्मटलं तर तें चुकीचं होणार नाहीं. आणि ह्मणूनच मी पुण्याप्रमाणें तुला गोदूताई न ह्मणतां गोदू असंच संबोधतों आहें—"

या उद्गारांचा माझ्यावर काय परिणाम होतो आहे, हें पाहाण्यासाठीं तो माझ्याकडे टक लावून बोलत होता व मीही यत्किंचित परिणाम होऊं न देतां त्याचें भाषण ऐकत होतें.

एकंदरींत मला वाटलें, कीं त्याच्या म्हणण्यांत बराचसा तथ्यांश होता.

मी ह्मटलें, "तुह्मी या गोष्टीचा बराचसा विचार केलेला दिसतो किंवा गांवातल्या लोकांशीं संबंध ठेवल्यामुळें, कदाचित् माझ्यापेक्षां ही गोष्ट जास्त ठळकपणें तुमच्या नजरेला आली असेल! पण असं आहे खरं. मुंबईला खरो-खरच मला मोकळं वाटतं. एक वर्ष होऊन गेलं; पण ह्या उभ्या वर्षांत तक्रार करायला कॉलेजच्या आवारांत मला एकही कारण सांपडलं नाहीं. गांवगुंडागिरी तर नाहींच नाहीं! त्यामुळं मला केवढं तरी हायसं वाटलं. मनाला त्या तसल्या नसत्या कुसपुशी नसल्या कारणानं अभ्यासही मोठ्या समाधानानं झाला. राजा-रामशास्त्र्यांच्या कृपेनं पुष्कळसं वाचनही झालं, पुष्कळसं पाह्यलाही मिळालं. तुह्मी इथल्या रॉयल एशियाटिक सोसायटींत गेलां होतां का?" नाना नाहीं

ह्मणाला, तेव्हां मी पुन्हां बोलूं लागलें, "त्या सोसायटीचे तुह्मी अवश्य मेंबर व्हा. हें परिक्षेचं वर्ष आहे खरं पण त्यांतल्या त्यांत अप टु डेट रीडींग करायचं हें साधन हातचं घालवूं नका–"

मी आजीबाईसारखा उपदेश करीत आहें असें मला वाटलें खरें, पण ज्या साधनामुळें आपल्याला उपयोग झाला त्याचा दुसऱ्यालाही व्हावा ही कल्पना आल्यामुळेंच मी रॉयल एशियाटीक सोसायटीची गोष्ट काढली. नानाबद्दल एक प्रकारचा अकारण ओढा माझ्या मनाला यापूर्वी वाटत असे आणि ह्मणूनच मी तसें बोल्लें.

क्षणभर आह्मी दोघें एक शब्दही न बोलतां स्तब्ध राहिलों. बोलण्याचा विषय संपल्यासारखा झाला होता. भाषणाला पुन्हां तोंड कसें फोडावें याचा जणूं काय दोघेंही विचार करीत होतों. नानाच्या मनांत तितक्यांतच निघून जायचें नव्हतें; आणि त्यानें निघून जावें असें मलाही वाटलें नव्हतें. असें मला कां वाटलें याचें माझें मलाच आश्चर्य वाटूं लागलें.

ही कल्पना मनांत येते न येते तोंच नाना म्हणाला, "कांहींतरी बोल्लं पाहिजे असं वाटतं, पण बोलण्याला तोंडच फुटत नाहीं. तुमच्या या बोर्डिंगचे नियम पुण्याच्या फर्ग्युसनच्या हॉस्टेलइतके कडक नाहींत, म्हणून मला इथं बसतां आलं! पण ती फर्ग्युसनची जाणीव अंतःकरणांत कुठंतरी डाचते आहे, म्हणूनच विचारांना तोंड फुटत नाहीं. मी पुन्हां आलों तर तुला वाईट वाटणार नाहीं ना? आतां आपण पूर्वीचे राहिलों नाहीं. यंदा तूं बी. ए. होशील, मीही बी. ए. होईन. कदाचित् आपणां दोघांचे मार्ग भिन्न होतील. कायद्याचा अभ्यास करण्याची माझी इच्छा आहे. पास झालों तर मी लॉ कॉलेज जॉईन करीन आणि —आणि त्याचवेळीं कदाचित् तुझं लग्नही होईल—"

मी चटकन उठून ह्मटलें, "केव्हांही नाहीं. आजच्या परिस्थितींत तरी लग्न व्हावं असं मला केव्हांही वाटणार नाहीं. लग्न झालेल्या माझ्या मैत्रिणींची स्थिती माझ्या नजरेसमोर उभी राहिली ह्मणजे लग्न व्हावं असं मला मुळीं वाटतच नाहीं. आतां तुह्मी कायद्याचा अभ्यास करालच; पण कायद्याचा अभ्यास करण्याची कल्पना मनांत नसतांही हिंदू लॉ–वर मी जी थोडीशी नजर घातली आहे त्यामुळं लग्न करावं असं माझ्या मनांतसुद्धां येत नाहीं. हिंदू लॉ–मुळें लग्न

झालेल्या स्त्रियांची जी असहाय स्थिती झालेली आहे ती जिला कळत असेल ती कोणतीही मुलगी लग्नाला तयार होणार नाहीं—" असें ह्मणून मी थांबलें.

नाना विचारांत पडल्यासारखा दिसला. त्याचा चेहरा अगदीं गोरामोरा झाला होता. त्याच्या मनावर माझ्या भाषणाचा असा हा काय परिणाम झाला, याची मला कल्पना आली नाहीं असेंच कांहीं ह्मणतां येणार नाहीं.

तो ह्मणाला, " वर वर वाचनानं कायद्याची गुंतागुंत चांगलीशी लक्षांत येत नाहीं. हिंदु लॉ—वर देखील निरनिराळ्या ग्रंथकारांनीं टीका लिहिल्या आहेत, त्याही पहिल्या पाहिजेत. लग्नाबद्दल इतक्यांत विकल्प घेऊन बसूं नकोस. तुझ्या आईबरोबर या विषयासंबंधीं माझं बोलणं झालं आहे. सुट्टींत तूं पुण्याला जाशील त्यावेळीं तुला तें कळेलच. पण पुन्हा एकदां सांगतों, कीं कायदा ह्मणजे एक बिकट कोडें आहे. त्या कायद्याचा ज्यांनीं अभ्यास केला आहे त्यांना देखील त्याचा ठाव लागला नाहीं. कायद्यामुळं जी एक प्रकारची विशिष्ट परिस्थिती उत्पन्न होते तीच परिस्थिती दुसऱ्या एकाद्या प्रान्तांत त्याच कायद्यामुळं निवळलेली दिसते. प्रत्येक न्यायाधीश आपापल्या बुद्धिप्रमाणें कायद्याचा अर्थ लावित असतो आणि त्यांतून थक्क होऊन जाण्याजोगे निष्कर्ष काढीत असतो, हें ज्याला माहीत आहे त्याला कायद्याचें भय मुळींच वाटणार नाहीं —"

मी मधेंच म्हटलें, " या कायद्याच्या जुगारांत आपल्या आयुष्याचा फांसा टाकावा असं कोणत्या विचारी व्यक्तीला वाटेल ? हें असलं जुगारी आयुष्य ज्याला पत्करत असेल त्यानं खुशाल पत्करावं ! मला तें नको आहे. हिंदु मुलगी जोंपर्यंत अविवाहित आहे तोंपर्यंतच तिला स्वातंत्र्य आहे. स्वातंत्र्याची किंमत मला जगण्यापेक्षांही जास्त मोठी वाटते. हिंदूत्वामुळें उत्पन्न होणारं गुलामापेक्षांही निकृष्ट स्थितीचं पारतंत्र्य मला नको आहे. मला लग्न करायचं नाहीं, तें इतर मुली म्हणतात त्याप्रमाणें नव्हे. मी लग्न या विषयावर सांगोपांग विचार केला आहे आणि त्या विचाराचं फळ ह्मणूनच मी लग्न करणार नाहीं असं म्हणतें आहें—"

नाना खालीं मान घालून जमिनीजवळ पहात होता. त्याची दृष्टि निश्चळ झाली होती. त्याचे विचार दूरवर भ्रमण करीत होते असें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें. मी बोलत असतांना मधेंच थांबलें तरी त्यानें माझ्याकडे वर पाहिलें नाहीं. किंबहुना माझें भाषण त्याच्या कानीं गेलें कीं नाहीं, अशीही मला शंका वाटली.

मी पुढें बोलूं लागलें, " आतां मी मुंबईत आलें आहें. साधनांची इथं अनुकूलता आहे, त्याचा मी फायदा घेणार. कायदेपंडितांनाही भेटणार. मला माहीत आहे, कीं मी लहान वयाची मुलगी आहें म्हणून मला धुडकावून देण्या-इतके इथले लोक बिनकाळजाचे नाहींत. त्यांना अंतःकरण आहे आणि ज्या कळकळीनं मी त्यांच्याशीं चर्चा करायला जाणार आहें, त्या कळकळीच्या बळावरच मी त्यांना माझ्याशीं या विषयावर चर्चा करायला भाग पाडीन. "

अगदीं सहजीं नानाच्या तोंडून उद्गार बाहेर पडले, " खरं आहे, खरं आहे; पण माझं एवढंच सांगणं आहे, कीं पूर्ण विचार केल्याशिवाय कोणताही निश्चय मनाशीं ठरवूं नकोस. तुझा स्वभाव मोठा हट्टी आहे—हट्टी हा शब्द वाईट अर्थानं घेऊं नकोस—आग्रही आहे म्हण पाहिजे तर—दृढनिश्चयी आहे असंही म्हण पाहिजे तर; पण मला खात्री आहे, कीं तूं एकदां निश्चय केलास तर तो बदलणं तुला फार कठीण जाईल. म्हणून म्हणतों—नव्हे विनंति करतों, कीं कोण-ताही निश्चय करूं नकोस. विद्यार्थ्यांप्रमाणें कोणत्याही विषयाची चर्चा करायला हर-कत नाहीं, पण पूर्ण विचाराशिवाय कोणताही निश्चय केला तर शेवटीं पश्चात्तापाला कारण होतो, हें मी तुला सांगितलं पाहिजे असं नाहीं. आपण एकाच वर्गांतले विद्यार्थी आहोंत. विद्वत्तेच्या तोलानं आपणा दोघांचा दर्जा सारखा आहे. पण वयानं मी तुझ्यापेक्षां दोन–तीन वर्षांनीं मोठा आहें. पुरुष या नात्यानें माझा व्यवहार जास्त व्यापक स्वरूपाचा असल्यामुळें अनुभवाचं क्षेत्रही माझ्यापुरतं मोठं आहे. पुरूष या नात्यानें मला जितका अनुभव घ्यायला मिळतो तितका अनुभव तुला मिळणार नाहीं, असं मी म्हटलं तर तूं उगीच राग येऊं देऊं नकोस. वस्तुस्थितीच तशी आहे—" तो क्षणभर थांबून माझ्याकडे पाहून पुन्हा म्हणाला, " मला पुष्कळ बोलतां आलं असतं–पण आतां बराच वेळ झाला आहे. मला गेलं पाहिजे. माझ्यामुळं तुझ्या अभ्यासांत कदाचित् व्यत्यय आला असेल, पण मी एवढंच सांगतों, कीं पुन्हा केव्हां आलों तर अशीच पुन्हाही चर्चा करीत बसूं ! बरं नमस्कार. "

असें म्हणून तो अगदीं अचानकपणें उठून निघून गेला.

## प्रकरण १३ वें

# ‘देव उतरला पाहिजे’



नाना अचानक उठून कां गेला याचें कारण मला अंदाजतां येईना; पण त्याची ती एकदम उठून जाण्याची रीत मात्र चमत्कारिक होती. कांहींतरी एकदम आठवण झाल्यासारखें व्हावें आणि माणसानें एकदम निघून जावें, तसें त्याचें वर्तन झालें होतें.

एकंदरींत मला तो प्रसंग अनपेक्षित वाटला. हें असें कां झालें हें ठरविण्याचा मी प्रयत्न केला नाहीं.

त्या दिवसापासून नाना शक्य तितका वारंवार मला भेटायला येऊं लागला. जसजशा भेटी वाढत गेल्या, तसतसा भाषणाचा ओघही बदलत जाऊं लागला. पहिल्या पहिल्यानें कोणत्याही विषयाची चर्चा करतांना भाषणाच्या बहुतेक भागाचा वाटा त्याचा असे. मी नुसते प्रश्न करीत असें. पण ज्यावेळीं कांहीं बाबतींत मतभेद होऊं लागला, त्यावेळीं बरेचसें बोलण्याची पाळी माझ्यावर येऊं लागली.

पुढें पुढें तर असें होऊं लागले, कीं बहुतेक माझेंच चऱ्हाट सुरू असे आणि कथापुराणाला जाणाऱ्या भाविक आजीबाईप्रमाणें तो नुसतें श्रोत्याचें काम करीत असे.

माझ्या जुन्या जाणिवेला त्यामुळें एकप्रकारची पुष्टी येऊं लागली.

‘मी कुणी तरी आहें’ असें जें मला वाटत असें त्याचा प्रत्यय दृढ होऊं लागला. नानासारख्या सुविद्य आणि अभिमानी पुरुषावरही माझी छाप पडत चालली आहे असें वाटून मी एकपरीनें फुशारून जाऊं लागलें. कोणतेंही मत प्रस्थापित करण्याच्या बाबतींत मी जितका जास्त दुराग्रह धरीत असें तितकीच तो पड खात असे. त्यामुळें या असल्या चर्चेचें मला व्यसन लागल्यासारखें झालें. विरोध न करतां मुकाट्यानें ऐकणारा वक्ता मिळाल्यामुळें मला त्याचा सहवास आवश्यक वाटूं लागला.

मला कोणत्याही प्रकारच्या खेळांची आवड नसे. माझ्या बरोबरच्या मुली टेनिस किंवा बॅडमिन्टन खेळत असत. त्यांच्याबरोबर खेळायला येण्यासाठीं त्या मला आग्रह करीत असत; पण मी जात नसें ह्मणून मी त्यांच्या थट्टेचा विषय होऊन राहिलें होतें. घरच्या बैठ्या खेळांचीही मला आवड नसे. ब्रिज, बिझिक, किंवा नुसते साधे पत्ते यांची मला ओळख सुद्धां नव्हती. अधाशीपणें वाचन करणें आणि वाचनाचा कंटाळा आल्यावर नवे नवे विषय घेऊन त्यांच्यावर चर्चा करणें, एवढेच काय ते माझें विरंगुळ्याचें साधन होतें.

परीक्षेचे दिवस जवळ येत चालले तसतसें माझें अभ्यासाबाहेरचें वाचनही वाढत चाललें. या माझ्या अत्याचाराबद्दल माझ्या बरोबरच्या विद्यार्थिनीं मला दोष देत असत.

युनिव्हर्सिटीचे परीक्षक कोण आहेत याचा तपास करून त्यांच्या नोट्स निरनिराळ्या कॉलेजांतून मिळविण्याच्या खटपटींत ज्यावेळीं इतर विद्यार्थी आणि विद्यार्थिनी असत, त्यावेळीं रॉयल एशियाटिक सोसायटी किंवा पेटिट लायब्ररींत आलेलीं नवीन पुस्तकें वाचण्याचा माझा क्रम सुरू असे.

मी नापास होणार हें भविष्य सर्वत्रांनीं वर्तविलें होतें. पण मी त्याच्याबद्दल अगदीं पूर्णपणें उदासीन होतें.

नानानेंही एके दिवशीं मला भीत भीत सूचना दिली. त्यावेळीं मी ह्मटलें, " परीक्षा पास होण्याची माझ्यावर मोठीशीं जबाबदारी नाहीं. या वर्षी नापास झालें तर पुढल्या वर्षी बसेन. एक वर्ष बुडाल्यानं कांहीं माझं नुकसान होत नाहीं. तुह्मांला त्याची जोखीम वाटतं. वयाच्या एका विशिष्ट मर्यादेंत परीक्षा पास होणं तुह्मांला भाग आहे. तुह्मांला नोकरी करावयाची आहे—"

नाना मधेंच ह्मणाला, " नाहीं. मी केव्हांही नोकरी करणार नाहीं. "

मी विचारलें, " मग काय करणार ? दुकानदारी करणार कीं फेरीवाल्याचें काम करणार ? "

गालांतल्या गालांत हंसत नाना ह्मणाला, "तुमचा फारच थट्टेखोर स्वभाव ! नोकरी न करणं ह्मणजे दुकानदारी करणं नव्हे. सुशिक्षित माणसाला दुकानदारी शोभत नाहीं. दुकानदारींत स्वातंत्र्य आहे हें मला कबूल आहे. पण बुद्धिमत्तेचे डाव खेळवायला दुकानदारींत वाव नाहीं. मी कायद्याचा अभ्यास करणार आहें आणि वकिलीच्या

धंद्यांत शिरून कोणत्या ना कोणत्या सार्वजनिक कार्यांत पडावं अशी माझी महत्वाकांक्षा आहे."

त्याच्या या उद्गाराबद्दल जरी मला समाधान वाटलें तरीही थोड्याशा थट्टेच्या स्वरानें मी म्हटलें, "असं? एकंदरींत हिंदुस्थानांत नांव गाजवायचा तुमचा विचार दिसतो? मग कशाला एवढे परीक्षेला भीतां? व्हा ना कां एक दोन वर्षं नापास!"

असें म्हणून मी मोठमोठ्यानें हंसलें आणि तोही हासला.

हंसतां हंसतां गंभीर होऊन तो म्हणाला, "ही झाली माझी गोष्ट. पण तुम्हीं या वर्षी नापास होतां कामां नये असा माझा आग्रह आहे. वयाच्या मर्यादेचा तुमच्या बाबतींत जरी मोठासा प्रश्न नाहीं तरी एका विशिष्ट कारणामुळं तो प्रश्नही ध्यानांत घ्यावा लागतो. ज्या वयांत तुम्हीं मॅट्रिकची परीक्षा उतरलांत, त्या वयाच्या अनुरोधानं तुम्हीं बी. ए. होणं अवश्य आहे. ज्या वयांत बरेचसे पुरुष विद्यार्थी जेमतेम मॅट्रिकची परीक्षा पास होतात त्या वयांत तुम्हीं बी. ए. झालांत तर स्त्रीदाक्षिण्य बाळगणाऱ्या कुणाही व्यक्तीला ती एक कौतुकाची गोष्ट होऊन राहील—" आपल्या बोलण्याचा माझ्यावर काय परिणाम झाला हें पहाण्यासाठीं त्यानें क्षणभर माझ्या डोळ्याला डोळा दिला, पण माझ्या चेहऱ्यावरचें औदासिन्य दिसल्यामुळें तो म्हणाला, "तुम्हांला त्याचं महत्व नसेल पण मला आहे. नापास होण्याची शिक्षा तुम्हांला मिळूं नये अशी माझी आत्यंतिक इच्छा आहे. तेवढ्यासाठींच मी म्हणतों, कीं हीं सटरफटर पुस्तकं वाचणं तूर्त बंद ठेवा आणि नोट्स वाचण्याकडे थोडंसं लक्ष द्या. कोणत्याही परीक्षकाच्या नोट्स माझ्याजवळ तयार आहेत."

मला थोडीशी चीड आली. त्या चिरडीच्या स्वरांतच मी म्हटलें, "नोट्स! परीक्षकांच्या नोट्स वाचून मला पास व्हायचं नाहीं. त्यापेक्षां नापास झालेलं मला बरं वाटेल. क्लास मिळवण्याचा मला हव्यास नाहीं. मी नुसती पास झालें तरी सुद्धां मला त्याचं समाधान वाटेल. जिथं नापास व्हायलाच मी भीत नाहीं तिथं क्लास घालवण्याची खंत कसली धरायची?"

नाना शरमिंदा झाला आणि म्हणाला, "जशी तुमची इच्छा.—"असें म्हणून त्यानें बोलण्याचा विषय बदलून टाकला.

त्यानंतर आम्ही दोघें बराच वेळ बोलत होतों; पण त्यांत परीक्षा पास नापास होण्याचा कुणीच उल्लेख केला नाहीं.

मी अभ्यासाबाहेरचीं पुस्तकें वाचित होतें म्हणजे अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत होतें, असें मुळींच नव्हे. अभ्यास जसा व्हायचा तसा चालला होता. पण विद्यार्थी लोक परीक्षेच्या अभ्यासासाठीं म्हणून जो जिवाचा आटापेटा करतात तसा मी करीत नव्हतें, एवढेंच.

परीक्षा सुरू झाली. मंडपांतून निघाल्यावर इतर विद्यार्थिनी आपण लिहि-लेल्या पेपरचा इतरांच्या पेपरशीं पडताळा पहाण्याचा जो विधी करतात, त्या भानगडींत मी कधींच पडलें नाहीं. कुणी तसा प्रश्न केल्यास मी त्याला कधींच सरळ जबाब दिला नाहीं. मी जे पेपर लिहिले ते लिहिले—ते लिहून गेल्यावर काय लिहिलें तें विसरूनच मी मंडपाबाहेर पडत असें. प्रश्न वाचला, त्याचें जें उत्तर सुचलें तें लिहिलें, याच्यापलिकडे जास्त जाण्याची माझी इच्छा नसे. पेपर हातीं येतांच त्यांतील कोणते प्रश्न आपणांस सोपे जातील याची निवड मी कधींच केली नाहीं, त्यामुळें उत्तर दिल्याशिवाय माझा कोणताही प्रश्न वगळला गेला नाहीं. प्रश्नांची निवड करण्यासाठीं विचार करण्यांत काळाचा अपव्यय न करतां त्याची भरपाई मी सारे प्रश्न सोडवण्यांत केली. 'पेपर कसे काय गेले ?' असें कुणी विचारलें तर मला निश्चित असें उत्तर देतां येत नसे. "काय होतें तें दिसेलच" असें म्हणतांना मी दांभिकपणाचें अवलंबन करीत नव्हतें.

खरोखरच मी बुद्धिपूर्वक पास होण्याचा प्रयत्न केला नव्हता. नुसतीं प्रश्नांचीं उत्तरें लिहिलीं होतीं, तीं जशीं मला वाटतील तशीं लिहिलीं होतीं. परीक्षकाला खूष करण्याची कल्पना माझ्या डोक्यांत केव्हांही आली नाहीं. कोणत्याही परीक्ष-काच्या नोट्स् आगाऊ वाचलया नसल्यामुळें प्रश्नांचीं उत्तरें लिहिण्याच्या बाबतींत बुद्धिभेद होण्याची भीति मला नव्हती. त्यामुळें 'पेपर कसे गेले' असा कुणी प्रश्न केला म्हणजे मला चीड येत असे आणि जें तोंडाला येईल तें फटकळ उत्तर देऊन टाकून मी मोकळी होत असें.

आधींच माझ्या घमेंडखोरीबद्दल माझ्या बरोबरच्या मंडळींत चर्चा चालत असे. नोट्स् वाचण्याचा प्रयत्न न केल्यामुळें मी माझ्या सहाध्यायी मंडळींच्या एक प्रकारें मनांतून उतरलें होतें. नोट्स् न वाचतां मी जर पास झालें असतें

तर त्यांना मरणप्राय दुःख झालें असतें. पण त्यांना काय वाटलें असतें हें मी पास झाल्यावर मला कळण्याची संधि नव्हती.

नापास झालें असतें तर अर्थातच त्यांचा जय होता.—पण या सगळया पुढल्या गोष्टी होत्या.

परीक्षा पुरी झाल्यावर बरेच विद्यार्थी आणि विद्यार्थिनी मुंबई सोडून गेल्या पण मला पुण्याला जाणें जिवावर आलें होतें. प्रशस्त जागेंत राहाण्याची संवय लागल्यामुळें कबुतरी खुराड्यासारख्या त्या घरांत राहाणें भाग येण्याची मला एक प्रकारची भीति वाटत होती.

म्हणून कांहींना कांहीं तरी कारण काढून मुंबईचा मुक्काम वाढविण्याचें मी ठरविलें. मला ठकीचा तपास लावायचा होता. मधल्या काळांत बनींचें बिऱ्हाड कुठें बदललें त्याचा पत्ता मला लागत नव्हता. पुन्हां एकादां तपास करून पाहिला पण परातभर वाटाण्यांत टाकलेला एकादा वाटाणा जसा टिपून काढतां येत नाहीं त्याचप्रमाणें मुंबईच्या अफाट राजवटींत बनींचें बिऱ्हाड शोधून काढणें मला अशक्य झालें. जुन्या बिऱ्हाडाच्या शेजाऱ्यांकडे तपास करतां तिथेंही थांग लागेना. त्यांनीं बिऱ्हाड बदललें एवढेंच कळण्यापलीकडे जास्त कांहींच माहिती मला मिळाली नाहीं.

ठकीचा पत्ता लावण्याची मला फार तळमळ लागली होती. कितीतरी वर्षे होऊन गेलीं होतीं, पण एक क्षणभरही मला तिची विस्मृती झाली नव्हती. ती मुंबईतच आहे असें नुसतें मनाला वाटे. पण तसें कां वाटे याला कांहीं कारण नव्हतें. ती रस्त्यांत कुठेंतरी भेटेल अशी खुळी आशा पदोपदीं वाटत असे. राणीच्या बागेसारख्या सार्वजनिक जागांतून तिच्या शोधासाठीं मी उगाच हिंडत असे. नाटकें पहाण्याची मला फारशी आवड नसे, तरी तिचा पत्ता लागावा म्हणून मीं नाटकाला जात असें आणि मुद्दाम बसत असें. त्या काळात कांहीं बायका पुरुषांबरोबरच पुढल्या रांगांतून बसत असलेल्या दिसूं लागल्या होत्या. पण त्या बहुतेक सुखवस्तु गृहस्थांच्या बायका होत्या. छापखान्यांतील कंपा. झिटरची बायको- केव्हांही त्या जागांतून आढळली नसती. आणि म्हणूनच सांपत्तिक अनुकूलता असूनही मी मुद्दाम बायकासाठीं राखून ठेवलेल्या कमी दराच्या जागेंत बसत असें.

इतकें करूनही ठकीचा पत्ता लागला नाहीं. वयपरत्वें तिच्या चेहऱ्यांत फरक तर झाला नाहीं ना, अशी शंका केव्हां केव्हां माझ्या मनांत येई.

पण मनाची खात्री होती—कोणत्याही परिस्थितींत मी ठकीला ओळखून काढीन, असें मला इटकून वाटत असें. आत्मविश्वासाच्या बाबतींत माझ्या बुद्धीनें मला केव्हांही दगा दिला नव्हता, म्हणूनच मला ही खात्री वाटत असे. आणि हजार माणसांतून ठकीही मला ओळखून काढील असें माझ्याही मनाला वाटत असे. ओळख पटल्याशिवाय रस्त्यामधून आम्ही एकमेकांच्या समोरून निघून गेलों, असें मला कुणी सांगितलें असतें तरी खरें वाटलें नसतें.

इतक्या कसोशीनें तपास करूनही ठकीचा पत्ता लागला नाहीं याची मला फार चुटपुट लागली. निराश होऊन मी पुण्याला निघून गेलें पण मनांतली ही अढी विरघळली नाहीं.

मी पुण्याला येऊन पोंचलें त्यावेळीं मला असें दिसून आलें, कीं आईची प्रकृति कोणतेंही दुखणें नसतां बरीच खालावली होती. दादा त्यावेळीं एल्. एल्. बी. झाला होता, आणि पुण्याच्या एका प्रख्यात वकिलाच्या हाताखालीं वकिलीचें काम करीत होता.

त्याच वर्षी दादाचें लग्न ठरलें होतें. दादाच्या लग्नाबरोबरच माझेंही लग्न उरकून घेण्याची बाबांची तयारी चालली होती.

सहजासहजीं निघणाऱ्या भाषणावरून ही हकीकत ज्यावेळीं मला कळली त्यावेळीं मी आईला अगदीं स्पष्टपणें विचारलें.

ती म्हणाली, " तुझ्या बाबतींत सर्वच गोष्टी जगाविरुद्ध चालल्या आहेत. इतर मुलींच्या आया मुलींच्या लग्नासाठीं ... घेऊन बसतात आणि बाप क्वचित दुर्लक्ष करतात—पण इकडे अगदींच उलट झालं आहे. तुझ्या इच्छेविरुद्ध लग्न करूं नये असें मी म्हटलं आहे आणि तिकडनं तर तुझ्यासाठीं स्थळं पाहण्याची केवढी तरी घाई चालली आहे. बोलून चालून मी बायको माणूस, माझ्या शब्दाला कोण विचारतं ?"

बोलत असतांना आईच्या डोळ्यांतून टचकन् दोन आसवें गळलीं. माझें हृदय भरून आलें. मला वाटलें, कीं केवढी मी भाग्यवान् ! मुलगी लग्न करीत नाहीं म्हणते म्हणून बिनतक्रार तिच्या इच्छेला मान वांकवणारी आई त्या काळांत फारच विरळा होती.

आईला विचारलें तसेंच बाबानांही उघडउघड विचारण्याचा मी निश्चय केला आणि एके दिवशीं जेवणाच्या पंक्तीवरच मी ही संधी साधली. लग्नाचा विषय ह्मणजे केवढा नाजूक! पण त्याच्या महत्त्वाची खिजगणती न धरतां मी अगदीं ओबडधोबडपणें प्रश्न करायला सुरुवात केली.

मी ह्मटलें, "बाबा, तुह्मी ह्मणे माझ्या लग्नाच्या भानगडींत आहांत?"

बाबांच्या हातांतील घांस गळून ताटांत पडला. ते क्षणभर माझ्याकडे नुसते पाहातच राहिले आणि ह्मणाले, "गोदे, तुला कांहीं माणुसकी आहे का? कीं आतां बी. ए. होणार आहेस ह्मणून शेंफारलीस?"

दादा जेवीत असतां वर न पाहातांच ह्मणाला, "मुंबईच्या हवेचा परिणाम—! किंवा संगतीचा परिणाम!"

त्याच्या बोलण्यांत खोंच होती—कुजकटपणा होता. त्यावेळीं त्याच्या या उद्गारांची मला इतकी चीड आली होती, कीं थोडेंसें आत्मसंयमन केलें नसतें तर उष्ट्या हातानें मी त्याच्या तोंडांत भडकावली असती.

बाबा म्हणाले, "गोदे, तूं विद्वान झाली असशील, तुला मोठा शहाणपणाही आला असेल, पण ध्यानांत ठेव, कीं मी तुझा बाप आहें. पदोपदीं हिच्या शब्दाला मान देऊन मी पुष्कळ गोष्टींकडे दुर्लक्ष करीत आलों पण या बाबतींत मी कुणाचंही ऐकणार नाहीं.—"

आईनें सूचक दृष्टीनें माझ्याकडे पाहिलें. बाबांचें बोलणें सुरूं होतेंच, "मुलीच्या असो किंवा मुलाच्या असो, लग्नाची जबाबदारी बापावर आहे. पुण्याहवाचनाच्या वेळीं नवऱ्याच्या हाताला हात लावण्यापलीकडे बायकोला जास्त अधिकार नाहीं. या बाबतींत मी तिचंही ऐकणार नाहीं आणि तुझंही ऐकणार नाहीं."

बाबांचे हे उद्गार ऐकून दादा इतक्या विषारीपणानें हंसला, कीं माझ्या पायाची तिडीक मस्तकाला गेली. त्या रागाच्या भिरभिरींत मी तिडकून बोललें, "दादाचं लग्न तुह्मी खुशाल ठरवा, त्याला तें हवंच आहे. त्याला स्वतंत्र व्हायचं आहे. धंदा करायचा आहे. कारण नसतांना थकून चाललेल्या माझ्या आईला सोडून जाण्याची माझी इच्छा नाहीं. जोंपर्यंत माझी आई हयात आहे, तिच्या नवऱ्याला पत्नीची पर्वा नाहीं, मुलाला तिचें अंतःकरण

कळत नाहीं, तोंपर्यंत तिच्याकडे पाठ फिरवून वाटेवरच्या चोराचा हात धरून घराबाहेर जाण्याची माझी इच्छा नाहीं. ”

बाबा अग्निशर्मा होऊन उठले आणि मोठ्यानें किंचाळून ह्मणाले, “ कार्टे, कुणाला हें उत्तर देतेस. पेन्शनर झालों ह्मणून मी निस्तेज झालों असं का तुला वाटतं ? मी कायदा जाणतों. तुला अजून कायद्याची ओळख नाहीं. तूं अजून अज्ञान आहेस आणि मी ठरवीन त्याच्याशीं लग्न करणं तुला भाग आहे. ”

“ देव उतरला पाहिजे वरून ! ” असें ह्मणून मी ताट लोटून एकदम उठलें आणि कशी बशी आंचवून खोलींत जाऊन बिछान्यावर अंग टाकलें.

बाबांचें तणतणणें सारखें सुरू होतें. दादा मधून मधून कुजकट उद्गार काढून आगींत तेल ओतीत होता. थोड्या वेळानें आई रडत रडत खोलींत आली आणि माझ्याजवळ बसली. तिच्या डोळ्यांतलीं आसवें माझ्या गालावर टपटप पडत होतीं.

मी तिच्याकडे पाहिलें मात्र—दृष्टादृष्ट होतांच एकाद्या लहान पोराला उचलतात त्याप्रमाणें मला उचलून हृदयाशीं कवटाळून ती ओक्साबोक्शीं रडत ह्मणाली, “ गोदे पोरी, काय हें केलंस ? ”

तिच्या त्या काकुळतीच्या उद्गारासरशीं माझ्या पोटांतून भडभडून आलें. उत्तर देण्यासाठीं तोंड उघडण्याचा प्रयत्न करतांना रडण्याचा उमाळा अनावर झाला. किती तरी हुंदके देत आह्मीं दोघीही रडण्याचा उमाळा चालवण्याचा प्रयत्न करीत होतों. तिच्या तोंडून शब्द निघेना आणि माझ्या तोंडचे शद्ब तिच्या आसवांनीं धुवून नेले होते.

एकमेकींना मिठ्या मारून आह्मी तशा स्थितींत झोपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं तार आली. मी पास झालें, फर्स्ट क्लासांत आलें.

---

## प्रकरण १४ वें

# पदवी आणि लग्न

मी पास झालें याबद्दल सर्वांना अभिमान वाटला. फर्स्ट क्लासांत आलें ही गोष्ट तर सर्वतोमुखी होऊन बसली. पण आधल्या रात्रींच्या प्रकारापासून मी घरांत असूनही एक प्रकारची परकी बनलें होतें.

इतर लोकांशीं बोलतांना बाबा तोंड फाटेपर्यंत माझी तारीफ करीत असतां रागाच्या भाषणांत जरी थोडीशी आशीर्वादी झांक असे, तरीही माझ्याबद्दलच्या त्यांच्या अभिमानांत ऐकणारांच्या दृष्टीनें कांहीं वैगुण्य दिसून येत नव्हतें.

असें जरी होतें तरी बाबा किंवा दादा यांनीं घरांत माझ्याशीं भाषण वर्ज्य केलें होतें.

आईला अर्थातच आनंद झाला होता; तरी बाबादादांप्रमाणें तिची तारीफ औपचारिक नव्हती. शेजारपाजारच्या बायकांनीं विचारलें तर तिनें म्हणावें, " गोदू पास होणार यांत शंकाच नव्हती. तिच्या वयाचे मुलगे अजून मॅट्रिक-सुद्धां झाले नाहींत, पण तिनें एवढ्या परीक्षा दिल्या याचें मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. "

तिचें हे उद्गार ऐकून शेजारणी माना तुकावित असत खऱ्या, पण तिच्या या आत्माभिमानाबद्दलचा दुर्बोध उद्गार कोणाच्याच लक्षांत येत नसे.

आश्चर्य वाटत होतें तें माझें मलाच. कुठल्याही परीक्षक प्रोफेसरांच्या नोट्स् न वाचतां मी पास कशी झालें ? मग बाकीचे विद्यार्थी नोट्स् वाचण्याबद्दल एवढा जो अट्टाहास करतात तो चुकीचा होता काय ? चुकीचा नाहीं म्हणावा तर नोट्स् वाचल्याशिवाय पास होणें बहुतेक विद्यार्थ्यांना असाध्य होऊन कां बसलें होतें ?

तसें पाहिलें तर मी अभ्यासही विशेषसा लक्षपूर्वक केला नव्हता. माझा बरा-चसा वेळ अभ्यासाबाहेरचीं पुस्तकें वाचण्यांत गेला होता. अभ्यासाबाहेरचीं पुस्तकें वाचल्यामुळें नोट्स् वाचण्याच्या उणीवेची भरपाई झाली काय ? इंग्लि-शच्या पेपरमध्यें मला सर्वांपेक्षां जास्तींत जास्त मार्क मिळाले होते. इंटरच्या

परीक्षेच्या वेळीं जेमतेम पास व्हायला पुरेसे मार्क मिळून मी त्या परीक्षेतून निभावलें होतें. मग बी. ए. च्या वेळीं हें असें कसें झालें ? फर्ग्युसन सोडून विल्सनमध्यें आल्याचा हा परिणाम काय ! कीं अभ्यासाबाहेरची पुस्तकें वाचल्याचा हा परिणाम ?

कोणत्याही एका विशिष्ट प्रकारामुळें हें झालें नसून या सर्व गोष्टींच्या समुच्चयामुळेंच मी फर्स्ट क्लासांत आलें, असाच निर्णय विचाराअंतीं मला वाटला.

तरीही परीक्षा पास झाल्याचें समाधान मला वाटलें नाहीं. त्यांत विशेष काय झालें ? कॉलेजांतील ठराविक अभ्यासक्रमाचा मला यत्किंचितही उपयोग झाला नाहीं, असें माझें मन मला सांगत होतें. मग परीक्षा पास होण्यांत महत्त्व तें काय राहिलें ? नुसती बी. ए. ची डिग्री ! पुरुषांना नोकरी मिळविण्याच्या कामीं या दोन अक्षरांचा उपयोग होत असेल. पण मला बायकोमाणसाला कुठं नोकरी करायला जायचें होतें ?

थोड्या विचाराअंतीं माझ्या मस्तकांत प्रकाश पडला. विचाराअंतीं म्हणण्यापेक्षा एके दिवशीं बाबांचें आपल्या एका मित्राशीं जें भाषण चाललें होतें, त्यामुळेंच बी. ए. च्या डिग्रीचें महत्व मला कळलें.

बाबा म्हणत होते, " शंकररावांचा मुलगा आय्. सी. एस्. साठीं विलायतेला गेला होता. मधें त्याची आई आजारी असल्यामुळं परवां इथं आला आहे. गोदूची कीर्ति त्याच्या कानीं गेली. आमच्या दादानं त्याला तिचा फोटोही दाखवला. फार खुष झाला बेटा ! पाहिल्याशिवाय देखील जवळजवळ लग्न ठरून गेलं म्हणाना ! आतां एक अडचण आहे. शंकरराव मोठा पाताळयंत्री माणूस आहे. मुलानं मुलगी पसंत केली, हें कळल्यावर त्या गोष्टीचाच त्यानें फायदा घेतला आणि लेकाचा आतां वीस हजार रुपये हुंडा मागतो आहे. वीस हजार रुपये देणं मला जरी फारसं शक्य नाहीं, तरी मुलीच्या कल्याणाकडे पाहून ही रक्कम कशीबशी उभी करणं मला भाग आहे. अहो, हाच बेटा उद्यां कलेक्टर होऊन यायचा. आम्ही नुसते डेप्युटी कलेक्टर होतों तर लोकांना नुसते नाचवीत होतों. कलेक्टर म्हणजे संस्थानिक—जिल्हा म्हणजे एकाद्या संस्थानापेक्षांही मोठा असतो—तिथला तो राजा ! हातीं अनियंत्रित सत्ता. कलेक्टरची बायको म्हणजे राजाची राणी. असली जागा—नव्हे स्थळ—मिळण्यासाठीं वीस हजार रुपये देणं म्हणजे कांहीं भारी नाहीं—"

कलेक्टरच्या पदवीचें बाबांचें पुराण सारखें सुरू होतें. तें ऐकण्याचा जरी मला वीट आला तरीही त्यामुळें एक गोष्ट मला कळली. पदवीमुळें पुरुषांना नोकरी मिळणें जसें सुलभ जातें, तसेंच दुष्टाचार्य नवरा मिळविण्याला मुलींना पदवी सहाय्यभूत होते.

कुठली झकू मारली आणि मी बी. ए. झालें असें मला वाटलें. एवढा उच्छाद झाला तरीही बाबा ही गोष्ट कशी दांतीं धरून बसले आहेत, याचें मला कौतुक वाटलें. त्यांच्यासारखीच मीही कलेक्टरीला भाळेन, आज ना उद्यां समजूत पडेल आणि मी या भावी सुलतानाशीं लग्न करायला तयार होईन, अशी वेडी आशा एखाद्या पेन्शनर डेप्युटी कलेक्टरलाच शोभली असती.

ऐकलेली सारी हकीकत मी आईला सांगितली. आई क्षणभर स्वस्थ राहिली, आणि थोडावेळ विचार करून ह्मणाली, "तुझा विचार तरी काय आहे गोदे? या इथल्या अर्ध्याहळकुंडानं पिवळ्या होणाऱ्या मुलींप्रमाणें 'मला नाहीं बाई लग्न करायचं' असं ह्मणत ह्मणत मुकाट्यानं बोहल्यावर उभं राहायचा जर तुझा विचार असेल, तर उगीच चार आडवेतिडवे शब्द बोलून वडील माणसांचा मनस्ताप वाढवूं नकोस. आपली 'होय' ह्मणून मोकळी हो ह्मणजे झालें. पण खरो-खरच तुला लग्न करायचं नसेल, तर तसा निश्चय कां केला आहेस हें आधीं मला मोकळेपणानं सांग."

मला विचार पडला. मी या विषयाचा पूर्णपणें विचार केला नव्हता, तरीही मी ह्मटलें, "लग्न करायचं नाहीं असं कांहीं माझं ह्मणणं नाहीं. पण लग्न करावं असं वाटेपर्यंत मात्र मी लग्नाला तयार होणार नाहीं."

आई ह्मणाली, "पण तुला लग्न करावं असं वाटूं लागलं आहे हें आह्मांला कसं कळावं?"

आईच्या या उद्गाराचें मला हसूं आलें.

तें पाहून आई ह्मणाली, "हसूं नकोस पोरी, हंशावारी न्यायचा हा विषय नव्हे. तूं सांगितल्याशिवाय कांहीं तें आह्मांला कळायचं नाहीं. बरं, तूं सांगितलंस तर त्यावेळीं आह्मांला वाटतं तसलं स्थळ आढळून येईल कशावरून? हातचं स्थळ निघून जावं आणि मग तुला लग्न करायची आठवण व्हावी—असं झालं तर उभयपक्षीं फजितीच नाहीं कां व्हायची?"

" काय वेडी आहेस ग आई ? " मी पुन्हां हसून ह्मटलें, " लग्न करण्याची ज्यावेळीं मला बुद्धि होईल, त्यावेळीं तुझा भावी जांवई तुझ्यापुढं आणून उभा करण्याची तयारी झाल्याशिवाय कां होईल ? " आई मोठमोठ्यानें हसूं लागली. त्यावेळीं मी ह्मटलें, " आतां तूं कां हंसतेस ? हंसण्यासारखा हा विषय नव्हता ना ?"

आई ह्मणाली, " माझें भाषण हंसण्यासारखं नव्हतं. पण तूं जें बोललीस तें ऐकून कुणाला हसूं येणार नाहीं ? आह्मी असतांना एकदम जांवई आणून आमच्यापुढें हजर करायच्या गोष्टी तूं बोलूं लागलीस तर मला कसं हसूं येणार नाहीं ?"

मी ह्मटलें, " यांत हंसण्याजोगं काय आहे ? सून आणून हजर करीन, असं जर तुझ्या मुलानं ह्मटलं असतं तर तुला हसूं आलं असतं का ? "

" काय खट्याळ आहेस ग पोरे, " आई ह्मणाली, " मी ह्मणतें, हो ! हंसलें असतें—नव्हे रडलेंसुद्धां असतें. भरल्या घरांत मी हयात असतां कुठल्या तरी पोरीला घेऊन माझा मुलगा आला असता आणि त्यानं ह्मटलं असतं, कीं ' ही तुझी सून ! ' तर मला काय वाटलं असतं याची तूंच कल्पना कर. "

" मला पोटभर आनंद झाला असता. " मी चटकन् बोलून गेलें, " मला वाटलं असतं, केवढा समजूतदार माझा मुलगा ! त्यानं आपल्यासाठीं बायको शोधून काढण्याचे कष्ट मला दिले नाहींत. मंडपाची उठाठेव, सणंगांची खरेदी, दागिन्यांची निवड आणि उपाध्यांचा दक्षिणेचा खर्च न पडूं देतां अचानक सून घरीं आणली ! केवढा हा माझा मुलगा बुद्धिवान् !–केवढी ही त्याला आईबापांची कळकळ !—कुणाला मुलगा व्हावा तर असाच व्हावा, असंच मला वाटलं असतं. मुलाबद्दल जर असं वाटतं तर मुलीबद्दल तसंच कां वाटूं नये ? "

कपाळाला आठ्या घालीत आई ह्मणाली, " खरं—खरं, पण मुलाची आणि मुलीची गोष्ट एक कशी होईल ?

मी माझा तोफेचा गोळा फेंकला, " कां ? "

"हें तुझं 'कां' मोठं वाईट पोरी !" आई ह्मणाली, "या तुझ्या 'कां'च्या पायीं माझा जीव अगदीं रडकुंडीला येतो. जिथं उत्तर द्यायला कांहीं आधार नसतो तिथें ' कां ' आलं, कीं कांहींतरी उत्तर देऊन वेळ मारून न्यावीशी वाटते—पण त्याच वेळीं माझ्या लहानपणची आठवण समोर उभी राहाते ' मुलगी ती मुलगी

आणि मुलगा तो मुलगा ' असं तोंडदाबीचं उत्तर अगदीं जिभेवर येतं खरं, पण--पण---"

" पण तूं माझी आई आहेस !" मी चटकन् उद्गारलें, " इतरांच्या आईसारखी नाहींस. तुझी तारीफ करीत नाहीं मी--पण तूं अशी आहेस म्हणूनच अजून मी जीव धरून राहिलें आहे. नाहीं तर या शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या जाचणुकीमुळं एखाद्या दिवशीं मला जीव द्यावा, असं वाटलं असतं. बरं का आई, बाबांना स्पष्ट सांग, म्हणावं, गोदीच्या लग्नाच्या भानगडींत पडूं नका. तिला वाटेल तेव्हां ती लग्न करील. तिच्या लग्नाची उठाठेव तुम्हांला करावी लागणार नाहीं. ज्या दिवशीं तिला लग्न करावंसं वाटेल, त्यावेळीं आपल्या ' नवऱ्या 'ला घेऊन ती तुमच्या पायावर डोकं ठेवायला येईल. "

आई हंसली आणि स्वस्थ राहिली. तिचें तें हंसणें मी होकारार्थी धरून चाललें.

आईनें हें माझें भाषण बाबांना केव्हां तरी सांगितलें असावें, कारण दुसऱ्याच दिवशीं याचा स्फोट झाला. नानाही त्याच वर्षी पास झाला. त्याचे चुलते आम्ही राहात होतों त्याच वाड्यांत राहात होते. त्यामुळें तोही तिथें आला होता.

बाबा नानाला सांगत होते, " आतां नानासाहेब, तुम्हींच पहा. मी हिला बी. ए. पर्यंत शिकवली ती अशी फाजील होण्यासाठीं का ? दादाचं नाहीं का मीच लग्न केलं ! त्यानं कुठं हरकत घेतली नाहीं ती ? मला वाटतं मुलीपेक्षां तुम्ही मुलगेच बरे. दादासाठीं मुलगी मी पाहिली. जाऊन मुलगी पहा म्हणून सांगितलं, त्यावेळीं तो जायला तयार होईना. कळलं ? तो म्हणाला, ' तुम्हांला पसंत पडली कीं मला पसंतच आहे. मी जास्त काय पहाणार ? तुमचा अनुभव मला का येणार आहे !' असं तो म्हणाला आणि मीही माझं कर्तव्य केलं. मुलगी पाहायला जायला त्याला सक्तीनं भाग पाडलं. तो गेला तो माझी आज्ञा म्हणून गेला. स्वतःच्या इच्छेनं गेला नाहीं. आणि ही कार्टी मला उत्तर देते, कीं मला लग्न करावसं वाटेल तेव्हां नवऱ्यासकट तुमच्या पायां पडायला येईन म्हणून. चांगलं नाक ठेचलं पाहिजे ! "

नानानें शांतपणें विचारलें, "असं प्रत्यक्ष तिनं तुम्हांला सांगितलं ?"

" नाहीं--प्रत्यक्ष नाहीं सांगितलं, " बाबा जरा थंडावून म्हणाले, " पण तिनें तसं मला सांगायला सांगितलें. एकदा वडधडींत तोंडावर अपमान केल्यावर

पुन्हां तिला समोर विचारण्याइतका मी मूर्ख नाहीं. पण माझी खात्री आहे, कीं मी जर विचारलं तर याहीपेक्षां उर्मट भाषेंत उत्तर ऐकणं माझ्या नशिबीं येईल."

"खरं आहे," नाना ह्मणाला, "मला देखील असंच वाटतं. पण आपण ज्या भाषेला उर्मट ह्मणतां ती भाषा उर्मट आहे, कीं सडेतोड आहे याचा मला थोडासा प्रश्न पडेल. केवळ वडील माणसांची मुर्वत राखण्यासाठीं तोंडदेखलं उत्तर देण्यापेक्षां कटु सत्य सडेतोड भाषेंत सांगणं बरं, असं मला वाटतं. आपल्याला कदाचित् तसं वाटणार नाहीं. पण हा एका पिढींतल्या अंतराचा परिणाम आहे."

हें भाषण चाललें होतें त्या वेळीं मी त्याच खोलींत एका कोंपऱ्यांतल्या खुर्चीवर वाचीत बसलें होतें. मी ऐकावें ह्मणून बाबा बुद्धिपुरसर बोलत होते, याची मला जाणीव होती.

पण नाना देखील मी ऐकावें ह्मणून—त्याच्या भाषणानें मी खूष व्हावें ह्मणून तसें बोलत होता काय, असा प्रश्न एक क्षणभरच माझ्या मनांत आला.

विचाराअन्तीं मला तो प्रश्न चुकीचा वाटला. मला खूष करतांना बाबांची नाखुषी पत्करल्याशिवाय तसें बोलतां आलें नसतें, हें न कळण्याइतका नाना मूर्ख नव्हता.

मी उगीच त्याचा संशय घेतला, असें वाटून मला थोडासा पश्चात्ताप झाला.

बाबांना नानाचें बोलणें आवडलें नाहीं. ते ह्मणाले, "मुंबईला गेल्यामुळें तुमच्या मनावर परिणाम झाला असं मला वाटतं. नानासाहेब, ही पारशी ख्रिश्चनांचीं थेरं मुंबईत गेल्यामुळं तुमच्या नजरेसमोर येतात आणि पहिल्याच परिचयाच्या झळाळीनं तुह्मां तरुणांच्या तीं नजरेंत भरतात. आमची संस्कृति फार उज्वल आहे. नीति-अनीतीचे आमचे नियम फार कठोर आहेत. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. रूढीचीं बंधनं अशीं शिथील होत चाललीं आहेत, तरी धर्माचीं बंधनें कायमच राहाणार."

"मग स्वयंवराचं काय?" नाना मधेंच उद्गारला, "स्वयंवर अधार्मिक आहे का?"

"स्वयंवर क्षत्रियांसाठीं आहे. ब्राह्मणाचा त्याच्याशीं संबंध नाहीं. पुराणांतील कथानकांशीं ताडून पाहिलं तर ब्राह्मणांच्या स्वयंवराचे इतिहास उपलब्ध नाहीत."

" पण ब्राह्मण मुलींनीं क्षत्रियांशीं स्वयंवरें केलीं आहेतच की नाहीं ? "

" तें खरं—ते खरं, पण त्यांत मुलींनीं आपल्या बापाची संमति घेतल्याचं दिसून येईल. एक शकुंतलेचा अपवाद आहे पण ती ब्राह्मणाचीच मुलगी होती असं कांहीं ह्मणतां येत नाहीं. "

" असं कसं ह्मणतां येईल. ब्राह्मणाची मुलगी ह्मणूनच ती वावरत होती. आपण ब्राह्मणाची मुलगी नव्हे, हें तिला माहीत असल्याचा उल्लेख नाहीं. किंब-हुना ती गर्भवती आहे हें कळल्यानंतरच कण्वानें तिची हकीकत तिला सांगितली असं दिसून येतं—"

बाबा विषय तोडून टाकण्याच्या उद्देशानें म्हणाले, " पुराणाच्या गोष्टी आतां कशाला हव्यात? आपण आजची परिस्थिति पाहूं—अगदीं व्यावहारिक दृष्ट्या या गोष्टीचा विचार करूं, जगाचे टक्केटोणपे खाल्लेलीं आईबापं विद्यमान असतां अन-नुभवी मुलांनीं लग्नासारख्या महत्वाच्या प्रसंगाची जबाबदारी आपल्या अंगावर घेणं, केव्हांही शहाणपणाचं होणार नाहीं."

नानानें उत्तर दिलें, " पूर्वीची गोष्ट निराळी होती. पण आतां तो मनु पालटला आहे. निदान गोदूबाईंच्या बाबतींत तरी हा प्रश्न कायद्याच्या बाहेर गेला आहे. निदान गोदूबाईंच्या बाबतींत तरी तसं ह्मणतां यायचं नाहीं. कायद्यानं देखील त्या सज्ञान झाल्या आहेत. अशा वेळीं त्यांची जबाबदारी त्यांच्यावर टाकली तर त्यांत काय बिघडेल? "

नानाचें भाषण सुरू असतां मी एकदम पुढें होऊन ह्मणालें, " कुणी नको माझ्या लग्नाची उठाठेव करायला! बाबा, मला तुमची मतं नको आहेत आणि नाना, मला तुमचींही मतं नको आहेत—"

बाबा ताडकन् उठून जात जात ह्मणाले, " मला तुझ्याशीं मुळीं भाषणच कर्तव्य नाहीं!"

नाना कांहीं बोलण्याचा प्रयत्न करीत होता असें पाहून मी ह्मटलें, " नाना, ध्यानांत ठेवा, कुणाच्याही मतानें किंवा शिकवणीनें स्वतःच्या मनाची खात्री पटल्याशिवाय मी कोणतीही गोष्ट करणार नाहीं. मग तें लग्न असो की दुसरं कांहीं असो! तुह्मी काय बोलणार तें मला माहीत आहे. मनाला पटेल तें करावं पण वडिलांचा उपमर्द करून उगीच असमाधान उत्पन्न करूं नये, असंच ना तुह्मी

मला सांगणार ? नाना, ध्यानांत ठेवा असमाधानाच्या भीतीनं मी हा दांभिकपणा केव्हांही करणार नाहीं. मग त्यामुळं जगानं माझ्यावर वाटेल ते आरोप केले तरी त्याची मला पर्वा नाहीं. प्रामाणिकपणापुढं जगाच्या आरोपाची किंमत मी एक कवडीसुद्धां करीत नाहीं. ''

नाना डोळे तारवटून क्षणभर माझ्याकडे पाहात राहिला आणि दचकल्या सारखें करून तोंड फिरवून निघून गेला.

त्या क्षणापासून घरांत माझ्याशीं कुणीच बोलेनासें झालें. आईसुद्धां माझ्याशीं बोलण्याचें टाळूं लागली. तें जीवन मला दुस्सह झालें. एम्. ए. च्या परीक्षेला कॉलेजांत जाण्याची जरी जरूरी नव्हती तरीही त्या अभ्यासासाठीं मुंबईलाच राहाणें बरें असें मी ज्यावेळीं सांगितलें, त्या वेळीं कुणींच आडकाठी घेतली नाहीं.

मुंबईला येऊन मी पुन्हां आपल्या बोर्डिंगांत दाखल झालें.

---

# प्रकरण १५ वें

# शिरीन पाटक



मुंबईला येऊन मी अभ्यासाला सुरुवात केली खरी, पण चित्ताला मुळींच स्वस्थता नव्हती. मी पुणें सोडलें त्यावेळीं आईची प्रकृति चांगलीशी नव्हती. अशा स्थितींत आईला सोडून येण्यांत माझ्या हातून अपराध घडला आहे, असें पदोपदीं माझें मन मला सांगत असे.

कॉलेजच्या टर्म्स भरण्याचा प्रश्न नव्हताच, त्यामुळें अभ्यासही त्याच अनुरोधानें चालला होता. परिक्षेसाठीं इंग्रजी वाङ्मय हा विषय घेतल्यामुळें ठराविक पुस्तकें वाचण्यापेक्षां अभ्यासाबाहेरचीं पुस्तकें मी जास्त वाचीत असें. बी. ए.च्या परिक्षेच्या वेळचा अनुभव पाठीशीं असल्यामुळें ठराविक पुस्तकें सोडून वाचण्याची मला मुळींच धास्ती वाटत नव्हती. एम्. ए. च्या परिक्षेला बसणार, असें सांगून जरी मी आलें होतें, तरीही त्या परिक्षेला बसण्याचा माझा पूर्ण निर्धारही झाला नव्हता. या सर्व गोष्टींच्या तोंड मिळवणीमुळें एम. ए. च्या अभ्यासापेक्षां माझा अभ्यास म्हणजे रिकामपणचें वाचन होऊन राहिलें होतें.

तरीही मनाची अस्वस्थता वाढत होती. तत्त्वासाठीं म्हणून मी बाबांबरोबर भांडलें खरी, पण ती गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली होती. माझ्या भांडणामुळें आईच्या मनाला दुःख झालें असेल, ही कल्पना वारंवार माझ्या मनांत येई. पुणें टाकून मुंबईला आल्यानें मी एकप्रकारें घर–दार आईबाप असतांही निराधार झालें होतें. बाबा खर्चासाठीं पैसे पाठवीत असत खरे, पण मनाला त्यामुळें एकप्रकारचा विषाद वाटत असे. ज्यांच्याबरोबर भांडलें, त्यांचेच पैसे घेऊन चरितार्थ चालविला जात आहे, ही डांचणी कांहीं केल्या मनांतून जाईना.

एकदां असें वाटे, कीं कुठेंतरी नोकरी धरावी. पण नोकरी मागण्यासाठीं कुणाच्या तरी दारीं जाऊन याचना करण्याची मला स्वभावतःच चीड येई. नोकरीवांचून माझें कांहीं अडलें नव्हतें, मग मी नोकरी कां करावी?

जुन्या मैत्रिणी भेटतील म्हणून शक्य ते प्रयत्न केले, तर त्यांतील कुणाचाही पत्ता लागेना. राजारामशास्त्रीही याचवेळीं कुठें बाहेरगांवीं गेले होते, त्यामुळें मी अगदींच एकलकोंडी पडलें.

एके दिवशीं एक चमत्कार झाला. शिरीन पाटक सामानसुमानाच्या ट्रंका घेऊन माझ्या खोलींत दाखल झाली. मी पास होऊन आल्यावर रस्त्यांतून ती मला भेटत असे. त्यावेळीं नुसत्या हवापाण्याच्या गोष्टीखेरीज इतर कांहीं गोष्टी बोलत नसे. पण या दिवशीं ती एकदम सामानसुमान घेऊन आलेली पाहून मी क्षणभर चकितच झालें.

ट्रंका खोलींत नीट व्यवस्थेशीर लाऊन हुश्श करीत ती आरामखुर्चीवर पडली.

कांहीं वेळ ती कांहींच बोलली नाहीं. आणि मीही कांहीं विचारलें नाहीं. कांहीं तरी विलक्षण प्रकार घडून आला असला पाहिजे अशी मी अटकळ केली.

थोडा वेळ गेल्यानंतर माझ्याकडे न पहातां वर छताकडे दृष्टी लावून ती म्हणाली, "झालं, संपलं ---"

ती पुढें कांही बोलत नाहीं असें पाहून मी अगदीं जपूनच विचारलें, "काय संपलं ?"

माझ्या प्रश्नामुळें तिला एकदम हुंदका आला आणि दोन्ही हातांनीं तोंड झांकून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. जवळ जाऊन तिचें सांत्वन करावें असें क्षणभर मला वाटलें. पण मी पुन्हां विचार केला. रडण्याचा ओघ रडूनच पुरा होणें यावेळीं आवश्यक होतें.

रुमालानें डोळे पुसून ती माझ्याकडे पहात म्हणाली, "मी रडलें याचें तुला आश्चर्य वाटत असेल—मी मोठी धीराची मुलगी म्हणून तुम्हीं सारीजणं समजत आलां होतां—आणि ती ही अशी धीराची मुलगी ढसढसां रडते कशी, असा प्रश्न तुझ्या मनांत आला असेल—"

बोलत असतांना ती एकदम मधेंच थांबली—उठून खिडकी जवळ गेली ! क्षणभर तिथेंच पहात उभी राहिली आणि पुन्हां येऊन एक साधी खुर्ची माझ्या खुर्चीशेजारीं ओढून घेऊन बसून म्हणाली, "गोदूबेन, बायकांचा जन्म मोठा वाईट नाहीं का ग ?"

त्या तशा स्थितींतही तिच्या त्या प्रश्नाचें मला हसूं आलें. मी हंसत हंसतच म्हटलें ! "वा ! मोठा छान शोध लावलास. या नव्या शोधावरच का एकटी रडत होतीस ती ?"

" नाहीं बेन," ती हंसण्याचा आविर्भाव आणित म्हणाली, " त्या शोधासाठीं रडत नव्हतें. रडत होतें माझ्या मूर्खपणासाठीं. आईबापांना हृदय असतं असा माझा समज होता. पोटच्या गोळ्याच्या प्रेमापेक्षां माणसाला लोकाचाराची चाड जास्त असते, याची कल्पना मला नव्हती. तें भ्रमाचं पटल दूर झाल्यामुळं मला असं रडावं लागलं."

" मी देखील त्याच कारणामुळं मुंबईला आलें," मी अगदीं रुक्ष स्वरांत म्हटलें, " पण तुझ्यापेक्षां माझ्या बाबतींत एक फरक आहे. तुझा दोषारोप आईबापांवर होता. माझी आई माझ्या बाबतींत निर्दोष आहे. कदाचित् तुझं माझं कारण एक नसेल—पण एकंदरींत एकच असण्याचा संभव फार. लग्नाचीच बाब का ? "

माझ्या शेवटच्या प्रश्नानें तिची मुद्रा कठोर झाली. तिरस्कारानें वळलेल्या मुठी खुर्चीच्या हातावर आपटीत ती म्हणाली, ' हो, हो, लग्नाचीच बाब ! आई-बाप म्हणे आईबाप ! कशाला आम्हांला एवढं शिक्षण देतात ? असा जुल्मच करायचा तर तुम्हीं हिंदूसारखींच परकऱ्या पोरींची लग्नं कां नाहीं करीत ? विलायतेला जाऊन लंडनच्या डिग्र्या मिळाल्यानं कांहीं कुणाला माणुसकी येत नाहीं. प्रत्यक्ष आमच्या घरीं—प्रत्यक्ष आम्हां सर्वांच्या देखत दारू पिऊन लोटांगणं घातलेलीं पाहूनही त्याच माणसाशीं लग्न करायला सांगणाऱ्या आईबापांना म्हणावं तरी काय ? गांवगप्प असती तर गोष्ट निराळी होती. पण इथं देखत पुरावा. मला आश्चर्य वाटलं तें माझ्या आईचं. तिच्या बुद्धीला देखील कसा भ्रम पडला. लंडनच्या डिग्रींत इतकं का तेज आहे ? आई काय म्हणते, ' कुणी दारूबाज नसतातच कीं काय ? पुरुषाची जात आहे, विलायतेला गेल्यानं होत असेल क्वचित् कमीजास्त, त्यांत एवढं वाईट कशाला वाटायला हवं ? तुझी तूं हुशार असलीस तर त्याला लग्न झाल्यावर ताळ्यावर आण !' हे आईचे उद्गार ! कुठला दारुडा कधीं ताळ्यावर आला आहे का ? एवढंसं कार्टं एव्हांपासून जर इतकी दारू पिऊं लागलं, तर पुढं काय करील याची कल्पना या वडील माण-सांना आली पाहिजे होती. पण या लंडनच्या डिग्र्यांनीं त्याचे डोळे दिपून गेले ! मी तडातड भांडलें. बापानं घरांतून निघून जायला सांगितलं आणि मी एकदम त्यांची आज्ञा मान्य केली. केवढी आज्ञाधारक मुलगी मी ! "

त्या उद्गाराचें मला हंसूं आलें असतें, पण माझी हकिकत मला आठवली. मी गंभीरपणानें म्हटलें, " माझी हकिकत जवळजवळ अशीच आहे. पण तो कांहीं दारुड्या नव्हता. तो कसा होता हें मला माहितसुद्धां नव्हतं आणि म्हणूनच मी नकार दिला. आईनं मला विरोध केला नाहीं—किंबहुना पाठिंबाच दिला, पण बाबांनीं आग्रह धरला म्हणूनच मी कांहींतरी कारण काढून घर सोडलं. "

खोलीतमोंवार पाहात ती मला म्हणाली, " हें बोर्डिंग आहे, अनाथगृह आहे कीं वेड्याचं हॉस्पिटल आहे ? मी इथं कां आलें हेंच मला कळत नाहीं. माझ्या जातीच्या माझ्या मैत्रिणी आहेत, त्यांच्याकडे मला जातां आलं असतं. पण पूर्वीचा अनुभव होता ना ? या विषयाबद्दल मी त्यांच्याशीं चर्चा केली होती. कुणालाच माझं म्हणणं पटेना. तुला पटेल असं वाटलं म्हणून इथं आलें. पण तूंही तशीच आलेली. आतां पटायचा प्रश्नच नाहीं—"

मी मधेंच म्हटलें, " पटायचा प्रश्न नाहीं खरा. पण दुसरी एक अडचण आहे. हें हिंदूंचं बोर्डिंग आहे—"

तीही मधेंच म्हणाली, " तें मला माहित आहे. पण तुझ्या बोर्डिंगांत मला जेवायला रहायचं नाहीं. कुठंतरी जाऊन कांहींतरी खाऊन येईन. नुसती डोकं टेकण्यापुरती जागा पाहिजे आहे—माणसाचा आधार पाहिजे आहे—जिथं माझ्या शब्दाला शब्द मिळेल अशा माणसाचा आधार मला पाहिजे आहे. मी बोललें तर माझ्या जिवाची भाषा ज्या कुणाला कळेल, त्याचा सहवास मला पाहिजे आहे. सामानसुमान घेऊन व्हिक्टोरियांत बसलें, तोंपर्यंत कांहीं विचार नव्हता. गाडी-वाल्याला नुसती गाडी हाणायला सांगितली. रस्त्यांत तुझं बोर्डिंग दिसलं, तुझी आठवण झाली, तुझा स्वभाव आठवला, तुझीं मतं आठवलीं आणि गाडी इथंच थांबवली. योगायोगानं अगदीं योग्य जागीं आलें ! " असें म्हणून ती उठली आणि पुन्हां इझीचेअरवर आडवी झाली.

शिरीनचें मन आटोक्याबाहेर अस्वस्थ झाल्याचें स्पष्ट दिसून येत होतें. अशा वेळीं जास्त चर्चा करणें निर्दयपणाचें झालें असतें, म्हणून मी आपणहून प्रश्न सुद्दामच केले नाहींत.

छताकडे डोळे लावून ती आरामखुर्चींत स्वस्थ पडली होती. तिच्या देहाची हालचाल जरी मुळींच होत नव्हती, तरी मनाच्या हेलकाव्यांचें प्रतिबिंब तिच्या

चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसून येत होतें. निरनिराळ्या मनोविकारांच्या छाया तिच्या चेहऱ्यावरून निसटत्या जात असल्या तरी माझ्या शोधक दृष्टीला त्या स्पष्टपणें दिसून येत होत्या. चेहऱ्यावरील त्या छायेच्या अनुरोधानें तिचे विचार काय चालले असतील याची अटकळ बांधीत मी तिच्याकडे टक लावून पहात बसलें होतें.

मधून मधून ती माझ्याकडे पहात असे खरी, पण त्या दृष्टींत टक नव्हती. सहज ओझरती नजर माझ्या चेहऱ्यावरून निसटून जात असे एवढेंच. तिच्या त्या अस्वस्थपणामुळें मला तिची फारच कींव आली.

आणि त्या बरोबरच दुसरा असा विचार आला, कीं माझ्या स्वतःचें काय ? मीही तिच्यासारखीच भांडून आलें होतें. मी अस्वस्थ झालें नाहीं आणि हिलाच असें कां वाटावें ?

क्षणभर या गोष्टीचा मला अभिमान वाटतो न वाटतो तोंच माझ्या बुद्धी-समोर प्रकाश पडला. शिरीन अस्वस्थ झाली—ती तिची आई आणि बाप दोघेंही विरोधी होतीं म्हणून. मला आईचा पाठिंबा होता. आईच्या अनुकूलतेमुळें बाबांच्या विरोधाची मला पर्वा वाटत नव्हती. वस्तुतः पाहिलें तर बाबांच्यापुढें आईचें कांहींच चाललें नसतें, तरीही मला आईचा आधार वाटत होता. सक्तीनें मुंडावळ्या बांधून मला बोहल्यावर उभें करण्याइतकी मी लहान राहिलें नव्हतें किंवा अपंगही नव्हतें. घर सोडावें लागलें असतें तर उदरनिर्वाह करण्याचें साधन—भली मोठी बी. ए. ची पदवी—मला लाभली होती. त्याच जोरावर मी बाबांची पर्वा केली नव्हती—पण ती पदवी तरी त्यांच्याच कृपेनें मिळाली होती ना ?

पुन्हां वाटे, त्यांत कसली एवढी कृपा ? आईनें हट्ट धरला नसता तर केव्हांच त्यांनीं मला कुणातरी मूर्खाच्या गळ्यांत बांधून टाकलें असतें. कुणाची कृपाच असेल तर ती आईची !

ध्वनीला प्रतिध्वनि झाला. चटकन् माझ्या कानीं शब्द आले, "आईला सुद्धां माझ्याबद्दल कांहीं वाटूं नये ना ? विलायतेच्या डिग्रीची झळाळी इतकी का तेजस्वी असते ?"

"असते ग बाई असते !" मी उत्तर दिलें, "माझे बाबा असाच डिग्रीवाल्या-साठीं जिवाचा आटापिटा करतात. बी. ए. मुलीला नवरा आय्. सी. एस्‌च हवा,

असं त्यानीं स्केलच बांधून टाकलं आहे. पण आई माझ्यासाठीं धांवून आली, तिनं बाबांना विरोध केला, माझा शब्द खालीं पडूं दिला नाहीं, म्हणूनच तुझ्या इतकीच मी अस्वस्थ झालें नाहीं."

"काय करूं?—काय करूं? कांहीं सुचत नाहींसं झालं आहे!" असें म्हणून ती खुर्चीवरून उठली आणि येरझारा घालूं लागली.

"कांहीं खाल्लं आहेस का?" असें मी तिला विचारलें, तेव्हां ती म्हणाली, "हो चांगल्या शेलक्या शेलक्या शिव्या खाऊन आलें आहे."

त्या तसल्या परिस्थितींतही मला तिच्या शब्दांचें हंसूं आलें.

गड्याला बोलावून समोरच्या इराण्याकडून स्लाईस-मस्का आणि चहा मागवला आणि बळेंच आग्रह करून तिला खायला बसवलें. पावाचा तुकडा तिच्या घशा-खालीं उतरेना, इतकें तिचें तोंड शुष्क झालें होतें. 'हा एवढा चहाच पुरे' असें म्हणून तिनें चहा घेतला आणि पुन्हां ती आरामखुर्चीत आडवी झाली. पहातां पहातां तिचा डोळा लागला. मीही एक पुस्तक घेऊन वाचीत बसलें.

पुस्तकांतील मजकुरावरून माझे डोळे नुसते फिरत होते, पण वाचलेली एक ओळसुद्धां माझ्या डोक्यांत शिरली नाहीं, इतकें तिथें विचाराचें काहूर उठलें होतें. माझ्या साऱ्या जुन्या मैत्रिणींची मला पुन्हां आठवण येत होती. ठकी कुठें असेल, बनीची गृहस्थिती कशी असेल, छबी आणि यमी सुखांत असतील का दुःखांत असतील, मला जशी त्यांची आठवण येते तशी त्यांना माझी आठवण येत असेल काय, त्यांना कुणाला मुलेंबाळें झालीं असतील काय, असें नाहीं नाहीं ते प्रश्न माझ्यासमोरून निघून जात होते.

मैत्रिणींच्या मुलाबाळांची कल्पना येतांच माझें चित्त व्यग्र झालें. मुलें असणें ही काय भावना आहे, असा एक विलक्षण प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. मी माझ्या आईची मुलगी!—माझ्या आठवणीपासून पहातें आहे, तों माझ्यासाठीं तिचा जीव तिळतिळ तुटतो, माझ्या सुखासाठीं ती नवऱ्याला सुद्धां विरोध करते! हा काय विलक्षण चमत्कार आहे? कुणाच्यासाठीं तरी आपला जीव तिळ-तिळ तुटावा, कुणाच्यासाठीं तरी आपण स्वार्थत्याग करावा, कुणाच्यासाठीं तरी आपण वेडें व्हावें, आपपर विसरावें, अशी कल्पना समोर येऊन अंतःकरण एक प्रकारें उचंबळून आलें. ही वात्सल्याची जाणीव हृदयाशीं कवटाळायला मिळणारा एक चिमुकला जीव हाताशीं असल्याची जाणीव मोठी आनंददायक वाटली.

मला मूल असतें तर—मला मूल असतें तर—पुन्हां वाटलें नको ती कल्पना. मूल असण्याच्या गोड कल्पनेपूर्वी कुणातरी परक्याशीं लग्न होण्याचें भेसूर चित्र मला भेवडावूं लागलें. मन कसें अगदीं कासावीस झालें आणि हातांतलें पुस्तक मी दूर फेकून दिलें.

त्या आवाजानें शिरीन जागी झाली आणि ह्मणाली, "किती वाजले ?"

मी घड्याळाकडे पाहिलें तों तें बंद होतें. मी ह्मटलें, "काय करायचं आहे वाजण्याशीं ? सध्यां आपल्या कर्माचें बारा वाजले आहेत एवढं मात्र खरं."

"कुणी चोकशी करायला आलं होतं का माझी ?" असें ह्मणून ती पुनः आपणच ह्मणाली, "कसं येणार कोण ? मी इथं आलें हें कुणाला माहीत आहे ? पण आई माझ्यासाठी खात्रीनं कावरीबावरी झाली असेल. मी जीव दिला असं नाहीं ना तिला वाटायचं ?–" हे शब्द उच्चारतांना ती थरारलेली दिसली.

पुन्हां ती जाऊन तशीच खुर्चीत आडवी झाली आणि माझ्या कल्पनांचें काहूरही सुरू झालें.

हा मायेचा जिव्हाळा ! हें मुलीचें आपल्या आईबद्दल प्रेम. हें काय गौडबंगाल आहे ? आई आणि मूल—आई आणि मूल—आई आणि मूल ! तीच तीच कल्पना पुन्हां पुन्हां माझ्यासमोर नाचूं लागली. मूल होणें ह्मणजे काय ? हा जिव्हाळा—हा मायेचा पान्हा कुठून निर्माण होतो—कां निर्माण होतो—या मायेच्या पान्ह्यांत जगाचें सर्वस्व सांठवल्याचा भास कां होतो ? लग्नाच्या पायीं आई मुलीला विरोध करते, घर टाकून जायला सांगते, रागाच्या तिरमिरींत ती मुलगीही घर टाकून निघते आणि राग ओसरतांच त्या मुलीला आईच्या जिव्हाळ्याची आठवण होते; हें काय गौडबंगाल आहे ?

शिरीन पुन्हां खुर्चीतून उठली आणि मला ह्मणाली, "मी घरीं जातें. आई घाबरली असेल. या माझ्या ट्रंका इथंच राहूं दे. पुन्हां मी येईन—राह्यलाच इथं येईन. आपण दोघींही अभ्यास करूं—खूप जोरजोरानं अभ्यास करूं. अगदीं सेंट पर्सेंट मार्क मिळविण्याच्या तयारीनं अभ्यास करूं. एक पहिली आणि एक दुसरी. पुरुषाला ह्मणून पहिला नंबर येऊं द्यायचा नाहीं. मग पाहूंया विलायतचे डिग्रीवाले काय करतात ते—" तिनें चटकन् बॅग स्वनगटावर चढवली, छोटी

छत्री हातीं घेतली आणि माझ्या उत्तराची वाटसुद्धां न पहातां खडखड बूट वाजवीत ती बाहेर पडली.

मी खिडकींतून पहात होतें. ती पूर्वीच्या इतकीच उल्हासित वृत्तीनें भराभर पावलें टाकीत होती. तिच्या चेहऱ्यावर मिस्किल हंसण्याची छटा डोकावत होती.

ती दिसेनाशी होतांच मी पुन्हां येऊन बसलें आणि पुस्तक घेऊन वाचायचा प्रयत्न करूं लागलें. पुन्हां तीच स्थिति ! एक अक्षरसुद्धां ध्यानीं येईना.

आंत येतांना मी दरवाजा बंद केला होता. कुणाचीं तरी पावलें बाहेर वाजलीं. कुणीतरी दारावर टिचक्या वाजवल्या. मी ‘ कम् इन ’ ह्मणतांच दरवाजा उघडला.

मी आश्चर्यानें थक्क झालें. येणारी व्यक्ती दुसरी तिसरी कोणी नसून खुद्द नानाच होता.



# प्रकरण १६ वें

# शिरीनची धांदल

नाना आंत येतांच मी आश्चर्यचकित झालें खरी, पण मला तसें आश्चर्य कां वाटलें याचाच उलगडा होईना.

नाना मुंबईंत होता हें मला माहीत होतें. लॉ टर्मस भरण्यासाठीं मुंबईंत राहणें त्याला भाग होतें. मी येऊन जरी बरेच दिवस झाले होते, तरीहीं तो आला नाहीं ह्मणून मला आश्चर्य वाटलें. कां ?

त्याचेही उद्गार तसेच निघाले.

तो ह्मणाला, " इतके दिवस झाले तरी मी तुझी चौकशी केली नाहीं, याचें तुला आश्चर्य वाटलें असेल, " मी काय बोलतें याचा अंदाज पहाण्यासाठीं तो क्षणभर थांबला, पण मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो पुढें ह्मणाला, " कदाचित् तुला आश्चर्यही वाटले नसेल, तुझी वृत्तीच मोठी चमत्कारिक आहे. मी पहात आलों आहें, कीं इतर चार माणसांवर कोणत्याही गोष्टीचे ज्या प्रकारचे परिणाम होतात, त्यापेक्षां अगदींच उलट्या नजरेनें तूं ह्या अशा गोष्टींकडे पहात असतेस. आज मी आलों याचें दुसऱ्या कोणाला आश्चर्य वाटलं असतं, पण तुझ्या मनावर कांहींच परीणाम झाल्याचं दिसून येत नाहीं—"

मी मधेंच ह्मटलें, " उगीच खोटं कशाला बोलूं ? मला आश्चर्य वाटलं— अगदीं मनःपूर्वक आश्चर्य वाटलं. खरं पाह्यलं तर तुह्मी मला भेटायला यावं अशी अपेक्षा करण्याचं कारण नाहीं. तशी अपेक्षा नसतांना तुह्मी आलांत ह्मणूनच मला आश्चर्य वाटलं. "

माझ्या उत्तरानं तो अगदीं गार झाला. पुढें काय बोलावें हें क्षणभर त्याला सुचेनासें झालें. माझ्या उत्तरानें बोलण्याचा विषय आपोआपच संपून गेला होता.

तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून मी ह्मटलें, " काय काम होतं ? कीं आपले सहजच आलां होतां ? "

नाना क्षणभर अगदीं स्वस्थ राहिला, नंतर माझ्या डोळ्याला डोळा लावून सारखा पाहात राहिला आणि माझी पापणी यत्किंचितही ढळत नाहीं असें

पाहून ह्मणाला, " काय बोलावं हेंच मला सुचत नाहीं. जे बोलायचं आहे तें बोलतां येत नाहीं—दांभिकपणा तुला आवडत नाहीं हें मला माहीत आहे, ह्मणून उगीच हवापाण्याच्या गोष्टी बोलून फसवाफसवी करण्याचा साळसूदपणा मी तुझ्यासमोर तरी करणार नाहीं."

मी हंसत हंसत उद्गारलें, " तर मग जें बोलतां येत नाहीं असं ह्मणतां, तेंच बोलून टाका ना ! "

आमचीं प्रश्नोत्तरें त्यापुढें सारखीं सुरू झाली—

" जे बोलतां येत नाहीं तें कसं बोलूं ? बोललों असतों, पण मनाला थोडी भीति वाटते. कोणत्याही विषयाचा उल्लेख योग्य वेळीं झाला पाहिजे. भलत्या वेळीं भलती गोष्ट बोलून गेल्यानं कार्यनाश होण्याची भीति असते."

" माझ्या दृष्टीनं सर्व वेळा सारख्याच आहेत. कोणतीही गोष्ट तुह्मी कशीही बोललांत, मला पटलं, तर तें ठीकच आहे—पण न पटलं ह्मणून भलताच परिणाम मनावर करून घेऊन स्नेहांत व्यत्यय आणण्याइतकी मी मूर्ख नाहीं. तुमच्या एकाद्या पुरुषमित्राकडे जितक्या निःसंकोच वृत्तीनं तुह्मीं बोलाल, तितक्याच मोकळेपणानं माझ्याशींही बोलायला हरकत नाहीं."

माझ्या उत्तरामुळें नानाचा चेहरा प्रफुल्लीत झाल्यासारखा दिसला. त्याच्या हातांची सारखी चाळवाचाळव सुरू होती. तो केव्हां हात चोळीत असे, केव्हां हनुवटीवर हात फिरवीत असे, केव्हां हातांतील छत्री दूर ठेवून विसरभोळ्या-प्रमाणें पुन्हां उचलून घेत असे, तर केव्हां केव्हां खिशांत हात घालून उगीच चाचपून पाहात असे; जसा कांहीं खिशांतून एकादा जिन्नस काढून तो माझ्यापुढें ठेवावा असें त्याला वाटत होतें !

माझ्या आश्वासनानें तो धीरावला आणि ह्मणाला, " ठीक—ठीक—हें एक बरं झालं. स्पष्टपणें हेंच विचारावं असं माझ्या मनांत आलं होतं खरं, पण लाज सोडून सांगतों, कीं तसं विचारायचा मला धीरच होईना. काय असेल तें असो—तुझ्याशीं बोलतांना मला एक प्रकारची जरब वाटते" असें ह्मणून तो हंसला आणि मीही हंसतें आहे असें पाहून ह्मणाला, " खरं ना ? तुझ्यासमोर बोलतांना फार जपून बोलावं लागतं ! जपून ह्मणजे बनवून नव्हे—जपून ह्मणजे बनावट-पणाच्या अगदीं विरुद्ध ! व्यवहारांत बहुधा आह्मी शक्य तितकं बनावट बोलत

असतों—ह्मणजे अगदीं खोटं बोलत असतों असं नव्हे—ह्मणजे जें कांहीं बोलत असतों तें आधीं मनाशीं पडताळून पाहून, ऐकणाऱ्याच्या वृत्तीला पटेल अशा रीतीनं त्याची मुद्देसूद मांडणी करीत असतों. त्यालाच व्यवहारांत सारासार विचार ह्मणतात. पण हा सारासार विचार तुझ्या समोर पांगळा पडतो. जें मनांत असतं ते अगदीं सरळसरळपणें बोलल्याशिवाय तें तुला पटत नाहीं अशी अनुभवाअंती माझी खात्री झाली आहे—" असें म्हणून तो क्षणभर थांबला आणि खिशांतील रुमाल काढून चष्म्याचें भिंग पुशीत ह्मणाला, "लग्नाबद्दल तूं काय ठरवलं आहेस ?"

मी एकदम उत्तर दिलें, "तुह्मी मला मागणी घालायला आला आहांत का ?"

चष्म्याची काच किती स्वच्छ झाली आहे तें पाहण्यासाठीं डोळ्यासमोर चष्मा धरून माझ्याकडे न पाहतां तो म्हणाला, "होय !"

त्याच्या इतक्याच संथपणानें मी उत्तर दिलें, "तुमचा अर्ज मी फायलींवर ठेवतें. किंबहुना ह्या फायलींतला हा पहिलाच अर्ज आहे. या बाबतींत अजून कुणीही आपला अर्ज प्रत्यक्ष माझ्यासमोर मांडला नव्हता. बाबांच्या मध्यस्थीनें एक दोन मागण्या आल्या होत्या खऱ्या पण त्या प्रत्यक्ष नव्हत्या. माझ्या ह्या पर्सनल फायलीला त्या आजवर जमा झाल्या नव्हत्या. म्हणूनच हा अर्ज मी पहिला अर्ज आहे असं म्हणतें—"

नाना मध्येंच म्हणाला, "हा विषय आतां तूं थट्टेवारी नेते आहेस !"

"नाहीं. मुळींच नाहीं," मी म्हटलें, "ही थट्टा नव्हे. मी नुसती व्यावहारीक भाषा वापरली. हा विषय अगदीं व्यावहारीक आहे असाच माझा समज आहे, म्हणून मी तशी भाषा वापरली. ऐकलंत नाना, तुम्ही लोक लग्न या विषयाला धार्मिक किंवा अध्यात्मिक स्वरूप देतां. मला त्यांत धर्म दिसत नाहीं किंवा अध्यात्मिकताही दिसत नाहीं. लग्न हा एक उघड उघड व्यवहार आहे. उभयपक्षीं पटला तरच तो अमलांत यायचा. अमलांत आल्यावर न पटला तर काय करायचं याचा अजून मी विचार केला नाहीं, पण हा व्यवहार ठरवण्यापूर्वी उभयपक्षांनीं या—अपेक्षित म्हणा किंवा अनपेक्षित म्हणा—परिस्थितीचाही विचार केला पाहिजे. तुम्ही केला आहे का याचा विचार ?"

भुंवईला आंठी घालून नाना म्हणाला, "व्यवहार जमल्याशिवाय तोडातोडीच्या गोष्टी आधीं कशाला ?"

"तुम्ही चुकतां आहांत नाना," नकळत आवेशांत येऊन मी म्हटलें, " सर्व लोक हीच चुक करीत आले आहेत. तीच चूक करून संसार थाटण्याची माझी इच्छा नाहीं. रूढीप्रमाणेंच कायद्याचीं बंधनं या कामीं आड येत आहेत, याची आठवण आपण केली पाहिजे. दूरवर विचार करून कोणतीही गोष्ट करणं हें सूज्ञपणाचं लक्षण आहे असं ज्यांचं म्हणणं असेल, त्यानं तरी हा विचार आधीं केला पाहिजे. तुम्हाला माहीतच आहे, कीं मी सेंटिमेंटल नाहीं. कोणत्याही भावनेनं माझं मन वाहवत जाऊं नये अशी मी खबरदारी घेत असतें. त्याच अनुरोधानं मी तुम्हाला विचारतें, समजा, मी तुमच्याशीं लग्न केलं आणि कांहीं दिवसांनीं तुमचं आमचं पटलं नाहीं तर आपण काय करणार ?"

माझ्या प्रश्नानें नाना स्तंभित झाला. वेड्यासारखा माझ्याकडे नुसता पाहात राहिला, त्यावेळीं मी म्हटलें, " पुरुष आहांत कीं कोण आहांत ? यांत एवढा कसला धक्का बसला ! अशी बोबडी कां वळली ?—"

" थांब—थांब—थांब—असा भडिमार करूं नकोस !" नाना ह्मणाला, " तूं असं कांहीं बोलूं लागलीस कीं मी घाबरून जातों. लग्नाच्या प्रचलित भावनांमुळं रूढ झालेल्या मनांतल्या आकांक्षा हादरूं लागतात. तुझ्या उत्तरांत कांहीं तथ्य आहे कीं नुसताच तुझा स्वाभाविक वादविवाद आहे, याची शंका येऊं लागते. "

मी ह्मटलें, " लग्न या विषयाकडे पाहण्याची तुमची नजर माझ्यापेक्षां निराळी असावी असा मला संशय येतो. मुळांतच जर मतभेद असला, तर पुढं लग्न करून आपण संसार चालवणार कसा ? "

नाना चाचरत चाचरत ह्मणाला, " ह्मणजे इतर गोष्टी पटल्या तर माझ्याशीं लग्न करण्याची तुझी तयारी आहे, असं यावरून मी समजावं का ? "

" ऐका, " असें ह्मणून मी एक खुर्ची नानाच्या अगदीं जवळ ओढून घेऊन बसलें. मी इतक्या जवळ येऊन बसतांच तो चमकला आणि सांवरून सांवरून त्यानें आपली बैठक बदलली. मी बोलायला सुरवात केली, " ऐका नाना, आपण थोडं सिंहावलोकन करूं. आपणां उभयतांचा परिचय मोठ्या चमत्कारिक रीतीनं झाला. परिचयाला सुरुवात निंदेनें झाली. कित्येक दिवस तुह्मी माझा सारखा पाठपुरावा केला, पण मी डगमगलें नाहीं. पुढं काय झालं कुणाला ठाऊक,

तुमची वृत्ती बदलली. माझा स्नेह संपादन करण्याची तुह्मी इच्छा दर्शविली. मी विरोध केला नाहीं. आपला स्नेह वाढत चालला. विरोधाचा मागमूसही राहिला नाहीं. या आपल्या परिचयाच्या काळांत एकमेकांत खटके होण्याचे प्रसंग कधींच आले नाहींत. माझं ह्मणणं ब्रह्मवाक्य समजून तुह्मी शिरोधार्य केलं असतं तरीही तें मला पटलं नसतं. वादविवादांत आपले मतभेद झाले, हीच समाधानाची जागा आहे. त्यामुळंच पायरीपायरीनं मला तुमच्या प्रामाणिकपणाची खात्री वाटूं लागली. आपण दोघंही कॉलेजांतून एकाच वेळीं पार पडलों. आपल्या बरोबरच्या पुरुष विद्यार्थ्यांत तुमच्याखेरीज दुसऱ्या कोणीही माझ्याशीं स्नेह संपादन करण्याची इच्छा सुद्धां दाखविली नाहीं. आयुष्याचा महत्वाचा भाग ज्यांच्या सहवासांत कंठावयाचा त्यांचा चांगलाच परिचय झाला पाहिजे. या कसोटीला उतरायला तुह्मी पात्र आहांत. अपरिचित माणसांशीं लग्न व्हावं असं मला केव्हांही वाटणार नाहीं. इंग्रजी वाङ्मयाच्या अवलोकनामुळं मी असं बोलतें असा समज मात्र तुह्मी करून घेऊं नका. अगदीं लहानपणापासून मी या विषयाचा सांगोपांग विचार केला आहे. माझ्या बरोबरच्या इतर मुलींचीं चालू रूढीप्रमाणं झालेलीं लग्नं मी पाहिलीं आहेत आणि त्याचे परिणामही पाहिले आहेत. त्यामुळंच माझीं मतं अशीं बनलीं आहेत. आजपर्यंतच्या अनुभवावरून या माझ्या मतांना तुमचा विरोध नाहीं असं मला वाटतं आहे. या सर्व गोष्टींचा विचार केल्यावर मला असं वाटूं लागलं, कीं लग्न करावं असं कधीं मनांत आलं, तर नवऱ्याची जागा भरून काढायला सर्व दृष्टीनं नानाच एक योग्य आहे—"

नानाचा चेहरा आनंदाच्या उल्हासानें तांबडा लाल झाला. दोन्ही हातांनीं खुर्चीच्या मुठी घट्ट आंवळून धरून तो आशेखोर मुद्रेनें ह्मणाला, "खरं ना हें ?—"

"हं थांबा, अशी घाई करूं नका," मी संथपणें ह्मटलें, "लग्न करण्याचा विचार जर माझ्या मनांत आला तरच्या या गोष्टी आहेत. कोणतीच गोष्ट अजून निश्चित झाली नाहीं. लग्न करावं कीं करूं नये, याबद्दल मी माझ्या मनाशीं वाटाघाट करतें आहे, त्यांतून अजून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. डोळे उघडून आधीं चारी दिशा मला निरखून पाहिल्या पाहिजेत. लग्नाखेरीज आतां जगतां येत नाहीं, असं वाटल्याशिवाय मी लग्न करणार नाहीं. वैवाहिक आयुष्याच्या बाकीच्या बाजूंचाही अजून मला अभ्यास करायचा आहे. यांत भावनेचा यत्-

किंचितही अंश नाहीं, अगदीं सडेतोड व्यवहार आहे असं समजा आणि मला सांगा, कीं लग्न झाल्यावर कांहीं दिवसांनीं जर आपलं पटलं नाहीं तर आपण काय करायचं ? ”

नाना क्षणभर बुचकळ्यांत पडल्यासारखा झाला. त्याचा चेहरा अगदीं गोरा-मोरा झाला होता. हातातोंडाशीं आलेली जिवाभावाची आशा सहजासहजीं हातून निसटून जाते कीं काय, असें वाटल्याची खिन्नता त्याच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटली होती.

त्याच खिन्न स्वरांत तो ह्मणाला, “ या जगांत कुणाशीं पटेल तर तुझ्याशींच अशी भावना माझ्या अंतःकरणांत दृढ झाली असल्यामुळं मी तुझ्या या प्रश्नाचा विचार करणंच असंभवनीय ठरतं. ”

मी हंसत हंसत ह्मटलें, “ या असल्या काव्यमय कल्पना क्षणभर दूर ठेवा. या जगांत अशक्य असं कांहीं नाहीं. वास्तविकरीत्या पटत नसतांना केवळ लोकाचारासाठीं ह्मणून खोटा सलोखा दाखवणं मला तरी अशक्य आहे. दांभिकपणाचा मला तिटकारा आहे. असं कांहीं झालं तर एक क्षणभरही आपल्याला एका छपाराखालीं नांदतां येणार नाहीं, ह्मणूनच आधीं या प्रश्नाचं उत्तर पाहिजे. ” असें ह्मणून मी स्वस्थ राहिलें.

“ ठीक आहे ! ” असें ह्मणून नाना उठून उभा राहिला आणि ह्मणाला, “मी या गोष्टीचा विचार करीन—अगदीं चांगला कसून विचार करीन. आणि या प्रश्नाच्या बाबतींत बुद्धी आणि अंतःकरण यांच्या मिलाफानं ज्यावेळीं कांहीं निश्चित असं मत ठरेल, त्याचवेळीं या प्रश्नाचं उत्तर देईन.—”

“ तोंपर्यंत या विषयाबद्दल आपण कांहीं बोलायचं नाहीं. ” सहज माझ्या तोंडून शब्द निघून गेला.

नाना तितक्याच ठांसर स्वरानें ह्मणाला, “ तोंपर्यंत या विषयाबद्दल आपण कांहीं बोलायचं नाहीं. मात्र या मधल्या मुदतींत आपल्या भेटीगांठीं व्हायला या प्रश्नाचा व्यत्यय आला नाहीं ह्मणजे झालं. ”

मी ह्मटलें, “ मुळींच नाहीं. मात्र या प्रश्नाचं उत्तर द्यायची तयारी झाल्याशिवाय आपण लग्नाच्या बाबतींत कांहीं बोलायचं नाहीं, एवढं मात्र ध्यानांत ठेवा. ”

" ठीक " असें ह्मणून नाना एकदम निघून गेला.

तो दृष्टीआड होईपर्यंत मी सारखी त्याच्याकडे पाहात होतें.

तो दृष्टीआड झाल्यावर माझ्या या वृत्तीची मला लाज वाटली. रस्त्यानें जात असतां त्यानें वळून पाहिलें असतें तर मी खिडकींत उभी असलेली त्याला दिसलें असतें.

पण त्यानें तसें पाहिलें नाहीं. मी मात्र त्याच्याकडे पाहात राहिलें याचीच मला लाज वाटली.

मी झटकन् वळून बाजूला झालें, तोंच मला आरसा दिसला. जसा कांहीं तो मला बोलावीत होता. एक एक पाऊल टाकीत मी आरशासमोर येऊन उभी राहिलें.

आरशांत पाहतांच माझी मलाच लाज वाटली. माझी नित्याची मुद्रा बदलून गेली होती. नित्याचा कठोरपणा जाऊन दृष्टींत एकप्रकारचा कोंवळेपणा आला होता.

मुद्रेवरची नजर एकाएकीं दूर होऊन ती रूपाकडे वळली. त्या मुद्रेच्या कोंवळेपणामुळें माझें सौंदर्य उठावून दिसत होतें.

मनांत शंका आली. नाना माझ्या सौंदर्याला तर भाळला नाहीं ? पुरुषी नजरेचा प्रपंच मला हृदयगम्य होणें स्वाभाविक नव्हतें. मी माझ्या नजरेनें या वृत्तीचा विचार केला. कोणत्याही पुरुषाच्या देखणेपणामुळें माझी नजर केव्हांच खेचली गेली नव्हती, याची मला आठवण झाली.

मग माझ्या सौंदर्यानें नाना आकर्षित झाला, असा आरोप तरी मी कां करावा ?

मी तशीच आरशाकडे पाहात राहिलें होतें, इतक्यांत बुटाचा खाडखाड आवाज ऐकूं आला आणि शिरीन एकदम आंत आली.

आंत येतांच तिनें आपल्या ट्रंका—व्यागा दाराशीं ओढून घ्यायला सुरवात केली.—दाराशीं हमाल उभा होता, हें मागाहून माझ्या नजरेला आलें—आणि तसें करीत असतांच ती मला ह्मणाली, "झालं, समेट झालं, अगदीं बेमालूम समेट झालं. आईनं शपथ घेतली. आतां लग्नाची भीति नाहीं !"

हमाल सामान घेऊन जाऊं लागला होता; शिरीन इकडे तिकडे खोलींत सारे धांदलीनें येरझारा घालीत, कांहीं विसरून राहिलें आहे कीं नाहीं तें पाहत होती. पाहात असतांना आईच्या समंजसपणाची तोंडफाटेपर्यंत तारीफ करीत होती. ती पहिली भाषा आणि ही आतांची भाषा ऐकून मला मोठें कौतुक वाटलें.

बोलतां बोलतां मधेंच थांबून तिनें मला कडकडून मिठी मारली, माझ्या गालांना आपले ओंठ लावले आणि तितक्याच धांदलीनें मिठी सोडवून 'साहेबजी साहेबजी ' म्हणत, आली तितक्याच धांदलीनें खाडखाड बूट वाजवीत निघून गेली.

मी अगदीं स्तब्ध झालें होतें. नकळत माझा हात माझ्या गालाकडे पुन्हां पुन्हां जात होता. तो स्निग्ध स्पर्श मला अभूतपूर्व होता.

शिरीनच्या ऐवजीं कोणी पुरुष असता तर ?

नाना असता तर ?

झटक्यासरशीं मी ती कल्पना मनांतून झुगारून दिली. मला वाटलें, मी पारशीण असतें तर ? त्या लोकांची हीं नित्याचीच सलामी आहे ! पूर्वीचा सराव नसल्यामुळें माझ्या मनांत भलत्या कल्पना आल्या !

मी पुन्हां आरशांत पाहिलें, माझा चेहरा लालबुंद झाला होता.

मी झटकन नळाजवळ गेलें आणि चूळ भरून डोळ्यांना पाणी लावलें.

पुन्हां कुणाच्या बुटांचा आवाज ऐकूं आला. वळून पाहातें तों तारेचा शिपाई.

एकाएकीं आईची प्रकृति फार बिघडल्यामुळें बाबांनीं मला एकदम बोलाविलें होतें.

## प्रकरण १७ वें

# मी निराधार झालें



पुण्याला जाण्यासाठीं म्हणून मी त्याच रात्रीच्या गाडीनें निघालें. मन कसें अगदीं वेडावल्यासारखें झालें होतें. बर्थवर अंग टाकलें पण डोळ्याला डोळा लागेना. मनांत नाहीं नाहीं त्या कल्पना येत होत्या.

घरीं पोंचताच आई मला भेटेल काय ? कीं ती शुद्धींत सुद्धां नसेल ? किंवा—किंवा—मुळीं तिची भेटच होणार नाहीं ?

तो अभद्र विचार मनांत येतांच सर्वांगांत शिरशिरी आली. आई भेटली नाहीं तर—आई भेटली नाहीं तर—तर काय होईल ?

आईच्या जिवावर मी आजवर जगलें होतें. माझ्या आयुष्यांत मला तिचाच काय तो एक आधार होता. बाबांची ओळख नुसती वडिलकीच्या नात्यापुरती. माझा त्यांना अभिमान असे, नाहीं असें नाहीं, पण दादाबद्दलचा त्यांचा अभिमान फार तीव्र होता. त्यांना वाटे, गोदू काय—एक मुलगी—अल्पवयांत बी. ए. झाली, जिकडेतिकडे कौतुक झालें, आपली मुलगी म्हणून आपणही अभिमान वागविला पण आपल्या नांवासाठीं तिचा कांहीं उपयोग नाहीं. त्यांना वाटे, लग्न झालें, नांव बदललें, कीं आपला संबंध संपला. तिच्या विद्वत्तेचा किंवा बुद्धीचा धनी दुसरा होणार. तो तिचा नवरा फार तर तिच्याबद्दल अभिमान मिळवील. पण आपलें नांव चालवणार आपला मुलगा !

आणि म्हणूनच त्यांना दादाचा फार अभिमान वाटत असे. लहानपणापासूनच दादा माझा मत्सर करीत असे. मी अल्पवयांत ग्रॅज्युएट झालें याची कोणी तारीफ केली, तर त्याला वैषम्य वाटत असे. मुलगी आहे हें कळल्यामुळें परीक्षक लोक जास्त मार्क देऊन मुलीला पास करून घेतात, वरचा वर्ग देतात, असा इतर पुरुष विद्यार्थ्यांसारखा त्याचाही आक्षेप असे. त्यांतून आतां त्याचें लग्न झालेलें, बायको फारशी शिकलेली नव्हती पण चांगलीच देखणी असल्यामुळें त्याचा सारा वेळ तिच्या भोंवती घोटाळण्यांत जात असे. नवराबायकोचें चांगलें जमतें आहे असें दिसत असल्यामुळें, इतर आयांप्रमाणें माझी आई त्यांच्या राबत्यांत कसलीही

आडकाठी आणीत नसे. माझ्या आईच्या ह्या चांगुलपणा शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या डोळ्यांत सलत असल्यास नवल नाहीं.

वडील भाऊही अशा रीतीनें पारखा झालेला, खुद्द वडील ते तसे आणि आईही येवढ्या मोठ्या अंतःकरणाची ! इकडे वडिलांनीं माझ्यासाठीं लग्नाचा अट्टाहास धरलेला आणि याचक्षणीं जर माझी आई मला सोडून गेली—

त्या कल्पनेनेंच माझें मस्तक भणाणून गेलें. ती कल्पना येऊं नये ह्मणून पुनः पुन्हां मी दुसऱ्या गोष्टींचा विचार करूं लागलें—चिपळूणच्या आणि रत्नागिरीच्या आठवणी आठवूं लागलें.

पण त्या प्रत्येक आठवणीशीं कुठेंना कुठेंतरी आईचा संबंध येतच असे. आणि त्यामुळें मनाचा उद्वेग भयंकर उग्र स्वरूप धारण करीत असे.

मला पुनःपुन्हां आश्चर्य वाटे तें हेंच, कीं असला भयानक विचार माझ्या मनांत कां यावा ? मी पुण्याहून निघालें त्यावेळीं आई बिछान्यावर पडण्याइतकी कांहीं आजारी नव्हती—किंबहुना आजारी नव्हतीच असें ह्मटलें तरी चालेल, नुसती थकल्यासारखी—खचल्यासारखी दिसत असे एवढेंच. मग आतां एकदम अशी आजारी कशी झाली ? आणि तार करून बोलावणें पाठवीपर्यंत तिच्या प्रकृती-बद्दल मला कुणीच कसें कळविलें नाहीं ? याचें मात्र मला राहून राहून आश्चर्य वाटत होतें.

उजाडतांच स्टेशनवर उतरलें—दादा प्लॅटफॉर्मवर दिसला—तरीही माझ्या काळजांत धस्स झालें. मी या गाडीनें येणार हें आगाऊ कळविलें नसतांही तो स्टेशनवर कां आला ? तोच कां आला ? बाबा कां आले नाहींत ? उगीच मनाशीं मी धाग्याला धागे जोडूं लागलें.

मी गाडीखालीं उतरलें—पण दादाचा चेहरा गंभीर झालेला दिसल्यामुळें आईच्या प्रकृतीबद्दल विचारण्यासाठीं माझ्या तोंडून शब्दच बाहेर फुटेना. पुन्हां असें वाटलें, कीं एरव्हीं तरी दादा खुल्या चेहऱ्यानें कुठें माझ्यासमोर येत असे ?

आम्ही टांग्यांत बसलों—घरीं आलों—पण दाराशीं येतांना माझे पाय लटपटूं लागले. मला पहातांच बाबा समोर आले आणि ह्मणाले, " आलीस ? शाबास !" त्यावेळीं कुठें माझा जीव खालीं पडल्यासारखा झाला. आई आहे—आईची आणि माझी भेट होणार, असें बाबांच्या चेहऱ्यावरील ओसरत्या आनंदी मुद्रेमुळें मला वाटूं लागलें.

मी कसेबसे पाय धुतले आणि धांवतच आईच्या खोलींत गेलें. बिछान्याशेजारीं खुर्चीटाकून एक नर्स बसली होती. मला पहातांच ओठावर बोट ठेवून न बोलण्याची तिने खूण केली.

मी जवळच असलेल्या दुसऱ्या एका खुर्चीवर थोडासुद्धां आवाज न करतां बसलें. ती खुर्ची पायथ्यागत होती. नर्स उशाच्या बाजूला बसली होती. आईचा डोळा लागला होता—पण तिनें डोळें उघडल्याबरोबर पहिल्यानें तिची नजर माझ्यावर जावी, या आशेनेंच मी पायथ्यागत बसलें.

आईचा चेहरा पहातांच माझ्या काळजाचें पाणी झालें. आई भेटली खरी पण तिचा सहवास फार दिवस लाभणार नाहीं असें तिच्या चेहऱ्याकडे पहातांच मला वाटलें. इतक्या थोड्या अवधींत ती इतकी कशी थकली ? तिला काय होत होतें हें विचारण्याची उत्कंठा असली तरी मला आतां संयमन करणें भाग पडलें.

कितीवेळ तरी मी तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात तटस्थ बसलें होतें. तो प्रत्येक क्षण मला युगासारखा वाटत होता. आई केव्हां डोळे उघडील, केव्हां माझ्याकडे पाहील, तिच्या तोंडचा एकादा शब्द माझ्या कानीं केव्हां पडेल, याची वाट पहातांना माझा जीव कासावीस होत होता.

मधे एक वेळ बाबा येऊन दाराशीं डोकावून गेले असावे असें मला वाटलें. नर्स मात्र दगडी पुतळ्याप्रमाणें स्वस्थ बसून राहिली होती. जिज्ञासेनें कासावीस झालेली माझी मुद्रा तिच्या नजरेस येतांच तिनें जवळचा एक कागद घेतला आणि त्याच्यावर "Typhoid, case precarious, prepare yourself for the worse" ( टायफॉइड, असाध्य, बऱ्यावाईट प्रसंगासाठीं मन तयार ठेव ) एवढेच शब्द लिहिले होते. प्रश्न विचारण्यासाठीं माझे ओठ हालत आहेत असें पाहून तिनें बोटानें पुन्हां संकेत केला आणि कांहीं न विचारण्याची खूण केली.

पुन्हां मी आईच्या चेहऱ्याकडे पाहात राहिलें. सारा जीव कसा माझ्या डोळ्यांत आला होता. काकुळतीनें पुन्हां मी नर्सकडे पाहिलें. पायांतील बुटांचा यत्किंचितही आवाज न होऊं न देतां ती माझ्या शेजारीं येऊन उभी राहिली आणि माझ्या मस्तकावरून हळूहळू हात फिरवूं लागली.

त्या स्नेहल स्पर्शानें माझें मन उचंबळून आलें, आणि माझी इच्छा नसतांही चटकन एक हुंदका माझ्या तोंडून बाहेर पडला.

नर्सनें रुमालानें माझें तोंड दाबून धरलें, पण जें व्हायचें तें झालेंच होतें. ' गोदे, ' अशी अगदीं खोल आवाजांतील हांक माझ्या कानीं आली.

तो आवाज आईचा होता, पण न ओळखतां येण्याइतका क्षीण झाला होता. ती हांक कानीं पडतांच माझा मनावरचा ताबा सुटला आणि ' आई आई ' म्हणत मी मोठ्यानें हंबरडा फोडला.

पुन्हां आपल्या रुमालानें माझें तोंड दाबून धरीत नर्सनें मला गप्प बसायला लावलें. पुन्हां त्याच क्षीण स्वरांतले शब्द ऐकूं आले, " गोदे ! " मी काकुळतीनें म्हटलें, " काय आई ? "

आईनें एकवार नर्सकडे पाहिलें आणि ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून माझ्याशीं बोलायला सुरवात केली.

" गोदे, तूं धांवत येशील हें मला माहितच होतं. सारखी घाई चालली होती, पण मी तार करूं दिली नाहीं. आतां माझं मला कळलं म्हणूनच तुला बोलावून घेतलं. तुझ्यासाठींच मी अजून जीव धरून राहिलें—"

आईच्या त्या शब्दांनीं मला उमाळ्यावर उमाळे येऊं लागले. मी तोंड दाबून रडतें आहें, असें पाहून ती म्हणाली, " रडून काय होणार, गोदे ! केव्हां तरी एकदिवस जायचं हें ठरलेलंच आहे. पण त्यापूर्वी—"

नर्स पुढें सरसावली आणि तिनें आईला न बोलण्याविषयीं हिंदी भाषेंत हुकूम केला. आणि त्या बरोबरच मलाही बाहेर जाण्यास सांगितलें.

मी माझ्या खोलींत गेलें आणि एका कोचावर बसलें.

सहज समोर नजर गेली, तों मला मांडीवर घेऊन काढलेला आईचा फोटो माझ्या नजरेला भेटला.

आतां मात्र माझ्यानें राहवेना. मी ओक्साबोक्शी रडूं लागलें.

तोंच बाबा आंत आले आणि माझ्या मस्तकावरून हात फिरवून म्हणाले, "मन घट्ट कर. गोदे, प्रसंगाला तोंड दिलं पाहिजे. आलं दुःख कांहीं टाळतां येत नाहीं. तूं इतर मुलींसारखी नाहींस—जशी शिकलेली आहेस तशी समजुतदारही आहेस. इतर मुलींसारखं असं रडणं तुला शोभत नाहीं. "

बाबांनीं एक दीर्घ निश्वास सोडला आणि सदऱ्याच्या टोकानें डोळ्यांतील आसवें पुसून टाकून ते मला म्हणाले, " ती गेली तर दोन माणसं अनाथ

होणार. एक तूं आणि एक मी. दादाचं लग्न झालं आहे. समाधानाला त्याला जागा आहे. मी अनाथ होणारच, पण पोरी, बाप हयात असूनही तूं पोरकी होणार. तुझ्यालेखीं मी असून नसून सारखाच होणार ! " त्या शब्दासरशीं त्यांनाही एक हुंदका आला आणि ते मान फिरवून चट्‌कन खोलीबाहेर निघून गेले.

वहिनी येऊन मला घरांत घेऊन गेली. आई बिछान्यावर पडली होती. आहे—नाही अशा स्थितींत ती होती तरीही आमचे रोजचे व्यवहार सुरू होते. आम्ही स्नानें केलीं, जेवलों, प्रत्येकानें आपापल्या परीनें थोडथोडी झोंपही घेतली. पुनःपुन्हां मी खोलीच्या दाराशीं जाऊन येत होतें; पण नर्स मला आंत येऊन बसूं देत नव्हती—किंबहुना कुणालाच आंत येऊं देत नव्हती.

संध्याकाळीं आईला बराच आराम वाटूं लागला आणि नर्सनेंही मला तिच्या बिछान्याशीं बसण्याची परवानगी दिली.

डॉक्टर येऊन पाहून गेले. ते जात असतां त्यांना मी दारांत गांठलें आणि विचारलें. तेव्हां ते म्हणाले, "काय सांगूं ? माझ्या हातीं कांहीं राहिलं नाहीं. तुझी आई बरी होणं हें आतां फक्त ईश्वराधीन आहे. मन घट्ट कर. मुली, मन घट्ट कर !" असें म्हणून ते घाईघाईनें निघून गेले.

जें कांहीं समजायचें तें मी समजलें. मी अगदीं बधिर झालें होतें.

आजुबाजूला काय चाललें आहे तें समजेना. तोंच समोर कोणी तरी येऊन उभें राहिल्याचा मला भास झाला.

डोळ्यांना दृष्टी आली आणि समोर नाना दिसला. अगदीं हलक्या आवाजांत त्यानें विचारलें, " कसं काय आहे ? "

मी डॉक्टरचें म्हणणें त्याला सांगितलें. आम्ही दोघेंही आईच्या खोलींत गेलों.

नानाला पाहतांच आईची मुद्रा उमललेली दिसली. खुर्च्या घेऊन आम्ही जवळ बसलों, त्यावेळीं आम्हां दोघांच्या चेहऱ्याकडे आळीपाळीनें पाहात ती नानाला उद्देशून म्हणाली, " आलांत ? बरं झालं. मी जाणार यांत शंकाच नाहीं. केव्हां जाणार येवढंच ठरायचं आहे. पहा, नाना, गोदीवर नजर ठेवा. मी गेलें कीं तिला दुसऱ्या कोणाचा आधार रहाणार नाहीं. तिचा स्वभाव तुम्हाला माहीत आहे. कुठंच कुणाला ती मान वांकवणार नाहीं. पोरीच्या जातीला एकंदरींत तें वाईटच. पण ती तशी आहे. माझ्या शिकवणीमुळंच तशी झाली आहे, त्याला

आतां इलाज नाहीं. बोलतां येतं आहे तोंपर्यंत एकदाची बोलून टाकतें. माझी गोदू तेज आहे---म्हणूनच तिचं लग्न व्हावं असं मला वाटत नाहीं. असल्या पोरी लग्नाला अगदीं नालायक. त्यांना कमीपणा खपायचा नाहीं--आणि लग्नाच्या बायका म्हणजे सर्वस्वी गुलाम. घरांतून आग्रह होईल आणि त्यांच्या शब्दासाठीं कदाचित ती लग्नाला तयार होईल, त्यावेळीं तुम्ही नजर ठेवा. तो कोण असेल त्याची नीट चवकशी करा. हिला जो नवरा पाहिजे तो आजच्या एखाद्या बायको-सारखाच तिच्याशीं वागला, तरच पुढं त्यांची धडगत! हसूं नका. मरणाच्या दारांतून मी बोलतें आहे---हिला नवरा नको---हिला एखादी बायको पाहिजे! असली ही मर्दानी पोर! नवरेपणाचा अभिमान धरणाऱ्या कुणा बावळ्या बृहस्पतीच्या हातीं गेली तर त्या बिचाऱ्याचीच कंबख्ती भरेल. म्हणून म्हणतें, तुम्ही नजर ठेवा. मी गेलें कीं हिला निराधार झाल्यासारखं वाटूं लागेल आणि मनाचा अभिमान विसरून ही कुणातरी मूर्खाशीं लग्न करायला तयार होईल, त्याचीच मला भीति वाटते. ऐक, गोदे तूंही ऐक. ऐकलंत नाना? तशा कुणा अपरिचित मुर्खाशीं लग्न व्हायचा प्रसंग आला तर---ऐकलंत नाना, तुम्ही पुढं व्हा---तुम्ही हिच्याशीं लग्न करा. तुमचा तिचा परिचय तरी आहे. एकमेकांची कुवत एकमेकांना माहीत तरी आहे---" असें बोलून ती क्षणभर स्वस्थ राहिली.

नर्स पुढें झाली आणि तिनें नाडी पाहून हलकेच तिचा हात खालीं ठेवला.

आईनें विचारलें, "आणखी चार शब्द बोलूं का?" नर्सनें मानेनेच होय म्हटलें.

" आतां बोलायचं काय राहिलं आहे म्हणा-" असें म्हणून तिनें एक दीर्घ निश्वास टाकला, " मात्र माझ्या या बोलण्याचा भलताच अर्थ घेऊं नका. तुम्ही तिच्याशीं लग्न करा असं मी तुम्हांला सांगत नाहीं किंवा तिनं तुमच्याशींच लग्न केलं पाहिजे, असाही माझा आग्रह नाहीं. केव्हांही मी तिच्यावर अम्मल गाजवला नाहीं-हुकूम केला नाहीं-किंवा आज्ञा पाळायची सक्तीही केली नाहीं. आतां तर ती सज्ञान झाली आहे! तिला लग्न करायचं नसेल तर त्यांत मला आनंदच आहे. पण लग्न करावं असं केव्हां तिला वाटलं, तर तिनं आपल्या तोलाचा नवरा पाहावा, एवढीच माझी शेवटची इच्छा आहे."

ती अगदीं थकल्यासारखी झाली. बोलण्याच्या श्रमानें तिचे डोळे आपोआप मिटूं लागले, असें पाहून नर्सनेंही आम्हांला खोलींतून बाहेर जाण्यास हुकूम केला.

आम्ही बाहेर पडत असतांच बाबा आंत आले. त्यांनीं एक क्षणभरच माझ्याकडे पाहिलें आणि ते म्हणाले, "ठीक, ठीक, अशीच धीराची मुद्रा ठेव. सकाळीं काय घाबरली होतीस !"

आम्ही दोघेंही येऊन दिवाणखान्यांत बसलों. मधून मधून आम्ही एकमेकांकडे पाहात होतों पण–कुणाच्याच तोंडून शब्द निघत नव्हता.

किती तरी वेळ गेला–सकाळीं आईच्या बिछान्याकडे बसण्यावेळीं मला जसे क्षण युगासारखे वाटत होते, तोच भास या क्षणींही झाला.

क्षणभरानें बाबा आंत आले आणि एक खुर्ची ओढून घेऊन आम्हा दोघांच्या मधें बसले. नानानें विचारल्यामुळें, पहिल्यापासून आईची प्रकृती कशी काय बिघडली, कसकसे उपचार केले वगैरे हकीगत सांगण्यास त्यांनीं सुरवात केली.

थोड्या वेळानें नाना निघून गेला.

आमच्याशी बोलल्यानंतर आईनें जे डोळे मिटले ते पुन्हा उघडले नाहींत. पुन्हा ती शुद्धीवर आली नाहीं.

त्याच रात्रीं पहाटेच्या सुमारास माझी आई मला सोडून गेली. मी निराधार झालें.

सकाळीं आसन्नमरण स्थितींत तिला पाहिलें त्यावेळीं मला रडण्याचा उमाळा आला होता–पण यावेळीं माझ्या डोळ्यांतून एक टीपसुद्धां आलें नाहीं. एक हुंदकाही आला नाहीं.

शेजारची लोकें म्हणूं लागलीं, "पहा या शिकलेल्या पोरी ! डोळ्यादेखत आई मेली पण मेलीला एक हुंदकासुद्धां आला नाहीं. यांच्यापेक्षां आमच्या आपल्या न शिकलेल्याच पोरी बऱ्या !"

कुणाच्याही बोलण्याचा माझ्या सुन्न झालेल्या मनावर कसलाच परीणाम होत नव्हता. कुणीच माझ्या खिजगणतींत येत नव्हतें.

माझ्या दुःखाच्या हिमालयाखालीं मी चिरडून गेलें होतें.

माझ्या मनांत एकच कल्पना येत होती—

मी निराधार झालें !—मी निराधार झालें !

---

# प्रकरण १८ वें

# लव्ह अफेअर्स



पुण्यांतील सारे पेन्शनर गोळा करून बाबा पत्ते खेळत बसत असत, दादा दुपारीं कोर्टांत जात असे, संध्याकाळीं हिराबागेंत जात असे, घरीं आल्यावर वहिनीबरोबर गप्पागोष्टी करीत बसत असे.

व्यवसाय नसे काय तो मलाच. आणि ह्मणूनच माझा निराधारपणा मला हर-घडी जाणवत होता. अभ्यास करावा ह्मटलें तर तिकडेही लक्ष लागत नसे. पुस्तक हातांत घ्यावें, त्याच्यावरून नजर फिरवावी आणि एक ओळसुद्धां लक्षांत न आल्यामुळें पुन्हां पुस्तक फेकून द्यावें, असा नित्याचा क्रम झाला होता. गांवांत कुणाची ओळख नाहीं आणि नव्या ओळखी कराव्या असें मनांत आलें तर तिथल्या माणसांची वृत्ती पाहून तिटकारा येई. एक दोन वेळां कॉलेजकडे जाऊन आलें, तर माझ्या वेळच्या मुली बहुतेक निघून गेल्या असल्याचें कळून आलें. त्यापैकीं बहुतेक लग्में झाल्यामुळेंच गेल्या होत्या आणि बी. ए. झालेली जी एकाददुसरी होती, तिचेंही लग्न झाल्याचें ऐकूं येत होतें.

आईच्या मृत्युनंतर नानानें आमच्या घरीं यायचें बंद केलें होतें. विचारावें असें मनांत येई पण पुन्हां मन माघार घेई. त्यानें तरी कसें यावें? बाबा कुठं तरी पत्ते खेळायला जात असत, दादा कोर्टांत जात असे, एकटी वहिनी काय ती घरीं—पण ती असल्यामुळेंच संकोचाला जास्त जागा झाली होती. ती असल्या-मुळेंच 'कां येत नाहींस?' असें नानाला विचारायला माझें मन घेत नसे. पुण्याची वस्ती—या कुटाळांच्या अड्ड्यांत निर्माण झालेली माझी वहिनी—शिकली सवरली असूनही वाचनव्यासंगाचा गंध नाहीं. उलट मीच वाचीत बसतें ह्मणून माझी थट्टा करणारी—ती हजर असतां आमच्या घरीं यायला नानाला संकोच वाटला, यांत नवल नाहीं. मृत्युशय्येवर आई जें कांहीं बोलली तें—चोरून ऐकल्या-मुळें असेल कदाचित, वहिनीच्या कानीं गेलें असावें, अशी तिच्या टोमण्यावरून मला शंका येई. या सर्व गोष्टीचा विचार करतांच नानाला बोलावणें मला

अशक्य होऊन बसलें होतें. त्यामुळेंच माझा निराधारपणा दिवसेंदिवस मला प्राणांतिक होऊं लागला होता.

पुनः पुन्हां आठवण येत असे लहानपणच्या मैत्रिणींची. त्यांना भेटायला जावें असें मी म्हटलें असतें, तर बाबांनीं अडथळा केला नसता. पण जायचें कुठें ? कुणाचाही नीटसा पत्ता मला माहीत नव्हता.

आणि पत्ता असला तरी काय उपयोग होता ? एक दोघी खेरीज करून बाकीच्या माझ्या साऱ्या मैत्रिणी माझ्या जातीच्या नव्हत्या. एक तेलीण, एक दोन वाणी, एक भंडारीण !—असें वाटे, जगाची पर्वा करूं नये.

पण हल्लीं माझें मन पूर्वीसारखें खंबीर राहिलें नव्हतें. प्रत्येक क्षणाला जगाची भीति नजरेसमोर येई. अजून दांभिकपणा माझ्याठायीं संचरला नव्हता खरा, पण त्याची ही पहिली पायरी तर नव्हे, अशी कुशंका वारंवार मनांत येई.

याहीउपर मनाचा निर्धार करून पत्ता शोधून काढून त्यांच्याकडे गेलें असतें, तर दुसरी एक भीति नजरेसमोर उभी राहात होती. सर्वांचीं लग्नें झालेलीं, बिचाऱ्या सासरीं असायच्या, कदाचित चांगल्या लेकुरवाळ्या होऊन संसार थाटून राहिलेल्या असायच्या आणि आपण फटिंगासारखें त्यांच्या घरीं जायचें ! विवाहित स्त्रीच्या पराधीन जिण्यांत माझा आदरसत्कार करण्यासाठीं त्यांना नवऱ्याच्या तोंडाकडे पहायला लागायचें आणि त्यामुळें बिचाऱ्यांचें मन उगीच खट्टू व्हायचें ! तो विचारच नको म्हणून मी सोडून दिला.

पुनः मनांत आलें, रत्नागिरीला जावें आणि बाबीशेटकडे राहावें. डॉ. कीर्तीकरांची अनायासें भेट होईल—पण ते पेन्शन घेऊन मुंबईला कुठेंसे राहिले, अशीही बातमी मागें माझ्या कानीं आली होती. नीट चौकशी केल्याशिवाय म्हणूनच तिकडेही जातां येईना.

मन कसें कावरेंबावरें होऊं लागलें. घर कसें खायला येऊं लागलें. काय याला उपाय ? पुनः मुंबईला जाऊन लेडीज होममधें राहावें का ? अभ्यास सुरू करावा का ? अशा मनःस्थितींत तरी हातून अभ्यास होईल असें मला वाटेना. मग उगीच मुंबईत राहण्याचा खर्च तरी कशाला ? एम्. ए.च्या टर्म्सही भरायच्या नव्हत्या. एम्. ए.चा अभ्यास पुण्यालाही करतां आला असता. मग मुंबईला जाण्याची दगदग आणि खर्च कां ?

पुन्हां विचार आला, एम. ए. चा विचार हें कारण दुय्यम होतें. घरीं लक्ष लागत नव्हतें, म्हणून जागा बदलण्यासाठीं ना मी मुंबईला जाणार होतें ?

बाबांना विचारलें, तेव्हां ते म्हणाले, " एम. ए. चा अभ्यास इथेंही करतां येईल. पण तिथं कुणी कॅंपॅनिअन असेल तर जा बापडी. तूं गेलीस तर घर मला खायला येईल. तूं म्हणशील, कीं मी घरीं असतो कुठं म्हणून—पण तूं घरीं आहेस या आठवणीनंच मी घराबाहेर वावरत असतों. घरीं बसून तरी काय करायचं ? किती वेळ असा तुझ्याशीं बोलत बसणार ? लहान होतीस त्यावेळीं सुद्धां तुला कधीं जवळ घेतली नाहीं, आतां तर मोठी झालीस. बोलून बोलून काय बोलणार ? म्हणून इकडे तिकडे वेळ काढीत असतों. राहिलेले आयुष्याचे दिवस कसेतरी ढकलावे म्हणून ब्रिज खेळत बसत असतों. अष्टौप्रहर काम केलेला जीव-आतां रिकामं कसं बसवेल ? ब्रिज खेळायला बाहेर जातों म्हणून तुझी विस्मृति होते, असं मात्र समजूं नकोस. याहीउपर तुला मुंबईला जावं असं वाटत असेल, तर मी अडथळा करणार नाहीं. माझ्या नशिबीं ही फकिरी आली आहे, ती मी भोगतोंच आहे. माझ्यामुळें तुझ्या समाधानांत व्यत्यय कां ? तरीही असं वाटतं, तूं वाढलेली मुलगी—अजून लग्न झालं नाहीं—एकटीलाच मुंबईत ठेवायला लोकापवाद समोर उभा राहतो. तरीही मी म्हणतों, जायचं असलं तर खुशाल जा. "

बाबांच्या भाषणानें माझ्या मनाला धक्का बसला. साऱ्या आयुष्यांत त्यांच्या तोंडून इतके कोवळे उद्गार निघालेले मी कधींच ऐकले नव्हते. आधीं अधिकार गेला, त्यानंतर जिवाभावाची सहचारिणी गेली, त्यामुळेंच का त्यांना माझ्या-बद्दल इतकी माया वाटूं लागली ?

मुंबईला जायचा बेत मी रहित केला खरा पण मनाला समाधान वाटेना. भरल्या घरांत एकटी पडलेली मी, त्यामुळेंच जग कसें खायला येत होतें. त्याला काय उपाय ?

एक गोष्ट मात्र माझ्या मनाला लागून राहिली. नाना मुंबईला निघून गेला, पण जातांना त्यानें माझा निरोप घेतला नाहीं. फार काय, बाबांना सुद्धां भेटला नाहीं. उगीच जातां जातां टोमणा मारून वहिनीनें या गोष्टीचा उल्लेख केला नसता, तर तो गेल्याचें मला कळलेंसुद्धां नसतें. त्यानें असें कां करावें ? एवढा

गृहस्थपणाचा अभाव कां दाखवावा? मृत्युशय्येवर आईनें एकप्रकारें माझ्या सुख-दुःखाकडे नजर ठेवण्याची त्याला विनवणी केली होती, त्या पवित्र स्मृतीची त्यानें अशी हेटाळणी कां करावी?

मला हाच राग आला आणि तो नानाचा राग मी बाबांवर काढला.

मुंबईला जायचें असें ठरवून ज्यावेळीं मी बाबांना सांगितलें, त्यावेळीं त्यांच्या डोळयांना पाणी आलें. ते ह्मणाले, " गोदे, अशी निर्दय कशी ग होतेस?"

मी थोड्याशा कुत्सितपणें ह्मटलें, " पण दादा आणि वहिनी इथं आहेत ना?"

बाबा अगदी काकुळतीच्या स्वरानें ह्मणाले, " आहेत, पण त्यांचा काय उपयोग? तुझा दादा तुझ्या वहिनीसाठीं आहे. तीं उभयतां एकमेकांची काळजी घेतात, पण तूं आहेस ह्मणूनच ना माझ्याकडे पाहतेस! माझ्या सकाळच्या चहाची आठवण तुझ्या वहिनीला नसते, पण मला चहा दिल्याशिवाय तूं चहा घेत नाहींस. माझे मळके कपडे तूं नसतोस तर महीनोंमहीनें परटाकडे गेले नसते. चुरकुतलेला बिछाना मला आवडत नाहीं, हें तुला माहीत आहे, ह्मणून तूंच ना स्वतः तो साफसूफ करतेस? त्या वेळीं येतात का तुझीं दादा वहिनी?—"

मी मधेंच म्हटलें, " आणि माझं लग्न झालं असतं तर?"

तोंडांतून शब्द निघून गेले खरे पण त्यांचा निर्दयपणा माझ्याच कानाला कठोर वाटला.

एक मोठा सुस्कारा टाकून बाबा म्हणाले, " खरं आहे—खरं आहे—पण आज तुझं लग्न झालेलं नाहीं ना? तुझं लग्न झालं असतं, तूं आपल्या सासरीं गेली असतीस, तर माझी आबाळ होते आहे हें मला कळलं सुद्धां नसतं. तुझं लग्न झालं नाहीं तेव्हांच मला तुझी किंमत कळली—तेव्हांच मला वाटलं, तुझं लग्न झालं नाहीं हें बरं झालं—"

मी पुन्हां मधेंच विचारलें, " आणि आतां माझं लग्न झालं तर?"

" तर मला धक्का बसेल," बाबा चट्कन् म्हणाले, " मी निराधार होईन, अगदीं सर्वस्वी निराधार होईन. गोदे, पोरी, मुंबईला जायचं असलं तर खुशाल जा, पण मी जिवंत आहें, दिवसेंदिवस अपंग होत चाललों आहें, तोंपर्यंत तरी लग्न करूं नकोस."

बाबांच्या शब्दांनीं माझ्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें. पण भलत्या वेळीं डोकावणारा माझा दुराग्रही स्वभाव त्याच वेळीं वर उसळून झाला आणि मी मुंबईला जाण्याचें निश्चित केलें.

मी माझ्या स्वभावाला आज दुराग्रही म्हटलें खरें, पण त्या वेळीं मात्र मला तो दुराग्रह वाटला नाहीं. ती तारुण्याच्या रक्ताची उसळी होती. सर्वस्वी आधार असलेली माझी आई जरी मला नुकतीच टाकून गेली होती, तरीही आयुष्यांतील दुःखांचे भरपूर चटके मिळून माझें मन त्यावेळपावेतों हलकें बनलें नव्हतें.

जाऊं नको, असें बाबा म्हणतात म्हणूनच जावें असें मला वाटूं लागलें. माझा हा करन्तेपणा पुढल्या आयुष्यांत मला चांगलाच जाणवणार, याची त्यावेळीं कल्पना आली असती, तर बाबांना दुःखांत लोटून पुढें स्वतःच्या आयुष्याचेंही धिंडवडे होण्याचा तो प्रसंग मी टाळला असता.

पण बुद्धीच्या जोरावर चालणाऱ्या व्यक्तीलाही केव्हां केव्हां भवितव्यता दगा देते, याचा एरव्हीं मला अनुभव आला नसता. मी मुंबईला आलें आणि पूर्वीचा क्रम सुरू केला.

एके दिवशीं नाना अचानक मला भेटायला आला. त्याचें पाऊल खोलींत पडतांच मी क्षणभर स्तंभित झालें. कांहीं न बोलतां एक खुर्ची घेऊन तो मुका-ट्यानें बसला. बोलण्याला सुरवात कशी करावी, हें जसें कांहीं त्याला सुचत नव्हतें. तशीच अवस्था माझीही झाली होती.

कांही वेळपर्यंत आम्ही दोघें एकमेकांकडे पाहत सुद्धां नव्हतों. पण एकदां कुठें चुकून दृष्टादृष्ट झाली आणि त्या सरशीं मला एकदम भडभडून आलें.

कांहीं वेळपर्यंत मी ओक्साबोक्शी रडत राहिलें आहें, असें पाहून तोही रडक्या आवाजानें म्हणाला, "उगी, उगी, आतां रडण्यांत काय अर्थ आहे? गेलीं माणसं आतां का भेटणार आहेत ? तुझी आई गेल्यानं तुला जितकं दुःख झालं, तितकंच मलाही झालं आहे. पुण्याला असतांना मी तासाचे तास तिच्याशीं बोलत असें. त्यावेळीं तूं इकडे होतीस. शिक्षण मिळालं नसतांही तिचे विचार केवढे प्रगल्भ होते ! अशी आई गमावण्यासारखं मोठं दुर्दैव नाहीं !"

नानाच्या शब्दानें माझा दुःखाचा उमाळा जाऊन तिथें रागाची लहर आली. मी तणतण बोलूं लागलें, "तुझाला माझ्या इतकंच दुःख झालं नव्हे !

आणि हें मला खरं वाटणार ? कां ह्मणून खरं वाटावं? माझ्या दुःखाची तुह्माला कल्पना होती ? कधीं चौकशी केली होतीत माझी ? बाप असून मी पोरकी, वहिनी—भाऊ असून निराधार, घर असून घराबेगळी—माझी अशी स्थिती झाली आहे, असं तुमच्या मनानं सांगितलं का तुह्मांला ? मग चौकशी कां केली नाहींत ? या निराधार पोरीला समाधानाचे चार शब्द सांगावे—नुसतं येऊनजाऊन, बोलूनबसून सोबत करावी—दुःखांत विरंगुळा द्यावा—दुःखाचा विसर पाडण्यासाठीं कसली तरी चर्चा काढून मनाला कुठंतरी गुंतवून ठेवावं, असं कां नाहीं वाटलं तुह्माला ? या असल्या औपचारिक बोलण्यानं फसण्याइतकी मी बावळट आहे, असं कां वाटलं तुह्माला ? हा पुणेरी दांभिकपणा पुण्यासाठीं राखून ठेवा. देवाण—घेवाणाच्या मुंबईच्या वातावरणांत तो बिलकूल खपायचा नाहीं. ”

चिडलेल्या नागिणीसारखे मी नुसते सुस्कारे टाकतें आहें, असें माझें मलाच वाटलें. मी मनापासून चिडून बोलत होतें खरी, पण त्यांतच कुठेंतरी उसनें अवसान आहे, असा माझा मलाच संशय येत होता.

माझ्या उद्गारानें नाना ओशाळला. खालीं मान घालून माझ्याकडे मुळींसुद्धां न पाहतां तो ह्मणाला, “ क्षमा कर, गोदू मला क्षमा कर. या बाबतींत तरी मी दांभिक नाहीं, माझा नाइलाज झाला होता. कशा रितीनें कोण जाणें, पण तुझ्या आईची शेवटची भाषा तुझ्या वहिनीला कळली होती. माझ्या घरीं येऊन तिनें माझ्या वडिल माणसांचे कान फुंकले आणि त्यामुळें कुत्सित टीका टाळण्यासाठीं मला तुझी भेट वर्ज करावी लागली. मन ओढ घेत होतं पण त्याला आळा घालावा लागला. जीव तळमळत होता पण निर्धारानं त्याला बांधून ठेवावं लागलं. त्या यातना तुला कोणत्या शब्दांनीं सांगू ? मला दांभिकपणा करावा लागला खरा—पण तो तुझ्याशीं नाहीं. मी माझ्या वडील माणसांशीं दांभिकपणानं वागत होतों. तुला भेटण्यासाठीं मन तळमळत होतं पण तुझ्याबद्दलची बेफिकीरी त्यांना पटवून देतांना मला नसता मुर्दाडपणा आणावा लागत होता. असलं वर्तन तुला आवडत नाहीं हें मला माहीत आहे. पण माझ्या परिस्थितीची तुला कल्पना येणार नाहीं. वाटेल तर मला भ्याड ह्मण—पण भ्याड माणसंच किती मुर्दाड असतात हें मला स्वतःच्या अनुभवानंच कळलं. तुझा निधडेपणा माझ्या अंगीं नाहीं. पण तूं रागावणार नाहींस तर मीही तुला एक प्रश्न विचारला

असता—" असें ह्मणून तो क्षणभर थांबला आणि माझ्याकडून कांही उत्तर येत नाहीं असें पाहून ह्मणाला, " माझा भ्याडपणा मला पटतो. पण निर्भयपणाचा तरी काय उपयोग झाला ? मी आलों नाहीं, तुझी चौकशी केली नाहीं, तुला सोबत केली नाहीं, हा माझ्या भित्रेपणाचा परिणाम !—पण तूं काय केलंस ? माझा भित्रा संकोच कां अजमावून नाहीं पाहिलास ? येऊन मला कां भेटली नाहींस ? निदान मला बोलावणं तरी कां पाठवलं नाहींस ? "

माझा राग पार नाहीसा झाला. रागाच्या जागीं शरम उभी राहिली. खरंच, मी कां नानाला भेटलें नाहीं ? निदान कां बोलावलं नाहीं ? मीही भ्याडच तर ! मलाही लोकापवादाची भीति वाटली ?

मी उघड उघड कबुली दिली. नानाच्या चेहऱ्यावरची विषादाची छाया जाऊन तिथं समाधानाची टवटवी आली.

तें पाहून मलाही आनंद झाला. अंतरंग निर्मळ करून चूक कबूल करण्यांत केवढा आनंद असतो, याची त्या दिवशीं मला जाणीव झाली.

रागाच्या लहरीनें दुःख मावळलें होतेंच. पण चुकीच्या कबुलीनें मनाला प्रफुलता आली. आम्हीं अगदीं खुल्या दिलानें बोलूं लागलों.

आईच्या मृत्यूचा उल्लेख पुनः पुन्हां करतांना मला दुःखाचा उमाळा आला नाहीं. आईच्या शेवटच्या घटकेच्या वेळचें भाषण आम्हाला दोघानाही एका वेळींच आठवलें. एकाच दिलानें आम्ही त्याची चर्चा करू लागलों. त्या चर्चेत विषादाला स्थान मिळालें नाहीं.

मी अगदीं उघड उघड म्हटलें, " समज नाना, मी तुझ्याशीं लग्न करायला तयार झालें तर तूं काय करशील ? "

" हातांत माळ घेऊन बोहल्यावर उभा राहीन ! " असें म्हणून नाना मोठ-मोठ्यानें हंसूं लागला.

अहो जाहोची भाषा अगदीं नकळत नाहींशी झाली होती. जसें कांहीं लग्न व्हायचेंच, अशा भावनेनें आम्ही एकमेकांशीं बोलूं लागलों. साधकबाधक गोष्टींची खूप चर्चा केली.

लॉ कॉलेजला जायची वेळ झाल्यामुळें नानाला मधेंच उठून जाणें भाग आलें—पण त्याला नखशिखांत आनंद झाला होता. जाण्याचें त्याच्या जिवावर आलें होतें.

तो ह्मणाला, " कसं करूं ? हें आधीं कळलं असतं तर कुणाला तरी माझी सही करायला सांगितलं असतं. मधें पुण्याला राहिल्यामुळं टर्मचे कांहीं दिवस बुडाले आहेत, त्यांची भरपाई केली पाहिजे. पण राहण्यापेक्षां जाणंच बरं—" बोलत असतांना त्याला, पोटांतून अगदीं गदगदून निघाल्यासारखें झालें होतें. हुरळलेल्या अंतःकरणांतून निघालेल्या कोवळ्या कोवळ्या शब्दानें तो ह्मणाला, " हें पहा, गोदे, आनंदाच्या भरल्या ताटावरून असं अर्धपोटीं उठून जाणंच बरं. पुन्हां जेवायला यायची भूक तरी कायम राहते—"

हातांतील घड्याळाकडे पाहून तो ह्मणाला, " छे आतां धावलंच पाहिजे. आतां उद्यां बोलूं—"

मी खिडकींत उभी होतें. तो रस्त्यावर खिडकीखालीं येऊन हात नाचवीत मोठमोठ्यानें ह्मणाला, " आतां उद्यां बोलूं—आतां उद्यां बोलूं. "

रस्त्यांतून जाणारीं माणसें त्याचा हा उल्लूपणा पाहून एकमेकांना डिवचून फिदिफिदी हंसत होतीं. गोरेगांवकर बिल्डिंगमधें राहणारे गुळगुळीत हजामत केलेले एक गृहस्थ आपल्या अप-टु डेट पोषाख केलेल्या सोबत्याला डिवचून ह्मणाले, " हे तुह्मां सुशिक्षितांचे चोचले ! किती निर्लज्ज बेटा ! अगदीं उघड उघड कीं हो त्या नटव्या पोरीला खुणावीत होता ! हें शिक्षण बरं हें शिक्षण ! आणि त्याचे परिणाम हीं लव्ह–अफेअर्स् ! मी चांगली ओळखली. तो आमच्या रत्नागिरीचा गोखला—प्रांतसाहेब—त्याची ती मुलगी. हीं लव्ह—अफेअर्स बरं ! "

मला चांगलें ऐकूं येईल, इतक्या मोठ्यानें तो बोलत होता.

खरेंच का हें माझं लव्ह–अफेअर ? प्रेमाच्या चोंचल्यांवर माझा विश्वास नसे—पण आतां प्रश्न ढळढळीतपणें समोर उभा राहिला.

खरेंच कां हें माझं लव्ह–अफेअर ?

# प्रकरण १९ वें.

# अटी कबूल



नानाचा तो आनंद पाहून मला जरी मनांतून उकळ्या येत होत्या तरी आंतली वृत्ति कुठून तरी मला सावध करीत होती. ‘ चुकते आहेस–चुकते आहेस ’ असा ध्वनि अंतरांतल्या अंतरंगांतून निघत होता.

त्या ध्वनीकडे माझें दुर्लक्ष होत होतें. त्या ध्वनीच्या बारिकशा लहरीपेक्षां आनंदाच्या लाटा जास्त फोफावल्या होत्या. त्या आनंदाच्या भरांत तो सावध-गिरीचा इशारा माझ्या बुद्धीपर्यंत पोंचेना.

किती वेळ तरी मी इकडून तिकडे येरझाऱ्या घालीत होतें. मला कांहीं सुचत नव्हतें. दुःखाच्या अस्वस्थतेंत मनाची वृत्ति जशी खळबळते, तशीच या वेळीही माझी स्थिति झाली होती.

विचार करतां करतां पुनः कुठें तरी मनाला ठेंच लागली. चटकन् आठवण झाली. मागल्या खेपेला शिरीन आली होती, त्या दिवशीं ज्या वेळीं नानाची भेट झाली होती, त्यावेळीं तो प्रश्न निघाला होता. तो प्रश्न पुनः ध्यानीं आला. मृत्युशय्येवरच्या आईच्या इच्छेमुळें नानाकडे मी तसें बोललें खरी, पण या आठवणीमुळें बुद्धि पुनः जाग्यावर येऊं लागली. नुसत्या आईच्या इच्छेसाठीं मनाच्या तीव्र भावना फेंकून देऊन आत्मत्यागाची खोटी बढाई मिरविण्या-इतका दांभिकपणा माझ्या अंगीं नव्हता. त्या आठवणीनें मला सावध केलें. ‘ चुकतेस ’ हा ध्वनि कुठून आला होता त्याची जाणीव झाली. नानाची भेट होतांच पहिल्यानें त्याला हाच प्रश्न करण्याचा मी निश्चय केला.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं नाना आला. त्याच्या चेहेऱ्यावर आनंद नुसता नाचत होता. त्याची ती मुद्रा पाहून मला थोडासा खेद वाटलों.

पण खोलींत पाऊल टाकतांच त्यानें जें एक प्रकारचें आनंदाचें वातावरण निर्माण केलें, त्यांत तो माझा खेद विरून गेला.

तो बोलूं लागला, “ काल सारी रात्र मला झोंप आली नाहीं. सारी रात्र तुझं तें एकच वाक्य नजरेसमोर सारखं खेळत होतं. डोळ्याला डोळा लागावा,

तोंच जाग यावी, आणि पुनः तें वाक्य दिसावं—अगदीं लिहिल्यासारखं स्वच्छ दिसावं—असं सारी रात्र चाललं होतं. उद्यां तूं काय बोलशील, त्याच्यावर काय उत्तर देईन, त्याच्यावर तुझे प्रतिप्रश्न काय येतील आणि त्याच्यावर कोणतीं प्रत्युत्तरें दिलीं पाहिजेत, या विषयींच्या कल्पना खेळवीत मी सारी रात्र जागून काढली. केव्हां एकदां उजाडेल आणि केव्हां तुला भेटायला येईन, असं मला झालं होतं. "

मी विचार करीत करीत म्हटलें, " एकूण तूं बराच विचार केलास—माझ्या प्रश्नांचा अंदाज करून त्याच्यावर काय उत्तरं द्यायचीं तीं आंखून देखील ठेवलींस! असंच ना?"

" आतां तूं मूळपदावर जाऊं लागलीस!" नाना चेहरा उतरून म्हणाला, " तुझा मुळचा स्वभाव पुनः डोकावूं लागला."

नानाच्या या उद्गारामुळें माझें मन साशंक झालें. मी म्हटलें, " स्वभाव मुळचाच असतो. प्रासंगिक भावनेनं त्याची क्षणभर विसर पडते. पण विचारा-अंतीं माणूस जागा होतो. तसंच माझं झालं आहे." क्षणभर थांबून मी म्हटलें, " माझे सारे प्रश्न तूं अजमावले आहेस पण एक महत्वाचा प्रश्न त्या अंदाजाच्या यादींत आला होता का?"

" कुठला प्रश्न?" असें विचारतांना नानाचा चेहरा गोरामोरा झाला होता.

मी म्हटलें, " गेल्या खेपेचा प्रश्न आठवत नसल्यास पुनः विचारतें. आपलं लग्न झालं आणि कांहीं कारणानं आपला मतभेद झाला—आपलं पटत नाहींसं झालं, तर आपण काय करणार?"

नाना बुचकळ्यांत पडल्यासारखा दिसला, त्यावेळीं मीं सरळ सरळ विचारलें, " त्या अंदाजी यादींत हा प्रश्न आला होता का?"

नुसती नकारार्थी मान हलवून नाना म्हणाला, " मी वाईटाचा विचारच केला नाहीं. माझे प्रश्न अगदींच वेगळे होते. हा प्रश्न पुनः निघेल अशी अंधुक कल्पना-सुद्धां माझ्या ध्यानीं मनीं आली नाहीं."

मी क्षणभर स्तब्ध राहिलें आणि नाना माझ्या प्रश्नाचा सरळ जबाब देतो कीं काय याची वाट पाहिली. तो प्रश्न पुनः करणें मला निर्दयपणाचें वाटत होतें. माझें मन इतकें हळवें झालें काय, असें वाटून माझी मलाच लाज वाटली.

नाना कांहीं बोलत नाहीं असें पाहून मी विचारलें, " माझ्या प्रश्नाचं उत्तर तसंच राहिलं ? "

चांचरल्यासारखें करीत नाना म्हणाला, "हो, राहिलं खरं! यावेळीं मी त्याचा विचार केला नव्हता. यावेळीं तसा विचार येण्याजोगी परिस्थितीच नव्हती' साऱ्या होकारांनीं मला चोहोंकडून ग्रासून टाकलं होतं—"

असें म्हणून तो क्षणभर थांबला आणि झोपेंतून जागा झालेल्या माणसाप्रमाणें मानेला हिसडे देत म्हणाला, " यावेळीं जरी या प्रश्नाचा मी विचार केला नाहीं तरी त्यावेळीं केला होता. त्यावेळीं साधकबाधक गोष्टींचा विचार कसून केल्यामुळें त्याचवेळीं हा प्रश्न पुनः विचारला असतास, तर मी मुद्देसूद उत्तरेंही दिलीं असतीं. कालच्या आनंदानं तीं उत्तरं पुसट झालीं आहेत—किंबहुना अजिबात धुऊन गेलीं आहेत. तरीही मी म्हणतों, या उत्तरासाठीं थांबण्याचं कारण नाहीं. त्याचं उत्तर फार सोपं आहे. चर्चेलाच पडलं तर कांहीं वेळ शब्दांचा अपव्यय करतां येईल. पण उत्तर अगदीं सरळ आहे—त्याच्यासाठीं चर्चा नको."

मी काय बोलतें हें पहाण्यासाठीं तो कांहीं वेळ स्वस्थ राहिला. तो क्षण मोठा भयाण वाटला. त्याचें उत्तर काय येणार याची मला कल्पना होती. त्या उत्तरानें माझें समाधान होणार नाहीं, याची त्यालाहि कल्पना होती.

पण सुखाचा हिमालयाएवढा क्षण तो आपल्या लहानशा मुठींत कवटाळून घट्ट धरून ठेवूं पाहात होता.

प्रश्न असा होता, कीं कोणत्याच उपवर वधूनें आपल्या भावी पतीला तसें विचारण्याची कल्पनाच केली नसती. वधुवरांनीं एकमेकांचे जिव्हाळ्याचे प्रश्न विचारण्याचा तो कालच नव्हता. वधूची परीक्षा घेण्यासाठीं आलेला वर त्या काळांत वधूला प्रश्न करीत असे. वराला प्रश्न विचारणारी वधू त्यावेळीं निर्माण झाली नव्हती, आजही झाली असेल असें मला वाटत नाहीं. म्हणूनच त्या प्रश्नानें तो बावरला.

मी कांहींच बोलत नाहीं असें निर्धारपूर्वक दिसून येतांच तो म्हणाला, " पूर्वी मी असंच कांहींसं उत्तर दिलं असावं असं मला आठवतं. मी असं म्हणतों, आजपर्यंतचा आपणां उभयतांचा अनुभव अशा प्रकारचा आहे, कीं त्यामुळं हा प्रश्नच अस्थानीं वाटतो. आपणां उभयतांना उभयतांचे स्वभाव माहीत झाले आहेत, त्यामुळं मतभेद होण्याची भीति निराधार आहे—"

" नाहीं " मी चटकन् म्हटलें, " मला तसं वाटत नाहीं. माणसाच्या स्वभावाचा अंत लागणं फार कठीण असतं. लग्नाच्या नुसत्या कल्पनेनं कांहीं दिवसांपूर्वी माझ्या अंगावर शहारे येत असत. आज मी लग्नाला देखील तयार झालें आहे. पूर्वी लग्न म्हणजे गुलामगिरी असं मला वाटत असे, आज मनाची तेवढी तीव्रता राहिली नाहीं---" नानाच्या चेहऱ्यावर हंसण्याची लहानशी लकेर सहज निसटून गेल्यानें जुनी वृत्ती पुनः उसळून उठली. "लग्नाची गुलामगिरी मला जाणवूं लागली आणि माझ्या दुराग्रही स्वभावाला अनुसरून मी तीच वृत्ती हातीं धरून बसलें, तर तूं काय करशील ? "

नानानें हंसत हंसत उत्तर दिलें, " काय करायचं तें सर्वस्वी तुझ्यावर सोंपवीन. तूं देशील तो निकाल बिनतक्रार कबूल करीन. मग तर झालं ? "

मी निर्धारपूर्वक म्हटलें, " माझा निकाल कठोर असेल. लग्नाचं बंधन तोडून दोघांनीं दोन दिशा पत्करण्याइतका निर्दयपणाचा असेल ! तुला माहित नसेल तर मी पुन्हां सांगतें--लग्न हें अध्यात्मिक बंधन आहे असं मला वाटत नाहीं. प्रेमाचं खूळ माझ्या हृदयांत शिरलेलं नाहीं. माझ्या मतें हा सरळ व्यवहार आहे. जगाच्या दृष्टीनं माझं मत चुकीचं असलं तरी एवढ्या बाबतींत तें कधीं बदलणार नाहीं. आठ दहा वर्षांच्या वयापासून मी या एकाच गोष्टीची छाननी करीत आलें आहें. निरनिराळ्या प्रकारच्या लग्नापासून होणारे परिणाम मी सारखे निरीक्षण करीत आलें आहे. लग्न ही अध्यात्मिक बाब आहे, धार्मिक बाब आहे अशी कल्पना करून घेऊन कितीकांनीं आपल्या आयुष्याचं मातेरं केलं आहे, हें मी उघड्या डोळ्यानं पाहिलं आहे. आज मी लग्नाला तयार झालें आहें, तीं आईच्या इच्छेसाठीं नव्हे--माझी आई ह्यात असती तर तिनें माझ्या लग्नाचा हट्ट घेतला नसता--म्हणूनच म्हणतें--आईच्या इच्छेसाठीं नव्हे, आई मेल्यामुळं मी निराधार झालें आहें म्हणूनही नव्हे ! मी बी. ए. झालें आहे. लग्न करण्याशिवाय संसार थाटण्याइतकी नोकरी मिळण्याचं मला सामर्थ्य आलं आहे. दुसऱ्यांची लग्नं झालेलीं पाहून स्वतःचेंही लग्न व्हावं अशा आशाळभूत इच्छेनंही नव्हे--किंवा तारुण्याच्या प्रभावामुळं लग्नाची जरूर भासल्यामुळंही नव्हे. मी लग्नाला तयार झालें त्याचं कारण अगदीं जगावेगळं आहे. तें सांगून कुणाला पटणार नाहीं--खरंसुद्धां वाटणार नाहीं. ती माझी कैफियत मला जगापुढं जरी मांडायची नाहीं,

तरी मोकळ्या मनानं तुझ्यापुढं सांगणं भाग आहे. मला हा प्रयोग करून पहा-यचा आहे. सायन्सच्या लॅबोरोटरीमधील नव्या शोधकाच्या प्रयोगाइतकाच हाही प्रयोग तार्किक आहे. सायन्सचा एक प्रयोग फसला, तर दुरुस्ती करून दुसरा प्रयोग करतां येतो. पण इथं तो वाव नाहीं. इथं तो प्रयोग एकदांच होणार. जुळला तर जुळणार, नाहींतर सपशेल फसणार. आणि फसला तर माझ्या साऱ्या आयुष्याची माती होणार ! तरीही हा प्रयोग करून पहाण्याचं धाडस मी करणार आहें. प्रेमावर माझा विश्वास नाहीं. प्रेमाच्या भावना ह्मणून ज्या वर्णन करतात त्या मला खुळचट वाटतात—काल्पनिक वाटतात—निराधार वाटतात—किंबहुना फसवेगिरीच्या वाटतात. माझ्यापासून प्रेमाची अपेक्षा करूं नकोस. प्रेमाची कल्पना स्वार्थत्यागाच्या पायावर उभारलेली असते. इतर वाटेल त्या तत्वासाठीं मी स्वार्थत्याग करायला तयार होईन पण प्रेमाच्या नांवाखालीं लग्नाच्या व्यव-हारांत मी स्वार्थत्याग करणं अशक्य आहे. आतां सांग, या अटीवर लग्न करण्याची तुझी तयारी आहे ? "

" आहे ! " नानानें ठांसून सांगितलें, " या सर्व प्रकारांची मला कल्पना आहे आणि ती कल्पना असल्यामुळंच मी तुझ्याशीं लग्न करण्यास तयार झालों आहें. कितीतरी वेळां या विषयाची आपण खुल्या दिलानं चर्चा केली आहे. त्या चर्चेवर मी विचारही केला आहे. आणि त्या विचारांच्या जोरावरच मी आज होय ह्मणतों आहें. "

एवढें निर्धाराचें उत्तर ऐकल्यावर माझ्या प्रश्नाला जागाच राहिली नाहीं. या-नंतर मी प्रश्न केले असते तर ती बाष्कळ चर्चा झाली असती.

झालेल्या प्रकाराचा मला एका परीनें धक्का बसला. मी क्षणभर अगदीं सुन्न झालें होतें.

दुरून कुठून तरी बोलल्यासारखे शब्द मला ऐकूं आले, " मग आतां पुढं रावसाहेबांना कळवायचं का ? "

मी खडबडून जागीं झालें आणि ह्मणालें, " तुझ्या टर्मचे अजून किती दिवस आहेत ? "

नाना ह्मणाला, " अजून जवळ जवळ एक महिना आहे. लग्नाचे मुहूर्त त्यानंतर आहेत. "

मी हंसत हंसत ह्मटलें, "हो, मुहूर्त नव्हे का ! तें मी अगदींच विसरलें होतें. मला वाटतं, चार–दोन दिवसांनीं मी आतां पुण्यासच जातें. कदाचित् ही गोष्ट ऐकून बाबांना आनंदही होईल. दादा बेफाम खूष होईल याची मला खात्रीच आहे. तुझा अभ्यास सावकाश चालूं दे. हें तुझं पहिलं वर्ष आहे. यंदा तुला पास झालंच पाहिजे. लग्न झाल्यावर पुढल्या वर्षांच्या अभ्यासासाठीं आपल्याला इथंच बिऱ्हाड करावं लागेल. त्यावेळीं कदाचित् मला कुठंतरी नोकरीही पत्करावी लागेल. लग्न झाल्यानंतर चरितार्थासाठीं बाबांपुढें हात पसरण्याची पाळी मला येतां कामा नये."

नाना मोठमोठ्यानें हंसूं लागला. मला हंसूं आलें नाहीं. मी थोड्याशा तिरसटपणानें ह्मटलें, "हंसायला काय झालं ? ही हंसण्याची गोष्ट नव्हे. तुला सध्यां नोकरी नाहीं. तुझ्या अभ्यासाचा खर्च तुझे काका चालवताहेत. लग्न झाल्यानंतर कदाचित् ते तेवढीच मदत तुला करतील. मला त्यांच्या घरीं राहायाला सांगतील, तें मला पटणार नाहीं. जिथं तूं तिथंच मी राहाणार. आणि तुला तर पुण्याला राहातां येणार नाहीं. माझ्यासाठीं तूं आपल्या काकापुढं हात पसरावास, हेंही मला पटणार नाहीं. लग्नानंतर मी बाबांची मदत घेणार नाहीं, हें तर ठरलेलंच आहे—"

नानाचा हंसरा चेहेरा एकदम गंभीर झाला. तो ह्मणाला, "मला वाटतं, कदाचित मलाही नोकरी पत्करावी लागेल. आपलं लग्न झालं तर काकांचीं मतं पुढं बदलतील. त्यांचा स्वभाव फार व्यवहारी आहे. हुंडा सांगून आलेल्या कित्येक मुली मी कारण न सांगतां नाकारल्या आहेत. त्यामुळं एकापरीनं ते थोडेसें घुश्शांतच आहेत. आपल्या या लग्नांत हुंड्याचा प्रश्न येत नाहीं. तुझ्या बाबांनीं हुंडा देऊं केला तरीही तो मी घेणार नाहीं व घेऊंही देणार नाहीं. या बाबतींत कांहीं ना कांहीं तरी खटका उडेल अशी मला मोठी भीति आहे. त्याचमुळं कदाचित मला नोकरी पत्करावी लागेल असं वाटतं. पुढचं पुढं पाहूं. पुढं कसा संसार करायचा हें आपण दोघंच ठरवूं—" क्षणभर तो स्तब्ध राहिला.

कांहीं कारण नसतां मला सहज हसूं आलें. तें पाहून तो ह्मणाला, "कां हंसलीस—? मी समजलों—पण हींच तीं माझीं प्रश्नोत्तरं ! काल रात्रीं मी

विचार करीत होतों, तो याच गोष्टींचा. आपणा उभयतांना नोकरी करावी लागेल हें कालच मला वाटलं होतं."

" एवढं तरी जुळलं ! " मी हंसत हंसत ह्मटलें.

कांहीं वेळ आह्मी बोलत बसलों होतों. नोकरी कुठें करायची, बिऱ्हाड कुठें घ्यायचं, किती भाड्याची जागा घ्यायची, वगैरे गोष्टी झाल्या. त्याबाबतींत कुणा-चाच मतभेद झाला नाहीं.

नाना निघून गेला. कालच्यासारखा आज तो हुरळला नव्हता.

रस्त्यानें जातांना त्यानें वळून माझ्या खिडकीकडे पाहिलें. मी खिडकींत उभी होतेंच.

पण कालचा प्रकार आज झाला नाहीं. आणि झाला असता तर तो पाह्य-ला—किंवा त्याबद्दल शेरे मारायला—रस्तावर कुणीच नव्हतें.

चार दोन दिवसांनीं मी पुण्याला गेलें.

बाबांना झालेला प्रकार सांगितला. त्यावेळीं ते म्हणाले, " एवढं तरी ठीक झालं. नाना फार चांगला मुलगा आहे. घरचा गरीब आहे, तरी होतकरू आहे. माझ्या—बापाच्या अभिमानाला वाटतं, कीं तो तुझ्या तोलाचा नाहीं. बी. ए. झालेल्या मुलीला निदान आय. सी. एस नवरा पाहिजे, तरच ती जोडी जमेल."

बाबांच्या या उद्गारानें मला हंसू आलें. मी म्हटलें, "ती जोडी कशी होईल ? तो आय. सी. एस.—माझ्यापेक्षां वरच्या दर्जाचा—आणि मी नुसती बी. ए.—कमी दर्जाची. या जोडीला उच्चनीच दर्जामुळं विजोडपणा नाहीं का यायचा ? "

बाबा मोठमोठ्यानें हंसून ह्मणाले, " मोठी विचित्र पोर आहेस तूं. यांत विजोडपण कसं आलं ? वधूवरांच्या वयांत असं अंतर असलं ह्मणजे जोडी जुळते, तसंच दर्जांतही अंतर पाहिजे. हा सोडा ॲसिड—न्याय आहे. जर फेंस यायचा तरच संसार सुखाचा व्हायचा—" उत्तरासाठीं माझे ओंठ फुरफुरत आहेत असें पाहून ते ह्मणाले, " हें पहा, तुझा तो वादविवाद कांहं नकोय. झालं तें ठीक झालं, असं मी तुला आधींच सांगितलं आहे. त्यांत माझा मतभेद नाहीं. त्यांत माझ्याही मताला थोडीशी पुष्टि आहे. आज तुह्मी दोघेंही बी. ए. आहांत. उद्यां तो एल. एल्. बी. होईल—एम्. ए. एल्.एल्. बी. व्हायची त्याची तयारी आहे असं एकदां तो माझ्याकडे ह्मणाला होता. मी आग्रह धरुन त्याला एम्. ए.

व्हायला लागेन. तूं एम्. ए. झालीस तरी तुला एल्‌एल्. बी. होतां येणार नाहीं. मला त्यांतच आनंद आहे. ही आपलीं माझी मतं आहेत. त्याला कांहीं 'आर्ग्युमेंट' नाहीं. पण एकंदरींत मला हें स्थळ पसंत आहे आणि त्यांतच मला समाधान आहे."

"कुणी विचारली होती तुमची पसंती?" असें म्हणायचें माझ्या अगदीं ओंठावर आलें होतें. पण बाबांच्या आजच्या स्थितींत तो टोमणा निर्दयपणाचा झाला असता, असें वाटून ते शब्द मी गिळले.

नाना येईपर्यंत ही गोष्ट उक्त करायची नाहीं, असें दिलेलें वचन बाबांनीं पाळलें.

पण ज्यावेळीं ही गोष्ट उक्त झाली, त्यावेळीं पहिल्यानें वहिनीनें उद्गार काढले, "मोठी नाकानं वांगीं सोलीत होती! ह्मणे बी. ए. झालेली! किती झालं तरी जात बायकांची! लग्नाशिवाय थोडंच राहातां येतं?"

दादा ह्मणाला, "झालं तें ठीक झालं. लग्न न करण्याचा हट्ट चालला असता, तर पुढं तिला पश्चात्ताप करावा लागला असता."

लग्नाच्या सोहळ्याचें अवडंबर घालायचें नाहीं हें आह्मां दोघांचेंही मत होतें. बाबांचाही त्या बाबतींत फारसा आग्रह नव्हता.

पण नानाचा नाइलाज झाला. त्याच्या घरचीं माणसें अगदीं जुन्या मताचीं होतीं. रजिस्टर मॅरेज तर दूरच राहो, पण नुसते ताशे–वाजंत्री आणायाचे नाहींं झटलेलेंही त्यांना आवडेना.

नानाचा नाइलाज होता. त्याच्या परिस्थितीकडे पाहून मला माझा आग्रह सोडणें भाग पडलें.

नाहीं नाहीं ह्मणतां मी लग्नाच्या बाबतींत हा पहिला स्वार्थत्याग केला!

---

## प्रकरण २० वें

# ॐ पुण्याह !



दोन्हीं पक्षांकडून लग्नाची तयारी मोठ्या समारोहानें चालली होती. ही तयारी चाललेली पहातांना माझें मन अस्वस्थ होत होतें. मी बोलत होतें काय व आज करतें आहे काय, याची कल्पना येऊन जीव ओशाळून जाई.

' ज्यावेळीं मला लग्न करावंसं वाटेल त्यावेळीं लग्न केलेलीं पतिपत्नी तुह्मांला नमस्कार करायला येऊं ! ' असें एका वेळीं बाबांना मी दिमाखानें सांगितलें होतें. पण आतां काय झालें ? इतर चारचौघांप्रमाणेंच माझें लग्न होणार होतें. त्यांत माझें वैशिष्ट्य असें कांहींच राहिलें नव्हतें. ' मी कुणीतरी आहें ' असें पदोपदीं जें मला वाटत होतें, तो अभिमान आज चुरून गेला होता.

पुनः पुन्हां मनांत येई, आज माझा अधःपात झाला का ? परिस्थितीमुळें मला माझीं मतें घटकाभर बाजूला ठेवावीं लागलीं, त्याला माझा नाइलाज होता; अशा कांहींतरी विचाराचा गिलावा मी माझ्या मनाच्या खडबडलेल्या पार्श्वभूमीवर करीत होतें; पण त्यानें जिवाचें समाधान होईना. ही परिस्थिति कुणाची ? माझी तर खास नव्हे ! मी यावेळीं कांहींही केलें असतें तरी तें बाबांना पटलें असतें.

ही परिस्थिती माझी नव्हती—नानाची होती. त्याच्यासाठीं मी पड खाल्ली होती. आपल्या वडिल माणसांना खूष करण्यासाठीं त्यानें स्वतःच पड खाल्ली असल्यामुळें, त्याच्या सहाभूतीनें मलाही माझीं मतें क्षणभर दूर ठेवावीं लागली होतीं.

प्रश्न येई तो हाच, कीं नानासाठीं ह्मणून मी कां पड खावी ? माझीं मतें जर खंबीर होतीं, तर असा काय अडचणींचा हिमालय कोसळला होता, कीं त्यामुळें माझें भवितव्य अडून राहिलें असतें ? माझ्या मताप्रमाणें वागायला नानाला मी कां भाग पाडूं नये ? केव्हांना केव्हां तरी वडिल माणसांच्या विरुद्ध जावें लागेल, असें त्यालाही वाटत होतें. मग ही सुरवात अगदीं आरंभालाच कां करूं नये ?

गोष्ट होऊन गेली आणि नंतर माझे डोळे उघडले. भावनेला बळी पडून मी नानासाठीं दांभिकपणा केला, याची मला पुरेपूर खात्री पटली. माझ्या आपलेपणाला पायबंद घालण्याची मी जी सुरुवात केली, ती चूक झाली असें फार उशीरां मला पटलें.

झाली चूक ती झाली पण यापुढें सावध राहण्याचा मी निश्चय केला. पुण्यांतल्या इतर चार लोकांच्या लग्नसमारंभाप्रमाणेंच आमचें लग्न झालें. त्या प्रत्येक विधींतून जातांना माझ्या मनाला असह्य यातना होत होत्या. हीं सर्व ढोंगें चाललीं आहेत हें मला उघड उघड दिसत होतें. पण त्या ढोंगांत भाग घेण्याला मी गुंतून पडलें होतें. रत्नागिरीच्या बापू भटजीबरोबर भांडणारी मी, आज काय करतें आहे हें बापू भटजींनीं पाहिलें असतें,—त्यांनीं विचारलें असतें, तर मी काय उत्तर दिलें असतें ? त्या सर्व विधींवर आणि सोहळ्यांवर माझा यत्किंचितही विश्वास नव्हता. तरीही उपाध्यायानें केलेले हुकूम मी यंत्रासारखे पाळीत जात होतें.

माझा मलाच राग येत होता पण त्याला इलाज नव्हता. नानाही माझ्याप्रमाणेंच मुकाट्यानें सर्व विधींतून यथाकाल जात होता. त्यालाही माझ्यासारखेंच वाटत असेल काय असा प्रश्न मनांत येई. पण विचारण्याला संधि मिळत नसे.

वरात घरीं आली. सूनमुखाचा विधि झाला. " अष्टवर्षा भवेत् कन्या " या अर्थशून्य श्लोक ऐकत प्रत्येक वडिल माणसाच्या मांडीवर बसून चांगली शेर दीडशेर साखर मी पचवली. नंतर एका महत्वाच्या विधीला सुरवात झाली, त्यावेळीं मीं जागी झालें.

माझें नांव काय ठेवायचें, याची वडिलमाणसांत चर्चा चालली होती. जुन्यापिढींतल्या बायका नर्मदा, सुभद्रा, सावित्री, सत्यभामा अशीं नांवें सुचवीत होत्या, तर नव्या पिढींतल्या बायका त्यावेळीं नुकतींच प्रचारांत येणारीं, कमला, प्रमिला, मनोरमा, या थाटाचीं नांवें सुचवीत होत्या.

अंतःकरणांतून मला सळसळून येत होतें. मला नांव ठेवण्याचा या लोकांना काय अधिकार ? मला जर नव्यानें पाळण्यांत घालायचें होतें तर निदान माझी आवड निवड तरी मला स्वतःला नको का विचारायला ? पहिल्यानें नांव ठेवलें त्यावेळीं मी असून नसून सारखीच होतें. पण आतां मी सज्ञान झालें असतां,

आवडीनिवडीची जाणीव मला उत्पन्न झाली असतां, कुठल्या तरी चार परक्यांना माझें नांव काय ठेवायचें, याच्या घाटण्या घालीत बसण्याचा काय अधिकार ?

मी मनाचा निश्चय केला आणि तो अमलांतही आणला.

एका मोठ्या परातींत तांदूळ पसरून तिच्यासमोर आम्हां दोघांना बसविण्यांत आलें आणि एका सोन्याच्या आंगठीनें भटजींनीं सांगितल्याबरहुकूम 'श्रीगणेशाय नमः' नें लिहिण्याची सुरवात नानानें केली. सर्वांनुमतें माझें नांव मनोरमा ठेवायचें असा ठराव पास झाला होता. त्या अन्वयें पहिलें 'म' हें अक्षर लिहिलें जातांच मीं नानाचा हात धरला.

नाना आश्चर्यचकित झाला. लग्नाच्या विधींत वधूनें वराच्या हाताला वारंवार हात 'लावायचा' असतो खरा; पण हात 'धरायचा' नसतो.

नानानें चमत्कारिक नजरेनें माझ्याकडे पाहिलें, नंतर थोडेंसें स्मित केलें आणि 'न' अक्षर लिहायला सुरवात केली.

मी जोरानें त्याचा हात मागें खेंचून म्हटलें, "माझं नांव बदलायचं नाहीं."

जमलेली सर्व मंडळी स्तंभित झाली. मी येवढ्याच मोठ्यानें बोललें होतें.

उपाध्येबुवा आकर्ण हंसून म्हणाले, "असं कधीं झालं आहे ? हे धार्मिक विधि आहेत, हे झालेच पाहिजेत."

मी उपाध्येबुवांकडे वळून अधिकाराच्या वाणीनें बोललें, "कोणत्या वेदांत हा विधि सांगितला आहे, कोणत्या उपनिषदांत आहे ? कुठल्याही खऱ्या किंवा बनावट स्मृतींत तरी या विधीला आधार आहे का ? वेद, उपनिषदें आणि स्मृति यांचा जो अभ्यास मी केला आहे त्यावरून सांगतें, कीं हा विधि धार्मिक नाहीं. हे चोंचले आहेत, हें ढोंग आहे."

नानाचा चेहेरा खाड्कन् उतरला. जमलेली सर्व मंडळी स्तंभित झाली. उपाध्येबुवा 'आ वासून' नुसते माझ्याकडे पहात राहिले.

एक क्षणभरानें ही स्तब्धता मोडली. सर्वत्र कुजबुज सुरू झाली—कुजबुजीचा कलकलाट झाला—आणि त्या कलकलाटाचें हलकल्लोळांत रूपांतर झालें.

जो तो आपापल्या परीनें सुचतील तीं नांवें मला ठेवूं लागला. सोन्याच्या आंगठीनें परातींतल्या तांदळांत नांवाचा शिलालेख करतां न आल्यामुळें, सोज्वळपणेंत विषारी जिव्हेनें मला नांवें ठेवण्यांत येऊं लागली.

उपाध्येबुवा जरा भानावर येऊन नानाला ह्मणाले, " तिचं काय ऐकतां ? तुह्मी त्याह्मायला सुरवात करा. "

या लोकांच्या दृष्टीनें मी खिजगणतींत सुद्धां येत नव्हतें ना ! ' तिचं काय ऐकतां ? ' असे उद्गार काढतांना मी उपाध्येबुवांच्या दृष्टीनें या लग्नाच्या सर्व सोहाळ्यांत किती क:पदार्थ होतें, हें उघड उघड मला दिसून आलें.

आणि त्यामुळेंच ' मी कुणीतरी आहे ' हें माझ्या आयुष्यांतील वाक्य या महत्त्वाच्या प्रसंगीं मी सर्वांच्या नजरेला आणून दिलें.

मी नानाला ह्मटलें, " माझं नांव बदलायचं नाहीं नि आडनांवही बदलायचं नाहीं. आहे कबूल ? "

" कबूल ! " नाना शान्तपणें ह्मणाला.

एक शब्द उच्चारतांच विजापूरच्या बोलघुमटांत जसे त्याचे प्रतिध्वनी होतात त्याचप्रमाणें नानाच्या ' कबूल ' या उद्गाराचा प्रश्नचिन्हार्थी प्रतिध्वनी जमलेल्या वऱ्हाडी मंडळीच्या शेंकडो मुखांनीं केला.

बैठक विसकटली—नव्हे, हा धार्मिक विधि कोसळला. पुढले सोहाळे कांहीं विशेषसे नव्हते. ते तसेच राहून गेले.

नानाच्या साऱ्या वडिल माणसांनीं नानावर तोंड टाकायला सुरवात केली. बायका तर त्याला नुसत्या फाडफाडून खात होत्या. एक भली लठ्ठ पोक्त बाई भारे हातवारे करकरीत म्हणाली, " मेला बायल्या ! पुरुषासारखा पुरुष तूं, लाज नाहीं वाटत ? स्वस्थ बसलास ? हात मागं घेतलास ? या माझ्या बांगड्या तरी भर—मिशा काढून लुगडं नेस. सत्वच राहिलं नाहीं या अलिकडच्या पोरांत ! काय तुला बायको मिळाली नसती ? नक्षत्रासारख्या पोरी हजारांचे हुंडे देत मागं लागलागून येत होत्या. त्यावेळीं नको म्हणाला ! आणि आतां ही मोठी इंद्राची इंद्रायणी शोधून काढली—ती ही अशी ! हुंडा सुद्धां घेतला नाहीं मेल्यानं ! काय नांवनसता होतास ! काय लुलापांगळा होतास ? कीं आंधळा बहिरा होतास ? बिन हुंड्याची पोर—आणि त्यांत अशी नाठाळ ! लाथ मारून घरांतून हांकलून दे. दुसऱ्याच मुहूर्तावर जर पुनः तुझं लग्न लावून दिलं नाहीं तर नांवाची नर्मदा नव्हे म्हण मला ! बघतोस काय माकडासारखा ? काय पुढं दिवे लावणार आहेस, तें दिसतंच आहे या तोंडावरून ! "

प्रत्येकजण परोपरीनें नानाला टाकून बोलत होता. नानाचे काका एका झोपऱ्यांत ज्वालामुखीसारखे धुमसत राहिले होते. आज उद्यां ह्या ज्वालामुखीचा उद्रेक होणार आणि त्या विषारी रसाच्या जळजळत्या लोटांत आज उद्यां आम्ही दोघेही भाजुन वाहावत जाणार, याची मला खात्री आली होती.

नानाचा सहनशीलपणा पाहून मात्र मला कौतुक वाटलें. कुणी कांहींही बोलेलें तरी तो उत्तर देत नव्हता.

सर्वत्र पांगापांग झाली आणि मंडळी घरोघर निघून गेली. ताशेवाजंत्रीवाले सुद्धां मला नांवें ठेवीत जात होते.

माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें. एक मोठी लढाई जिंकली असें मला वाटलें. नानाच्या पायीं लग्नाच्या सोहळयाला तयार होऊन स्वतःचें मन मारण्याच्या केलेल्या पापाचें अंशतः तरी परिमार्जन झालें, असें वाटून त्या रात्रीं कित्येक दिवसानंतर मला सुखाची झोंप आली.

दुसरा दिवस उजाडला. चोहींकडे निःस्तब्धता आली होती. माझ्या आईच्या मृत्यूनंतर आमच्या घरावर—म्हणजे माझ्या माहेरीं—ज्याप्रकारची एक कळा आली होती त्याच प्रकारची कळा आज या माझ्या नव्या घरीं पसरली होती.

माझें मन फार उदासीन झालें. नित्य विधि उरकून मी एका खोलींत येऊन बसलें. खोलींतील सामानावरून ती नानाची खोली असावी असा अंदाज करूनच मी तिथें बसलें होतें. विचारायचें कुणाला ? कुणीच माझ्याशीं बोलत नव्हतें. वेणीफणीचें सामान अर्थातच मी बरोबर आणलें नव्हतें. त्यामुळें माझी मोठी पंचाईत झाली.

कांहीं वेळ इकडे तिकडे टेबलावरचीं पुस्तकें मी चाळलीं, कपाटांतली चाळलीं आणि पुनः आरशाजवळ येऊन उभी राहिलें. नित्याच्या सवयींमुळें वेणीफणीवांचून चैन पडेना.

माहेर शेजारींच होतें, तेव्हां मनाचा निश्चय करून तिकडेसच जावें म्हणून निघालें. तों दारांतच नाना दिसला. त्याला पहातांच मी दारांतच थबकलें. एक क्षणभरच आम्ही एकमेकांकडे पाहात राहिलों. आधीं कुणी बोलावें याचा विचार चालला होता. नानानेंच आरंभ केला. तो म्हणाला "कुठं चालली होतीस ?"

त्याची गंभीर मुद्रा पाहून मला हंसूं आलें, मी हंसतच म्हटलें, "माहेरी !"

माझ्या उत्तरानें त्याचाही गंभीरपणा कोसळला आणि तोही हंसूं लागला; तो म्हणाला, " कां ? इतक्यांतच सासर पुरे झालं वाटतं ? "

मी उत्तर दिलं, " काय करायचं ? कुणीच माझ्याशीं बोलत नाहीं. सकाळीं वेणीफणी करायची संवय. त्या शिवाय चैन पडत नाहीं—म्हणून माहेरीं चाललें होतें. लग्नविधीच्या मुदतींत कुणी ना कुणीतरी येऊन माझी वेणीफणी करीत होतें; आज सर्वांनीच माझ्यावर बहिष्कार घातला आहे. "

क्षणभर विचार करून नाना म्हणाला, " ठीक ! तूं माहेरींच जा. इंथ कांहीं आपली घडगत दिसत नाहीं. सध्यां माहेरींच रहा. मी आज उद्यां मुंबईला जातों, बिऱ्हाडाची व्यवस्था करतों आणि नंतर तुला न्यायला येतों–"

कांहींतरी पुढें बोलण्यासाठीं त्याला स्फूर्ति येत होती पण पुनः थांबून तो म्हणाला, " नको–पण तूं जाच माहेरी ! माहेरचा अपमान सहन होईल पण या इथं तुझी विटंबना व्हायला नको. "

मी हांसलें–मला वाटलें, मी हंसलें म्हणून तोही हंसला. पण तें हसणें खोटें होतें.

मी जायला निघालें असें पाहून तो आंत आला. दरवाजा लोटून त्यानें आंतून खीळ दिली.

त्यानें माझा हात धरला—लग्नविधीच्या वेळीं देखील त्यानें माझा असा हात धरला होता पण त्यावेळीं कांहीं वाटलें नव्हतें !—त्यानें हात धरतांच माझें सर्वांग थरारलें. पायांतील रक्त मस्तकापर्यंत पोंचल्यासारखें वाटलें.

मला जवळ घेऊन—त्यानें माझ्या ओठाला ओठ दिले.

माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. हृदयांत धडकी भरली—ते हृदयाचे ठोके माझ्या कानांत ऐकूं येऊं लागले. वृत्ति अगदीं गांगरून गेली.

माझा हात त्याच्याच हातांत होता. अधाशी डोळ्यांनीं तो माझ्याकडे पहात होता. त्याची मुद्रा अगदींच चमत्कारिक झाली होती. क्षणभर मला संशय आला, पाशवीवृत्तीची मुद्रा ती हीच का ?

मी हळुच माझा हात त्याच्या हातांतून सोडवून घेतला. मी म्हटलें, " मी माहेरीं जातें. "

तो म्हणाला, " जा, तूं जाच ! "

झटक्यासरशी मी दरवाजा उघडून बाहेर पडलें. मागें वळून पाहिलें नाहीं. पण मी जात असतांना तो माझ्या मागोमाग येतो आहे असें मला वाटत होतें.

मी माहेरीं आलें. घर एकच होतें—नुसती बाजू दुसरी होती. मी गेलें ती तडक बाबांच्या खोलींत गेलें. बाबा इझिचेअरवर डोक्याखालीं दोन्ही हात घेऊन वर पहात पडले होते.

माझी चाहूल ऐकतांच ते उठून खुर्चीत बसले आणि म्हणाले, "मला वाट-लंच होतं——आलीस, बरं झालं. तुला बोलवायलाच पाठविणार होतों. पण तसं करणं कसं दिसलं असतं, याचा विचार करीत होतों. माझी जवळ जवळ खात्रीच होती म्हणेनास ! एवढं झाल्यानंतर तुला तिथं कुणी राहूं देईल, असं मला वाटलं नव्हतं."

मी म्हटलें, "राहूं दिलं असतं तर काय झालं——मला कुणी घालवून दिलं नाहीं. मी आपणहूनच आलें."

बाबा पुनः खुर्चीत रेलून म्हणाले, "असं का ? एकंदरींत तें वाईटच. पण गोदे, पोरी, काय केलंस हें ? एका घटकेंत साऱ्या पुण्यांत तुझ्या नांवाचा बभ्रा झाला आहे. आधींच थोड्याबहुत प्रमाणांत तुझी कीर्ति इथं झालेली होती ! त्यांत आतां ही भली मोठी भर पडली. कुठली तुला बुद्धि झाली ही ?"

मी संथपणें म्हटलें, "मला जें योग्य वाटलं तें मी केलं. आणि मला जें योग्य वाटणार तेंच मी करीत रहाणार. कुणाला काय वाटेल तीं त्यांनीं नांवं ठेवावीं. मला त्याची पर्वा नाहीं."

एक सुस्कारा टाकून बाबा म्हणाले, "आमच्या वेळीं पर्वा नाहीं म्हणून चालत नव्हतं. काळ बदलला आहे——तरीही अजून इतक्या सडेतोडपणाला आजच्या काळांत वाव आहे असं मला वाटत नाहीं. तुझी तूं खंबीर आहेस, याची मला खात्री आहे. पण नानाकडे थोडं लक्ष दिलं पाहिजे होतं. त्याची स्थिति मोठी चमत्कारिक झाली असेल. मला जें वाटतं तें तुला सांगतों——रागावूं नकोस—पण नानाला आतां एक तुला तरी सोडावं लागेल किंवा एक घर तरी सोडावं लागेल."

"तीही परीक्षा होऊन जाईल !" असें म्हणत मी घरांत गेलें. मी आल्याची चाहूल वहिनीला लागलीच होती. क्षणभर दाराआड उभी राहून ती

आमचें भाषण ऐकत असावी असाही मला संशय आला. जसें कांहीं कांहींच झालें नाहीं अशा झोंकानें मी रोजच्या व्यवहाराला लागलें. कांहींतरी बोलावें म्हणून वहिनीचा प्रयत्न होता, पण मी तिला संधि दिली नाहीं.

थोड्या वेळानें दादा बाहेरून आला. बाबांची त्याची आधींच गांठ पडली असावी, कारण मला पहातांच तो म्हणाला, " असं झालं तर एकूण ! तूं निघून आलीस ? "

" दिसत नाहीं का तुला मी आलें तीं ? त्यांत काय विचारतोस ? "

" कोण लागेल तुझ्या तोंडाला ? तो नाना मला एक मूर्खच दिसतो ! आपलेपणा नाहींच त्याला ! तूं वाटेल तें सांगितलंस—तरी त्यानं हात आंखडायला नको होता. पुढं वकिली कशी करणार आहे देव जाणे ! "

माझ्या उत्तराची अपेक्षा न करतां त्यानें एकदम पाय काढला. माझें चांगलेंच तोंड सुटणार याची त्याला कल्पना होती. वहिनी मात्र तिरस्कारानें हंसत माझ्याकडे एकदां आपली विषारी नजर फेकून निघून गेली.

घराचे मालक जर बाबा नसते तर या दोघांनीं मला आपल्या घराची पायरीही चढूं दिलें नसतें, असें मला निश्चयपूर्वक वाटलें.

जेवणींखाणीं झाली, दादा कोर्टांत निघून गेला, बाबा वामकुक्षी करण्यापूर्वी पानसुपारी खात बसले असतां नाना आला. तो आलेला पहातांच मीही येऊन बाबांच्या शेजारीं बसलें.

त्याचा चेहेरा पाहून मला कींव आली. इतक्या थोड्या वेळांत त्याची मुद्रा अगदीं काळवंडून गेली होती. बाबा कांहीं तरी प्रश्न विचारतील या अपेक्षेनें तो बराच वेळ स्तब्ध बसला होता. बाबा कांहीं बोलले नाहींत—या बसा सुद्धां म्हणाले नाहींत, हें पाहून तो म्हणाला, " तुम्हांला कुणाचा राग आला आहे ? मी काय केलं ? माझ्यावर राग कां ? "

" तुझ्यावर नाहीं रे बाबा राग ! " सुपारी कातरीत बाबा म्हणाले, " मी रागावलों असं तुला वाटलं का ? तुला पाहून मी थोडासा नरव्हस झालों एवढंच ! बरं, आतां पुढं काय करणार ? "

" आजच मी मुंबईला जातों आहें. काकांनीं संबंध पार तोडून टाकला आहे. आतां मला माझ्या पायावर उभं राहिलं पाहिजे. मुंबईला जाऊन कुठं तरी नोकरी

पहातों, बिऱ्हाडाची व्यवस्था करतों, तोंपर्यंत ही इथंच राहिल आणि सारं व्यवस्थित जुळल्यावर हिला घेऊन जाईन"

बाबा कांहीं बोलणार तोंच मी ह्मटलें, "आणि माझ्यासाठींही एक नोकरी पहा!"

"हो, हिच्यासाठींही एक नोकरी पहा. एक स्वैपाकी ठेवण्याची व्यवस्था कर. हिच्याकरवीं कांहीं स्वैपाक व्हायचा नाहीं—" मी मोठमोठ्यानें हंसूं लागलें तेव्हां माझ्याकडे पाहून बाबा ह्मणाले, "हंसतेस काय? तुझी कुवत मला चांगलीच माहित आहे. तूं आपली नोकरी कर—बी. ए. झाली आहेस त्याचा फायदा घे. स्वैपाक करणं तुझं काम नव्हे."

"असं का?" मी तोऱ्यानें ह्मटलें, "तर मग माझ्यासाठीं नोकरी पाहूं नकोस. माझी मीच नोकरी मिळवीन. तोंपर्यंत चार सहा महिने स्वैपाकणीचंच काम करीन आणि या तुझ्या सासऱ्यांना आणून मी किती चांगली सैंपाकिण आहें, त्याचा प्रत्यय दाखवून देईन."

"ठीक" बाबा ह्मणाले, "मला मुंबईला नेऊन जेवायला घालून मारायचा विचार दिसतो तुझा! पोटच्या पोरीच्या हातून मरण आलेलं कांहीं वाईट नाहीं. काय करनकरी कार्टी आहे!"

आह्मी दोघेंही मोठमोठ्यानें हंसलों. पूर्वीचा विषाद मावळला. प्रफुल्लित अंतःकरणानें आह्मी कितीतरी वेळ बोलत बसलों. आदल्या दिवशींच्या प्रकाराची तीव्रता नाहींशी होऊन नानाच्या धीरामुळें त्या विषयाला गमतीचें स्वरूप आलें.

त्या दिवशीं नाना मुंबईला निघून गेला.

---

प्रकरण २१ वें

# संसाराचें पर्यवसान



मुंबईला जाण्याच्या तयारीला एक महिना लागला. तो एक महिना पुण्यांत काढणें मला यातनामय गेलें. बाबांची वृत्ति पूर्वीच्यापेक्षां अजिबात बदलली होती, तेवढीच काय ती मला समाधानाला जागा होती.

एका घरांत साहर असून तें मला नुसतें वर्ज झालें होतें, इतकेंच नव्हे तर त्या घरांतील माणसें मला पहातांच तोंड फिरवीत असत, थुंकत असत, क्वचित् घालूनपाडून अभद्र शिव्याही देत असत.

रस्त्यानें फिरायला जातांना सुद्धां मला मनाचा विशेष खंबीरपणा दाखवावा लागत असे. साही हकीकत सर्वतोमुखीं झाली होती. प्रत्येकजण तिला तिखटमीठ लावून फैलाव करण्याचा प्रयत्न करींत होता. त्यामुळें मी रस्त्यानें जाऊं लागलें म्हणजे रस्त्यावरचा वाटेल तो वाटसरू मला पाहून—माझ्याकडे उघड उघड बोटें दाखवून वाटेल तशी अचकट विचकट भाषा बोलत असे. तसल्या त्या भाषेचा परिणाम मनावर होण्याइतकें माझें मन हळवें नव्हतें खरें, तरीही ते उद्गार कानीं पडतांच माझ्या वृत्तींत चलबिचल होत असे. त्या माणसाला थांबवावें, सरळ सरळ विचारावें, त्याच्याशीं वादविवाद घालावा आणि नंतर मार्ग सुधारावा, असें पदोपदीं माझ्या मनांत येत असे. यातना होत होत्या, त्याही भांडखोरपणाची उसळती वृत्ति दाबून ठेवण्याच्याच.

मी जें कांहीं केलें होतें तें बुद्धिपुरस्सर विचार करूनच केलें होतें. तात्कालिक भावनेच्या हुरळेपणाचा त्यांत अंशही नव्हता. त्यामुळें पश्चात्तापाची नुसती झुळूक सुद्धां माझ्या अंतःकरणांत येत नव्हती. पण अशा प्रकारचें वर्तन मी कां केलें याचा विचार न करतां, किंवा याचा जाब कोणत्याही प्रकारें मला न विचारतां, वाटेल त्या माणसानें वाटेल तें बोलत सुटावें हें पाहूनच मला दुःख होत असे.

एक महिन्यानंतर नाना आला. त्याला एका शाळेंत ऐंशीं रुपये पगारावर मास्तरची नोकरी लागली होती.

या तुटपुंज्या पगारांत आम्हांला दोघांचा संसार थाटायचा होता. शिवाय पुढील टर्मची फीही भरायची होती. त्याची व्यवस्था त्यानें तूर्त कर्ज काढून केली होती.

मी जायला निघालें त्यावेळीं बाबा म्हणाले, " तूं जाते आहेस, पण मीं इथं उघडा पडणार. तुला लोकांनीं त्रास दिला असेल, पण माझा हा महिना मोठा सुखांत गेला. साऱ्या आयुष्याचं पारणं फिटलंसं वाटलं. यापूर्वी तुला बोलायला तुझी आई होती. त्यामुळं तूं माझ्याशीं बहुधा बोलत नव्हतीस—नव्हे मीही कधीं तुझ्याशीं बोलत बसायची किंवा चर्चा करायची उत्कंठा दाखवली नव्हती. झाल्या गोष्टी गेल्या, पण यावेळीं मात्र तुझ्याशीं बोलत बसण्याचा मला मोठा फायदा झाला. मी पुष्कळ नव्या गोष्टी शिकलों, हें कबूल करायला मला मुळींच लाज वाटत नाहीं. सरकारी नोकरींत असतांना मी जगाच्या व्यवहाराकडे लक्ष दिलं नव्हतं. नोकरी सुटल्यावर खेळांत वेळ दवडीत होतों. पण हें तुझं लग्न झाल्यावर—लग्नांत तो तसा प्रकार झाल्यावर—सर्वांनीं तुला वाळींत टाकलं, तेव्हां तुझ्याकडे विशेष लक्ष द्यावं असं मला वाटूं लागलं. ब्रिज खेळण्याचा अड्डा मोडून मी तासाचे तास तुझ्याबरोबर बोलत बसत असें, त्याचा मला पुष्कळ फायदा झाला. तूं आणि तुझी आई इतकीं काय बोलत असतां असं जें मला वाटत असे, त्याचा उलगडा झाला. फुकट पूर्वीचे दिवस मी घालवले, असं मला वाटूं लागलं. म्हणूनच आतां तूं जाणार ही कल्पना मला असह्य होते आहे—"

भावनात्मक नसलेल्या माझ्या अंतःकरणांतून देखील बाबांच्या या उद्गारांनीं कसला तरी उमाळा आला. चटकन् एक हुंदका माझ्या हृदयांतून निघून गेला. तो ऐकून बाबा म्हणाले, " तूं रडतेस ! मोठं आश्चर्य आहे ! तूं रडूं लागलीस तर माझी काय स्थिति होईल याची कल्पना कर— "

मी म्हटलें, " अगदीं नकळत मला रडण्याचा उमाळा आला. सारं आयुष्य पारखेपणांत गेलं—आतां कुठं वात्सल्याचा अनुभव मिळत होता—नुकतीच कुठं तुमच्या ठायीं माया उत्पन्न होत होती, तोंच आतां जावं लागणार ही कल्पना दुस्सह झाली. तुम्हीं एकटे पडणार याचं कससंच वाटतं, त्याचा तो परिणाम. "

" जाऊं दे, जाऊं दे, हें असं व्हायचंच ! " बाबा गंभीरपणें म्हणाले, " आतां तूं जाणार हें ठरलंच आहे. तिथं जिवाची आबाळ करूं नकोस. भलता

संकोच धरूं नकोस, कीं अभिमानही धरूं नकोस. पैशाची जरूर लागली तर मला कळवीत जा. माझे पैसे म्हणून घ्यायचे नसले तर उसने म्हणून घे— कर्जाऊ म्हणून घे—कुणातरी परक्याकडून कर्ज काढायचं तसंच माझ्याकडून काढलं आहेस असं समज. पण जिवाची आबाळ करूं नकोस. एऱ्हवीं मी तुझ्या कडे दुर्लक्ष केलं असलं, तरी या बाबतींत तुझी आबाळ होऊं दिली नव्हती. पण तें नातं आतां गेलं आहे. न मागतां पूर्वीच्या सारखे मी तुला पैसे पाठविले तर ती मनिऑर्डर तूं परत करशील याची मला खात्री आहे. ऐशीं रुपयांत तुम्हां दोघांचा चरितार्थ मुंबईसारख्या ठिकाणीं होणं फार कठिण आहे. पोटाला चिमटा लावून तुम्ही संसार कराल याची मला खात्री आहे. पण त्याच कल्पनेनं मला दुःख होतं. आज पावेतों मी तुला सुखांत वाढवली आहे. या पुढं तूं दुःखांत दिवस काढते आहेस, असं दिसून आलं तर मला यातना होतील म्हणून म्हणतों जरूर लागेल त्यावेळीं माझ्याकडून कर्जाऊ पैसे घे."

हें आमचें भाषण चाललें होतें त्यावेळीं नानाही तिथेंच होता. मी मन आवरलें होतें, पण बाबांच्या या भाषणानें त्याला मात्र हुंदका आला. त्यावेळीं बाबा म्हणाले, "आतां तूं रडूं लागलास का? असं पहा नाना, कांसवाच्या दृष्टिसारखी आजवर माझी पाखर हिच्यावर होती. प्रत्यक्ष विचारपूस केली नाहीं तरी तिला कसलीही वाण भासूं नये म्हणून मी करडी खबरदारी घेत होतों. तूं बुद्धिपुरस्सर तिची आबाळ करणार नाहींस याची मला खात्री आहे. पण परिस्थिती मोठी बिकट आहे. आपली आबाळ होते आहे हें ती तुला कळूं देणार नाहीं. अंतस्थ माहिती नसल्यामुळें कोणत्या उणीवेनें तिची आबाळ होईल, हें तुला कळणार नाहीं. म्हणूनच मी तिला सांगितलं—तुला सांगितलं नाहीं—किंवा आतांही सांगत नाहीं."

नानाचा मनावरचा ताबा पार सुटला आणि तो एखाद्या पोरासारखा ओक्साबोक्शीं रडूं लागला. तें पाहून बाबांनाही हुंदका आला.

मी झटकन् तिथून निघून गेलें आणि बांधाबांधी करायच्या तयारीला लागलें. बाबा आणि नाना त्यानंतर बराच वेळ बोलत बसले होते. दादानें माझी फारशी चौकशी केलीच नाहीं. निघतांना नुसता औपचारिक निरोप दिला एवढेंच. स्टेशनपर्यंत पोंचवायलासुद्धां तो आला नाहीं. तें पाहून बाबा म्हणाले,

" माझा जीव तुटतो तो यामुळंच. वडील भाऊ असून नसून तो तुला सारखाच आहे. मी आहें तोपर्यंत तुझ्यावर छाया आहे. माझ्यामागं नानाखेरीज तुला कुणाचा आधार नाहीं. म्हणूनच माझ्या जिवाला यातना होतात. नोकरीच्या वेळचा करडा अंमलदार आज मेणासारखा वितळला आहे, तो याच जाणीवेनं !"

स्टेशनवर आपली मनःस्थिति उघडी पडूं नये म्हणून दांत ओंठ चावून नाना आवंढे गिळीत होता. माझी स्थिति जरी अगदींच नानाइतकी झाली नव्हती, तरी मला मनाला लगाम घालावा लागत होता.

गाडी चालू होण्याची वेळ येतांच बाबांना मात्र भडभडून आलें. कांहींच न बोलतां मान वळवून ते निघून गेले आणि गाडी चालू झाली.

मुंबईला येऊन आम्हीं नव्या बिऱ्हाडांत अधिष्ठित झालों. तें बिऱ्हाड एका चाळींत होतें. ती एकच खोली होती. खोलीचें भाडें सोळा रुपये होतें. मला मुंबईच्या खोलीच्या भाड्याची यापूर्वी माहिती नव्हती. त्यामुळें भाड्याचा आंकडा ऐकून मला आश्चर्य वाटलें.

पण त्याला कांहीं गत्यंतर नव्हतें. शक्य तितक्या कमी भाड्याची ही खोली मिळविली होती. खोलीची लांबी रुंदी पहातांच मला भीति वाटली. एवढ्या जागेंत आपण कसे राहूं शकूं, हें कोडें मला उलगडेना.

पण त्यालाही गत्यंतर नव्हतें. एवढ्याच जागेंत राहाणें भाग होतें. जेवणही तिथेंच—बैठकही तिथेंच, आणि झोंपण्याची जागाही तिथेंच ! बोर्डिंगांतील जागा सुद्धां यापेक्षां मोठी होती—पण बोर्डिंगांतील खोली माझी स्वतःची एकट्याची असे. इथें आम्हीं दोन माणसें राहणार होतों—संसार थाटणार होतों. काय करावें हें मला सुचेना. इतक्या लहान जागेंत राहाण्याची—इतक्या लहान जागेला राहातें घर म्हणण्याची पाळी यापूर्वी माझ्यावर आली नव्हती.

तरीही त्या लहानशा खुराड्यांत मला समाधान वाटलें. संसार थाटण्याचा एक प्रकारचा कैफ माझ्या मस्तकांत शिरला होता. त्या कैफाच्या लहरींत मला सोईगैरसोईचें भान विसरतां आलें.

नानाला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. एका खोलींत-दोन ते चार माणसांची सोय केलेल्या एका खोलींत राहण्याची त्याला संवय होती. तीं माणसेंही परकी. त्यामुळें ही लहानशी खोलीही त्याला मोठी वाटली. स्वतःचा संसार थाटण्याची

जबाबदारी जरी त्याला डोईजड वाटत होती तरी त्या अवजड जबाबदारीचेंही तो कौतुक मानून घेत होता.

मुंबईच्या इतर चार गृहस्थांच्या कुटुंबाप्रमाणें आमचा संसार थाटला गेला. प्रपंचाला सुरवात झाली. जेवण करण्याची तयारी पुण्याला असतांना गेल्या एक महिन्याच्या मुदतींत मी बऱ्याच चांगल्या प्रमाणांत केली होती. रोजचा स्वैपाक करतांना त्यामुळें मला कष्ट झाले नाहींत. एक महिन्याच्या शिक्षणानें मी चांगलीच स्वैपाकीण बनलें होतें.

गृहशिक्षणाबद्दल लहानपणापासून मुलींच्या जातीच्या कानींकपाळीं जी ओरड करण्यांत येते, ती किती अतिशयोक्तीची आहे याची मला खात्री पटली. सैपाक करण्याची कला व्यवस्थित माणसाला फारशी कठिण नाहीं, हें मला स्वानुभवानेंच कळलें. म्हणून सारें बालपण आणि तारुण्याचा कांहीं भाग गृहशिक्षणाच्या पायीं—म्हणजे सैपाक करण्याची कला साध्य करण्याच्या पायीं—खर्ची घालण्याचा अट्टहास कां करण्यांत येतो, याचें मला आश्चर्य वाटलें.

मी नोकरी पत्करली नव्हती. नानाच्या नोकरीवरच आमचा संसार चालणार होता. जेवण करण्यासाठीं व जेवणाच्या अंगभूत इतर केरपोतेरें, झाड सारवण करण्यासाठीं सकाळीं दोन तास आणि संध्याकाळीं दीडतास यापेक्षा जास्त वेळ मला लागत नसे. त्यामुळें बहुतेक सारा दिवस मला मोकळीकच होती. दुपारच्या वेळांत मी एम्. ए. च्या परीक्षेची तयारी करीत होतें.

शाळा सुटल्यावर नानाला संध्याकाळीं लॉ कॉलेजांत जावें लागे, म्हणून मला एकटीलाच फिरायला जाणें भाग पडत असे. फिरून परत येऊन नंतर मी सैपाकाला लागें. सैपाक तयार होईपर्यंत नाना परत येत असे. जेवण खाणं आटोपल्यावर झाडलोट करणें व बिछाने घालणें या कामीं नाना मला मदत करीत असे.

माझ्या परिस्थितींत जसें स्थित्यंतर झालें होतें, तसेंच वृत्तींतही झालें होतें. इतर चार लोकांप्रमाणें, इतर चार बायकांप्रमाणें, माझी वृत्ती बनत चालली होती. बाह्य जगाकडची नजर आकुंचित होऊन त्या लहानशा खोलींत सामावली गेली होती. सांसारिक परिस्थितीच्या अनुभवानें मी सुगृहिणी आणि सुपत्नी बनलें होतें. दैहिक सुखाच्या पहिल्या अनुभवानें मानसिक जाज्वल्यता पांगळी पडली होती. बौद्धिक बंडखोरीची लहर या काळांत चुकून सुद्धां माझ्या स्मरणांत येत नव्हती. पूर्वीच्या सर्व खळबळी मी विसरून गेलें होतें.

आज आठवतें. त्यावेळीं त्याचा मागमूस सुद्धां नव्हता.

त्यावेळीं आनंददायक वाटणाऱ्या सांसारिक सौख्याच्या तपशीलांत न जाणेंच बरें. पण आज साक्षीरूपानें त्या कालाकडे पाहिलें म्हणजे तो काल माझ्या आयुष्यांतील अधोगतीचा काल होता असें वाटूं लागतें. त्यावेळीं मी जडमूढ बनलें होतें. माझ्यातलें चैतन्य नष्ट झालें होतें. आपलेपणा विरून गेला होता. नानाच्या सौख्यासाठीं मी सारखी धडपडत होतें. माझ्या मतांची किंवा तत्वांची जाणीव सुद्धां लुप्तप्राय झाली होती. अहिल्येसारखी मी पाषाणी बनलें होतें.

त्या कालाची आठवण झाली कीं आज माझा मलाच राग येतो. दुसऱ्यांना नांवें ठेवणारी मी—ती मीच कशी अशी फशीं पडलें ? मानसिक गुलामगिरीचा तिटकारा करणारी मी, ती मीच अशी कशी अट्टल गुलाम बनलें ? पतिपत्नीच्या नात्याबद्दल कोरडे ह्मणणारी मी, ती मीच कशी अशी पाषाणी बनलें ? ती विषयलालसा होती का ? विषयलालसेनें उत्पन्न होणाऱ्या तंद्रींत माझा स्वाभिमान विरून गेला होता का ?

काय झालें होतें कुणाला ठाऊक ! त्या परिस्थितीचें विश्लेषण आज मला करतां येईल खरें; पण तें करण्याची ही जागा नाहीं. वैषयिक प्रवृत्तीनें उत्पन्न होणाऱ्या मानसिक गुलामगिरीचा तपशील असल्या या आत्मचरित्रांत देतां येणें शक्य नाहीं. कुणाही विवाहेच्छू मुलीला लाजभीड न ठेवतां, मोकळ्या मनानें, खुल्या भाषेंत तें मी सांगूं शकेन; पण असल्या आत्मचरित्रांत तो तपशील विशद करून लिहिण्याचें मनोधैर्य परिस्थितीनें मला ठेवलें नाहीं.

तो माझ्या अधःपाताचा काल होता यांत बिलकूल शंका नाहीं. सांसारिक सुखाला मी लालचावलें होतें, त्यामुळें स्वतः नोकरी करण्याची आकांक्षासुद्धां हळुहळु मावळत जात होती. भाऊच्या काटकसरीमुळें नानाच्या तुटपुंज्या पगारांतही आमचा संसार सुखासमाधानानें चालला होता. तसा तो चालला नसता, तर कदाचित् स्वतः नोकरी करण्याची वृत्ति उसळीमारून वर आली असती.

नानाच्या अस्तित्वांत मी गुरफटून गेलें होतें. माझ्या अस्तित्वाची मला पूर्ण विस्मृति झाली होती. एका शब्दानेंही त्यानें मला कधीं दुखविलें नाहीं. माझ्या सुखासाठीं तो जिवाचा आटापेटा करीत होता. त्या मानीव कृतज्ञतेच्या भाराखालीं मी चिरडून नाहींशी झालें होतें.

मधल्या काळांत चारदोन दिवसांसाठीं मी एकदोन वेळ पुण्याला जाऊन आले. मी सुखांत आहें हें कळून बाबांना आनंद झाला. नाना मात्र पुण्याला येत नसे. पुण्याला येऊन आमच्या बिऱ्हाडीं राहावें, आमच्या काकांच्या घरीं जाऊं नये, असें करणें त्याला अशक्य होतें. ही कबूली देऊनच त्यानें पुण्याला येण्याचें टाळलें होतें.

काकांच्या घरीं राहण्यांत त्याला जितका अडथळा होता तितकाच आमच्या दादाच्या वृत्तीचाही आडपडदा होता. तो आमच्या बिऱ्हाडीं येऊन राहिला असता तर तें दादाला रुचलें नसतें, असें मलाही वाटत होतें. वहिनीनें त्याचा कदाचित् अपमानही केला असता. म्हणूनच तो माझ्या गैरहजेरींत मुंबईला खाणावळींत राहात असे. एका खेपेला तर स्वतः जेवण करून राहण्याचाही प्रयोग त्यानें करून पाहिला.

तो प्रयोग पुढें उपयोगीं पडला. मुंबईला परत आल्यावर माझी प्रकृति हळु-हळु बिघडूं लागली. पहिल्यानें मला अन्नद्वेष होऊं लागला. अळेंवळें दोन घांस खाण्याचा प्रयत्न केला तर वांत्या होऊं लागल्या.

पुढें पुढें तर वांत्यांची परमावधि झाली. पाणी सुद्धां पोटांत ठरेना. मला कांहींच माहिती नव्हती. पण नानाला त्याची कल्पना आली. कारण महिन्यांतून तीन दिवस खाणावळींतून जेवण आणण्याची जी पाळी येत होती, तीही टळूं लागली.

माझ्या परिस्थितीची जाणीव मला उत्पन्न झाली. जिवावरचें संकट समोर उभें राहूं लागलें. ज्यावेळीं अशा रीतीनें माझी प्रकृति बिघडली होती, तीच वेळ नानाच्या शेवटच्या परीक्षेची आली.

तें एक मोठें संकट होतें. माझ्या देहांत त्राण नव्हतें. यत्किंचितही श्रम मला सहन होत नसे. नानाला त्रास होऊं नये म्हणून दांत ओंठ खाऊन मी स्वैपाक करण्याच्या दिव्यांतून पार पडत होतें.

ही गोष्ट नानाच्या लक्षांत आली. स्वैपाक करण्याचा मी जसा हट्ट धरीत होतें, तसाच खाणावळींतून डबा आणण्याचा हट्ट तो धरूं लागला. खाणावळींतील जेवण जसें त्याला आवडत नसे, तशीच मलाही त्याची शिसारी होती. यापूर्वी महिन्यांतील तीन दिवसांत जीव धरून ठेवण्यासाठीं खाणावळींतील डब्यावर आम्हीं कसाबसा गुजारा करीत होतों, पण आतां हें रोजचें संकट होऊन बसलें होतें.

मला खाणावळींतील जेवण आवडत नाहीं असें पाहून नानानें स्वतः स्वैंपाक करण्याचा आग्रह धरला. नाहीं म्हणावें तर नानाला वाईट वाटतें आणि होय म्हणावें तर परीक्षेच्या वेळीं त्याला हा दुहेरी त्रास होतो, अशा संकटांत मी पडलें.

त्याच्या इच्छेला मान वाकविण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतें. तो इतक्या गोड शब्दांनी आपली बाजू मांडीत असे, कीं त्यामुळें मी निरुत्तर होऊन जात असें

शाळेंतील नोकरी साधायची, संध्याकाळीं कॉलेजांत जायचं आणि दोन्ही वेळचा स्वैंपाक करायचा, यांतच त्याचा सारा दिवस जाऊं लागल्यामुळें अभ्यासासाठीं त्याला जागरणें करावीं लागत होतीं. त्या त्रासानें त्याची प्रकृति जशी खालावत जात होती तशी इकडे मीही दिवसें दिवस थकत चाललें होतें. फिरायला जाणें, पहिल्यापासूनचें प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें बंद झालें होतें, तर पुढें बाहेर जाण्याची हळुहळु माझी मलाच लाज वाटूं लागली. अभ्यासाकडेही लक्ष्य लागेना म्हणून लायब्ररींतून कसलीं तरी पुस्तकें आणून तीं वाचीत मी सारा दिवस घालवीत असें.

बाबांना ही हकिकत कळली त्यावेळीं ते मुंबईला आले. आमच्या आकुंचित संसाराचा थाट पाहून त्यांच्या डोळयाला पाणी आलें; ते ह्मणाले, " अशा स्थितींत तूं दिवस काढीत असशील याची मला कल्पनाही नव्हती. मुंबईच्या खुराड्याचं हें वैभव मीही कधीं अनुभवलं नव्हतं. मी आपला खाणावळींत जाईन. तुझ्या नवऱ्यानं जेवण करावं आणि आयतोबासारखा मी जेवायला बसावं, हें कांहीं मला बरं दिसत नाहीं. "

पण नानानें आग्रहच धरला., तो ह्मणाला. " जांवयाच्या हातचा सैंपाक चाखण्याचं भाग्य साऱ्याच सासऱ्यांना कांहीं लाभत नसतं. गोदूच्या कृपेनं हें लाभलं आहे त्याचा एकदां अनुभव घ्याच ! "

नानाच्या आग्रहामुळें बाबांनीं त्या ' भाग्या 'चा अनुभव घेतला खरा; पण त्याच्या त्या उद्गारांनीं माझ्या अंतःकरणाला चिमटा बसला.

' गोदूच्या कृपेनें ' ह्मणजे काय ? माझ्या मूर्खपणामुळें का ? माझ्या दुराग्रहामुळें का ? नांव बदलूं न देण्यासाठीं भर लग्नसमारंभांत मी जो धुडगूस घातला, त्याच्यामुळें जी परिस्थिति उत्पन्न झाली, स्वार्थत्यागपूर्वक त्याला जे क्लेश सहन करावे लागले, तीच काय ही ' गोदूची कृपा ?'

तो उद्गार साहजिक होता; असेल—पण त्यांत कुठें तरी खोंच असल्याचा मला संशय आला. लग्नापूर्वीची ' गोदू ' जागी झाली. खळबळ सुरु झाली. वेळ भरपूर असे, काम कांहींच नसे, अभ्यासही होत नव्हता, पण या नव्या जागृतीमुळें इतर वाचनालाही खो बसला. विचारांची मालिका सुरू झाली.

मी सिंहावलोकन करूं लागलें. मधल्या काळांतील जडमूढ स्थितीची जाणिव उत्पन्न होऊं लागली. त्या जाणीवेनें माझी दृष्टि पुनः उघडली.

सहजगत्या उच्चारलेल्या एका उद्गारानें मी कशी जागी झालें, याचें माझें मलाच आश्चर्य वाटूं लागलें. त्या पाषाणमय कालांतील कांहीं प्रसंग आठवून त्यांजकडे मी या नव्या दृष्टीनें पाहूं लागलें. पूर्वीं सुखपूर्ण वाटणाऱ्या त्या प्रसंगांत मला गुलामगिरीची झांक दिसूं लागली. जसजसा विचार करूं लागलें, तसतशी मनाची तळमळ दुःसह होऊं लागली.

बाबा ज्या दिवशीं निघून गेले त्याच दिवशीं मला ' मॅटरनिटि होम ' मध्यें जावें लागलें. ' बेड ' आधींच रिझर्व केला होता.

डॉक्टरनीं तपासणी करून एका खोलींत एका कॉटवर माझी स्थापना केली.

डॉक्टर बरोबर नानाही निघून गेला. क्षणभर त्या खोलींत मी एकटीच होतें. ती खोली पांढरी स्वच्छ होती. सामानसुमानालाही पांढराच रंग दिला होता. बिछान्यावर स्वच्छ पांढरी चादर, पांढऱ्या अभ्र्याच्या उशा आणि पांघरुणही पांढरेंच होतें. त्या मनःस्थितींत तो पांढरा रंग मला भयाण वाटला.

दरवाजा उघडून पांढरें स्वच्छ पातळ नेसलेली एक नर्स आंत आली. तिला समोर पहातांच माझ्या मस्तकांत विजेच्या प्रवाहासारखी एक निसटती लहर येऊन गेली. जुनी स्मृति जागी झाल्यासारखी वाटली.

माझ्या समोर येतांच तीही थबकली होती. तिलाही ती स्मृतीची लहर आली असावी.

क्षणभर आम्हीं एकमेकींकडे डोळे तारवटून पहात राहिलों. माझ्या तोंडून लहानशी किंचाळीच निघून गेली असें मला वाटलें.

" कोण ठके ? "

" कोण गोदे ? "

त्या वेदनामय स्थितींतही मी कॉटवरून झटदिशीं खालीं उतरलें आणि ठकीच्या पसरलेल्या हातांत कवटाळली गेलें.

---

# प्रकरण २२ वें

# मातृपदीं



क्षणभर आम्हां दोघांच्या तोंडून एकही शब्द निघेना. अंतःकरणें भरून आलीं होतीं. अनपेक्षित भेटीमुळें उत्कंठेला ऊत आला होता. शब्दाचा उद्गार त्यामुळें अनाठायीं वाटत होता.

त्या मुक्या भेटींतच कितीतरी शब्द बोलून गेले असें वाटलें. ठकीनें दोन्ही हात माझ्या खांद्यावर ठेवले, अगदीं डोळे भरून माझ्याकडे पाहिलें आणि तिच्या तोंडून उद्गार निघाले, “आणि ही माझी ती चिमुकली गोदू!”

अगदीं न्याहाळून न्याहाळून वांकड्यातिकड्या माना करून माझ्याकडे पहात ती म्हणाली, “किती सुंदर झाली आहेस ग तूं! लहानपणीं तूं मोजिरवाणी दिसत होतीस—मोठेपणीं सुंदर होशील असं वाटलं होतं—पण इतकी सुंदर होशील अशी कल्पना त्यावेळीं मला मुळींच झाली नाहीं—” माझ्या केंसावरून आईच्या जिव्हाळ्यानें हात फिरवीत ती म्हणूं लागली, “तुला पाहिलं तर कुठ-ल्याही बाईला हेवा वाटेल. कुणा भाग्यवानाचं नशीब उघडलं हें! कुठला हा चितळे?—”

“तुला कळलं तें नांव?” मी विचारलें.

ती कांहींशी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, “त्यांत काय आहे? नोंदबुकांत तुझं नांव पाहिलं—”

“नोंदबुकांत? नोंदबुकांत! नोंदबुकांत माझं नांव पाहिलंस? नोंदबुकांत माझं नांव गोदू चितळे म्हणून आहे का?” बोलत असतांना मी थरथर कांपत होतें.

माझी त्यावेळची स्थिती पाहून ठकी चांगलीच घाबरली आणि चांचरत चांचरत म्हणाली, “होय—पण त्याचं तुला आश्चर्य कां वाटलं?”

माझ्या सर्वांगाचा भडका झाला होता. नानाचा पाजीपणा माझ्या ध्यानीं आला. नोंदबुकांत नांव नोंदवतांना स्वतःच्या नांवाचा शिक्का त्यानें तापवून माझ्यावर मारला काय? माझा आकस्ताळीपणा उसळून उठला—

—पण त्याचा परिणाम भयंकर झाला. माझ्या पोटांतून कळ आली आणि त्या कळीबरोबर वेणा सुरू झाल्या.

माझी स्थिति ठकीच्या ध्यानांत आली. कांहीं सुद्धां उद्गार न काढतां तिनें मला नेऊन कॉटवर निजविलें. तिनें घंटा देतांच डॉक्टरही खोलींत आले.

स्त्रीजीवनाच्या यातनेची ती हकिकत मी येथें नोंद करून ठेवीत नाहीं. या आमच्या विशिष्ट परिस्थितीविषयीं पुरुष जरी बेफिकीर असतो, तरीही प्रत्येक स्त्रीला या यातनेची माहिती आहे. तळहातावर शीर घेऊन रणांगणावर लढणाऱ्या वीराच्या मरणाविषयींच्या बेफिकीर वृत्तीनें, जगाचा पसारा वाढविण्यासाठीं जिवाची कदरदान करून प्रत्येक स्त्री नव्या स्त्रीपुरुषांना जन्म देत असते, त्या वीरवृत्तीची ओळख पुरुषांना असणें शक्य नाहीं. शौर्याच्या बढाया मारणाऱ्या 'एकाद दुसऱ्या' पुरुषाला 'प्रत्येक' स्त्रीची ही वीरवृत्ती कळणें शक्य नाहीं.

त्या स्त्रीजातीच्या वीरवृत्तीला अनुसरून मी एका जीवाला जन्म दिला.

मला आनंद झाला. तो जीव माझ्या जातीचा होता. ती एक गोजिरवाणी मुलगी होती.

डॉक्टर आणि नर्सीस यांच्या संप्रदायांतल्या सर्व विधींतून पार पडून ती मुलगी मी पाहिली. एक अननुभूत भावनेचा हृदयांत उद्रेक झाला आणि त्या बरोबरच हृदयाला पान्हा फुटल्याची जाणीव मला उत्पन्न झाली. मातृहृदयाचें जीवन त्या गोजिरवाण्या जीवाला पाजतांना माझ्या अंतःकरणांत अननुभूत भावनांचें काहूर माजूं लागलें.

मी सारें जग विसरून गेलें. ठकीलासुद्धां विसरलें. तो पान्हा—तो जीव—आणि मी—याखेरीज जगांत कांहींच राहिलें नाहीं.

मुलाला घेऊन ठकीनें पाळण्यांत ठेविलें आणि मलाही बिछान्यावर निजवून तिनें माझ्या अंगावर पांघरूण घातलें.

मी कांहींतरी बोलणार आहें असें पाहून ती मला दटावून म्हणाली, "या वेळीं कांहीं बोलायचं नाहीं बरं का?—या वेळीं अगदीं गुपचिप झोंपीं जायचं. कांहीं बोलायचं नाहीं, कांहीं विचार मनांत आणायचा नाहीं कीं कांहीं, विचारायचं नाहीं!" असें म्हणून एकादा उद्गारसुद्धां काढण्याचा अवधि मला न देतां ती दार ओढून घेऊन निघून गेली.

तिनें पुष्कळ सांगितलें पण मी ऐकायला हवें होतें ना? जीवाशीं लढण्याच्या—मृत्युशीं झगडण्याच्या त्या अननुभूत प्रसंगांतून जातांना जरी मला साऱ्या जगाची विस्मृती झाली होती, तरी समाधानाचा, सुखाचा क्षण येतांच विसरलेल्या वृत्ती पुढें उभ्या राहून हटावूं लागल्या.

असें काय केलें नानानें? अशी संधी साधली का? मी अपंग होतें असें पाहून त्यानें चितळ्यांच्या पोळ्यांत मला डांबून टाकलें का? ज्या तत्वासाठीं जगाची पर्वा न करतां लग्नाच्यावेळीं मी त्याचा हात धरला—नांव बदलूं दिलें नाहीं—त्याचा त्यानें असा सूड साधला का?

लग्न झाल्यापासून सार्वजनिकरीतीनें माझ्या नांवाचा उल्लेख करण्याचा मुळीं प्रसंगच आला नव्हता. बाबा कधीं पत्रच पाठवीत नसत—दादाचें माझें कधींच जमत नसल्यामुळें त्याचाही पत्रव्यवहार नव्हता आणि माहेरवासासाठीं मी पुण्याला गेलें तर चार-दोन दिवसांपेक्षां जास्त रहात नसल्यामुळें नानाच्य पत्राची जरूरीही भासली नव्हती.

एम्. ए.च्या परिक्षेचा अभ्यास करतांना त्यावेळीं टर्म्स् भराव्या लागत नस-ल्यामुळें कुठल्या कॉलेजांत नांव नोंदवण्याचा योग नव्हता. अशारीतीनें एकापरीनें मी 'नांवनसतां' झालें होतें.

पण नांव नोंदविण्याची ही वेळ येतांच त्या पाजी माणसानें माझा असा दावा साधला.

त्यानें विचारलें असतें—तर त्यावेळच्या मनाच्या हुरळेपणांत मी कदाचित् त्याचें आडनांव कबूल केलें असतें.

पण त्यानें मला विचारलें नाहीं. नकळत माझ्यावर घाव घातला. मला न कळतां मला चितळ्यांच्या कुळांत त्यानें सामील करून घेतलें.

सकृद्दर्शनी ही गोष्ट कुणालाही अतिरंजित वाटेल इतकी ती रोजच्या व्यव-हारांतली आहे. लग्न झाल्यानंतर मुलीचें नांव बदलणें हे इतकें स्वाभाविक होऊन बसलें आहे, कीं उभयपक्षांना त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं. तसें व्हाय-चेंच, हें अनादिसिद्ध आहे.

पण अनादिसिद्ध अन्याय मला मोडायचे होते. रक्तारक्तांतून खिळून गेलेली आपलेपणाची विस्मृति होण्याची ही भावना नाहींशी करण्याचा संप्रदाय मला सुरू करावयाचा होता. त्या अभिमानांत माझा जीव गुंतून गेला होता.

त्या अभिमानावर नानानें असा अचानक हल्ला केला. अचानक हल्ला देखील मला पत्करला असता. पण तो हल्ला केल्याचें त्यानें मला सांगितलें नाहीं. माझ्या अपंग स्थितीचा त्यानें फायदा घेतला, याच गोष्टीची मला चीड आली---अगदीं मस्तक भणाणून जाण्याइतकी चीड आली. त्या चीडीमुळें पूर्व स्थितीचें सिंहावलोकन करण्याचेंही मला भान राहिलें नाहीं.

मी नुसती फणफणत होतें. यावेळीं नाना समोर दिसला असता तर त्याची मानगुटी धरून त्याला मी एक चांगली गचांडी दिली असती, इतकी मी बेभान झालें होतें. थकलेल्या देहाला ग्लानि येत होती, डोळ्यांना झांपड येत होती, तरीही या एकाच प्रसंगाचा विचार करण्यासाठीं मी जागें राहाण्याचा प्रयत्न करीत होतें.

शारीरिक दुबळेपणापुढें मनाची तीव्रता पंगु पडत असते. भावनेच्या त्या आत्यंतिकतेमुळें देहाचा दुबळेपणा वाढूं लागला आणि माझे डोळे माझी इच्छा नसतांही मिटूं लागले. झोंपेचा अंमल आणि मनाचा अंमल या दोहोंत झगडा लागूं लागला. पण शारीरिक दुबळेपणापुढें मनाची मजल पांगळी पडली.

मला नकळत मला झोंप लागली. मी जागीच आहें असें मला वाटत होतें. पण त्याबरोबरच थकल्यामुळें येणारें घोरणें मला ऐकूं येत होतें. मी झोंपी गेलें नाहीं असें कितीही निर्धारपूर्वक ठरविण्याचा प्रयत्न केला, तरी मला झोंप आली होती.

त्या-झोंपेंतसुद्धां नानाच्या द्वेषानें मी सळसळत होतें. त्या झोंपेंतसुद्धां परिस्थितीचें सिंहावलोकन करण्याची मला बुद्धि झाली नाहीं.

एकच विचार माझ्या नजरेसमोर सळसळत होता—"नानानं मला फसवलं. माझा गळा कापला. माझ्या अभिमानाला धक्का दिला ! माझ्या अभिमानाची खिजगणती केली नाहीं !"

तत्वासाठीं जीव सोडण्याचीसुद्धां तयारी करण्याची वृत्ति ज्यांच्या ओळखीची नाहीं, त्यांना ही तळमळ अस्थानीं वाटेल. नुसतें नांव बदललेलें तें काय आणि त्याच्यासाठीं ही बाई इतकी अकांडतांडव करते काय, असा कुणी प्रश्न केला तर त्याच्याबद्दल मला यत्किंचितही वाईट वाटणार नाहीं. जगाच्या व्यवहाराच्या दृष्टीनें हा माझा आततायीपणाच ठरणार.

पण तो आततायीपणा माझ्या जिव्हाळ्याचा आहे. इतर स्त्रिया आपलें नांव आणि आडनांव अगदीं सहज हातोहात गमावून बसतात, तसें नांव गमावून बसणें त्यांना क्रमप्राप्त वाटतें—स्वाभाविक वाटतें–हीच गोष्ट मला विसंगत वाटत होती—क्रूरपणाची वाटत होती. त्यामुळें व्यक्तीस्वातंत्र्य गमावण्याचा पाया रचला जात होता. तो पाया रचण्यासाठीं श्रुतिस्मृतींनी स्त्रीजातीच्या हृदयांत धर्माच्या नांवाखालीं निर्दयपणानें एक भलामोठा खड्डा खणून ठेवला होता—प्रत्येक स्त्रीला ही हृदयांतली खांच जाणवत नव्हती—किंबहुना अभिमानास्पद वाटत होती.

याच गोष्टीची मला चीड आली होती. आणि ह्याच अन्याय दूर करण्यासाठीं मी सज्ज झालें होतें. मला इतका उद्वेग झाला होता तो त्यामुळेंच. झोपेंत देखील तोच विचार चालला होता तो त्यामुळेंच.

कुणी तरी अगदीं हलक्या हातानें मला थोपटीत असल्याची जाग येतां येतां मला जाणीव झाली. डोळे उघडून समोर पहातें तों आईच्या प्रेमळ नजरेनें पहात असलेल्या ठकीची व माझी दृष्टादृष्ट झाली. एकाद्या लहान मुलाला समजावण्यासाठीं वापरतात तशा कोवळ्या हळव्या भाषेनें ती मला म्हणाली, "जागी झालीस? काय हें? कसं तुला एवढं कळत नाहीं? यावेळीं तुझी प्रकृति किती नाजुक झाली आहे याची तुला कल्पनाच का नाहीं?"

मी चांगलीशी जागी झालें नव्हतें. तिच्या एका वाक्यासरशीं मला पायरी पायरीनें जाग येत होती. ती बोलायचें थांबून माझ्याकडे पाहूं लागली त्यावेळीं मी म्हटलें, "काय झालं? मी काय केलं? मी झोपेंत बरळत होतें का?"

"बरळत होतीस?" ठकी गोड गोड हंसत म्हणाली, "चांगली भांडत होतीस! झोपायच्या पूर्वी जो एक विचार मनांत आला होता तोच घेऊन झोपेंत घोंशित होतीस—" बोलत असतांना ती आपला मऊ हात माझ्या तोंडावरून फिरवीत होती. मला वाटलें मी लहान मूल आहें आणि माझी आई मला खेळवून चाळवीत आहे.

तिच्या त्या गोंडस शब्दांनीं माझ्या अंतःकरणाला गुदगुल्या होत होत्या. तिने नुसतें बोलावें आणि आपण ऐकत रहावें, असें मला वाटत होतें. पण ती बोलत असतांना जेव्हां मधेंच थांबली त्यावेळीं मला शून्य झाल्यासारखें वाटलें. मी म्हटलें, "बोल–बोल आणखी कांहींतरी बोल. थांबूं नकोस!"

माझें भाषण ऐकून ती अगदीं गोडगोड हंसली. तिच्या त्या हंसण्यामुळें माझें हृदय भरून आलें. आणि चटकन् एक हुंदका माझ्या हृदयांतून बाहेर पडला. त्या सरशीं दचकून ती ह्मणाली, " काय झालं ? "

" कांहीं झालं नाहीं आई ! " माझी चूक माझ्या लक्षांत आली. ती ठकी होती–आई नव्हती.

त्या माझ्या उद्गारामुळें तिच्याही डोळ्यांना टच्कन् पाणी आलें. ती ह्मणाली, " साहजिक आहे. याचवेळीं आईची आठवण व्हायची—"

" आठवण होऊन काय उपयोग ? "

" म्हणजे ?"

" आठवण ही यायचीच. पण ती कांहीं आता यायची नाहीं !" असें म्हणत असतांना मला एकदम भडभडून आलें आणि मी ओक्साबोक्शीं रडूं लागलें.

" उगी–उगी–" ह्मणत ठकी माझें सांत्वन करूं पहात होती. तिचा मायेचा हात माझ्या सर्वांगावरून फिरत होता. त्या कोंवळ्या स्पर्शानें माझ्या दुःखाला अधिकाधिक ऊत येत होता.

ठकी हळूच ह्मणाली, " आणि रावसाहेब हल्लीं कुठं असतात ?"

मी रडत रडतच उत्तर दिलें, " पुण्याला. आतां पेन्शन घेतलं आहे त्यांनीं. दादाही तिथंच असतो. वकिली करतो. त्याचं लग्न झालं आहे—"

एकेक हकिकत एका एका शब्दांत सांगत असतांना हळुहळु माझे हुंदके मावळत होते. आणि दादाचा उल्लेख येतांच दुःखाची विस्मृति होऊन वहिनीच्या उल्लेखासरशीं मन अगदीं कठोर झालें. अंगावरील पांघरूणानें डोळे पुसून मी ह्मटलें, " कितीतरी हकीकती आहेत, केव्हां एकदां तुला सांगेन असं मला झालं आहे. किती किती तुझा शोध केला—"

" तें मला कळलं आहे, " ठकी गंभीरपणानें ह्मणाली, " त्यावेळीं मला नापत्ता केलं पण पुढं–" ती क्षणभर थांबून म्हणाली, " जाऊंदे, यावेळीं त्या गोष्टी नकोत तूं जरा सावरलीस ह्मणजे तुझ्यामाझ्या साऱ्याच गोष्टी मोकळ्या मनानं बोलूं–" ती खिन्नपणानें हंसली आणि पुढें म्हणाली, " आतां कांहीं मी पळून जात नाहीं आणि तूंही निसटत नाहींस. आणखी आतां असं पहा. भेटीचा टाईम झाला आहे. कुणी भेटायचे असले तर ते आतांच येतील.

त्याच्याशीं कांहीं बोलायचं नाहीं, तोंड उघडायचं नाहीं, नुसतं होय नाहीं असं मानेनं म्हणायचं. काय सांगायचं तें मी सांगेन–समजलं ? हें मी नर्स म्हणून सांगतें आहे, तसंच ठकी म्हणून सांगतें आहे. माझें ऐकणार ना ? कीं लहान पणसारखा तसाच हट्ट करणार ! हट्ट केलास तर माझ्या कामावर गोष्ट नाहीं बरं पडायची !"

एखाद्या लहान मुलाला वडील माणसं समजावतात तशा भाषेत ती बोलत होती, आणि एखाद्या लहान मुलाइतक्याच संथपणानें मी तें भाषण ऐकून घेत होतें.

इतक्यांत दार उघडलें आणि नाना आंत आला. तो अगदीं हंसत हंसतच येत होता. ठकी माझ्याकडे सारखी टक लावून पहात होती. तिच्या त्या जरबेच्या नजरेखालीं मी अगदीं चुरून गेलें होतें. किंबहुना माझ्या कृति तिच्या इच्छेनुसार घडत होत्या.

नाना हंसत असलेला पाहून मी देखील हासल्यासारखें केलें. पण त्या हासण्यामुळें माझा चेहेरा अधिकच रडवा झाला असावा असा मला भास झाला ! ठकी आळीपाळीनें त्याच्याकडे व माझ्याकडे पहात होती आणि त्या डोळ्यांच्या चालवणीबरोबर बोलत होती. ती म्हणाली, "हिची प्रकृती अगदीं नाजूक झाली आहे. तिला बोलायची परवानगी नाहीं. काय विचारायचं तें मला विचारा."

तो हांसत हांसत म्हणाला, "बाळ–बाळंतीण ठीक आहेत ना ?"

ठकीनें उत्तर दिलें, "ठीक आहेत. पण दोनतीन दिवस तिला बोलायची परवानगी नाहीं. तशी काळजी करण्याचं कारण नाहीं. परंतु एकंदरींत न बोल लेलं बरं. मूल पहायचं आहे का ?" असें म्हणून ती पाळण्याकडे वळली.

नानाही तिकडे गेला. त्या पडल्या स्थितींत माझी नजर त्यांच्याकडे चांगलीशी पोंचत नव्हती. त्यांतून त्या दोघांची पाठही माझ्या बाजूकडे होती.

माझ्या पोटांतून सळसळून येत होतें. नोंदबुकांत नांव बदलून लिहिल्याबद्दल नानाचा चांगला खरपूस समाचार घ्यावा, असें पुनः पुन्हा वाटत होतें. पण ठकीची जरब जबरदस्त बसली होती. सळसळून येत असतांही तोंडांतून शब्द निघत नव्हते.

ठकी नानाला घेऊन बाहेर गेली. त्याला पुनः तिनें माझ्याकडे येऊंच दिलें नाहीं.

किती तरी वेळ तीं बाहेर बोलत असावीं असें मला वाटलें. नाहीं नाहीं त्या कल्पना माझ्या मनांत येत होत्या. त्यानें काय विचारलें असेल, ठकीनें त्याला काय सांगितलें असेल, काय उत्तरें दिलीं असतील, याची मी उगीचच कल्पना करीत होतें. त्या काल्पनिक प्रश्नोत्तरांना कांहीं संगतीच नव्हती. ठकी ही माझी लहान-पणची मैत्रीण आहे, हें तिनें स्वतः होऊन सांगितल्याशिवाय नानाला कळणें शक्य नव्हतें, याची जरी मला जाणीव होती, तरीही त्यांची जुनी ओळख आहे असें धरून मी ही काल्पनिक प्रश्नोत्तरें घडवीत होतें.

थोड्या वेळानें ठकी आंत आली. ती आलेली पहातांच मी अगदीं उत्कंठेनें विचारलें, "काय म्हणत होता तो ?"

ती आश्चर्यचकित होऊन उद्गारली "काय म्हणत होता 'तो' ? म्हणजे ? तुझा नवरा ना तो ? त्याला 'अरे तुरे' म्हणतेस ?"

मी अगदीं खिन्नपणानें हंसलें आणि म्हटलें, "तसंच आहे—आमचं नातं इतरांसारखं नाहीं—किंवा नव्हतं म्हणेनास ! आम्ही कॉलेजांत एका जागीं होतों. तें पूर्वीचं नातं चालवीत आलों आहों. पूर्वी मी अहो जाहो म्हणत असें. पण परिचय वाढतां वाढतांच भाषणांत एकेरीपणा आला. लग्नानंतरही तो कायम आहे—" माझं भाषण ऐकून ती खिन्नपणानें हंसली, असें पाहून मी म्हटलें, "तो मोठा इतिहास आहे. थोडक्यांत सांगून होणार नाहीं. तुझा इतिहासदेखील मला ऐकायचा आहे."

"माझा इतिहासही तसाच मोठा आहे." एक सुस्कारा काढून ठकी म्हणाली. "मोठा दुःखाचा आहे, विटंबनेचा आहे. तो सांगायलाही अवकाश हवा. जरा बरी हो, हिंडू फिरूं लागेतोंपर्यंत कांहीं बोलायचं नाहीं. तुला उत्कंठा वाटते आहे तशी मलाही वाटते आहे, पण यावेळीं आत्मसंयमन केलें पाहिजे—"

आतां कुठें माझ्या ध्यानांत येऊं लागलें, कीं ठकीच्या मुद्रेवर लहानपणींच्या मुद्रेशीं तुलना करतां मोठाच फरक दिसून येत होता. लहानपणींही तिला पोक्त-पणा असे, पण आतां त्या पोक्तपणाला एकप्रकारची खिन्नतेची छटा आली होती.

मी विचार करीत असतांच मुलाच्या रडण्याचा स्वर ऐकूं आला. ठकी धांवतच पाळण्याकडे गेली. आणि थोड्यावेळानें रडणें थांबत नाहींसें पाहून मूल घेऊन माझ्याकडे आली.

तें दृश्य मोठें विलक्षण होतें. मानवी आकार असलेला तो लहानशा मासाचा गोळा हातीं घेऊन सांवरायला मला प्रयास पडत होते. पण त्याचा स्पर्श होतांच माझ्या हृदयांत एक प्रकारची अभूतपूर्व कालवाकालव सुरु झाली. हृदय उचंबळून येऊं लागलें. मी त्याला पाजायला घेतलें.

तिनें पिण्यास सुरवात केली. तो आनंद अनुपमेय होता—वर्णनाला शब्दातीत होता. त्या स्थितींत मला एक प्रकारची तंद्रा लागली.

त्या तंद्रेंत मला शब्द ऐकूं आले " हं–हं–सावध—सावध ! "

मी शुद्धिवर आलें. ठकी माझ्या शेजारीं बसली होती. तिनें अंगावर मला सांवरून धरलें होतें.

---

## प्रकरण १३ वें

# सिंहावलोकन



तीन चार दिवसांत माझी प्रकृति बरी वाटूं लागली. त्या मुदतींत ठकीचा माझ्यावर कडक पहारा असे. विशेषतः संध्याकाळच्या वेळीं नाना भेटावयास येत असे त्यावेळीं ती क्षणभर सुद्धां इकडची तिकडे होत नसे. नानाबरोबर बोलण्याचें काम बहुतेक तीच करीत असे.

मला बोलायची बंदी केली आहे, असें ठकीनें सांगितल्यामुळें नाना बराच अस्वस्थ झाला होता. माझी प्रकृति कांहीं तरी विशेष बिघडली आहे असा त्यानें समज करून घेतला होता. पण ठकी या बाबतींत त्याला धीर देत असे आणि तेवढ्यावरच समाधान मानून घेऊन तो निघून जात असे.

मी अगदीं अधीर झालें होतें. आणि ठकी तर शक्य तितकी खंबीर राहाण्याचा प्रयत्न करीत होती. ज्यावेळीं मला बरें वाटूं लागलें, बरीच ताकद आल्यासारखी वाटली, त्यावेळीं ठकीनें आपण होऊनच आपली हकिकत सांगण्याचा एके दिवशीं प्रारंभ केला.

तिचें आयुष्य मोठें दुःखमय झालें होतें. बाराव्या वर्षी तिचें लग्न झालें. शाळा सोडण्याची तिची इच्छा नव्हती पण लग्न झाल्यानंतर शाळेंत जाणें अशक्य होऊन बसलें. उच्च वर्णाच्या सुनांना ज्या काळांत शाळेंत जातां येत नव्हतें, त्या काळांत एका तेल्याच्या सुनेला तें कसें साध्य झालें असतें ?

तिचीं बरीच वर्षे सासरीं गेलीं. तिचा नवरा मुंबईतील एका छापखान्यांत अगदीं लहानपणापासून कंपॉझिटरचें काम करीत असे. त्याला घरीं येण्यास क्वचितच रजा मिळत असे. कंपॉझिटरचा पगार म्हणजे रोजमुरा, आणि त्यामुळें रजा घेणें म्हणजे पगार न मिळणें, असें असल्यामुळें तितकीच जरूरी असल्याशिवाय तो रजा घेत नसे. सणासुदिनाच्या दिवशीं ज्या वेळीं तो रजा घेऊन येई त्यावेळीं ठकी बहुतेक माहेरीं गेलेली असे. अशा रीतीनें कित्येक वर्षेपर्यंत त्यांची तोंडओळख सुद्धां झाली नाहीं.

मुंबईत बिन्हाड करण्याइतका पैसा मिळाल्याशिवाय ठकीला तिकडे घेऊन जाणें अशक्य झालें होतें. तिच्या सासऱ्याचा तेल्याचा धंदा चांगलासा चालत नव्हता. मुलानें मुंबईहून पैसे पाठवावे त्यावेळीं कुटुंबाचा चरितार्थ चालवावा, अशी त्याची गृहस्थिति होती.

जसजसे जास्त दिवस जाऊं लागले तसतशी जास्त रक्कम मुंबईहून येण्या-ऐवजीं अधिकाधिक घटूं लागलीं. ठकीच्या सासऱ्याला संशय आला, आणि मुंबईला जाऊन मुलाची परिस्थिती त्यानें प्रत्यक्ष पाहिली. तपास करतां त्याला असें आढळून आलें कीं त्याला पगार चांगला मिळत असूनही तो उधळमाधळ करित होता. बिन्हाड करणें त्याला अशक्य नव्हतें. सर्व प्रकारचीं व्यसनें स्वीकारून तो बसला होता.

ठकीच्या सासऱ्यानें पोक्त विचार केला आणि ठकीला मुंबईला नेऊन त्याच्या हवालीं केलें.

आतां बिन्हाड केल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. पण ठकीचे फार हाल होऊं लागले. रोज संध्याकाळीं दारू पिऊन तो तिला मार देत असे. ठकी अगदीं वैतागून गेली. याच सुमाराला केव्हांतरी मी जाऊन तिचा तपास केल्याचा पत्ता लागल्यामुळें त्यानें त्याच दिवशीं बिन्हाड बदललें. या त्याच्या अकारण दुष्टपणामुळें ठकीला चीड आली. तीही त्याच्याशीं बेमुर्वतीनें वागूं लागली.

या यातनेच्या काळांत तिला एक मात्र सौख्य मिळत होतें. तें वाचनाचें. तिचा नवरा ज्या छापखान्यांत काम करीत होता, तो छापखाना फार प्रख्यात होता. त्यांतील पुस्तकें तो घरीं आणून टाकीत असे. तो जीं हीं पुस्तकें आणीत असे, तीं ठकीला वाचनाची आवड होती म्हणून नव्हे—तो तीं आणून चोरून विकीत असे. दारूच्या व्यसनापायीं नेहमींच पैशांची तंगी असे, म्हणूनच तो या चोऱ्या करीत असे.

पण त्यामुळें ठकीची वाचनाची सोय झाली होती. किती पुस्तकें चोरून आणलीं याचा काटेकोर हिशोब न ठेविल्यामुळें ठकीनें दृष्टीआड केलेल्या एकाद-दुसऱ्या पुस्तकाचा त्याला पत्ता लागत नसे.

एके दिवशीं या चोऱ्या उघडकीस आल्या. पुस्तकाबरोबरच छापखान्यांतील लोकांच्या खिशांतील पैशाचीं पाकिटें आणि घड्याळें चोरल्याचें शाबीत झालें आणि या गुन्ह्याबद्दल त्याला एक वर्षाची शिक्षा झाली.

ठकी पुनः माहेरीं आली. तिला सासरीं जातां आलें असतें. पण तिच्या पुढील बेताला तें विघातक झालें असतें ! माहेरीं आल्यावेळीं ती नागू तेल्याला त्याच्या धंद्यांत मदत करूं लागली.

कसेंबसें वर्ष निघून गेलें. तुरुंगांतून सुटून येतांच तिचा कबजा घेण्यासाठीं तो स्वतः आला. ठकीनें मनाचा निर्धार केला होता.

वकिलाची सल्ला घेण्यांत आली, नोटिस दिली, आणि ठकीनें काडीमोड मिळविली.

नागू तेल्याचा धंदाही दिवसेंदिवस बसत चालला होता. त्याच्या वृद्धापकाळीं आपल्या पोषणाचा भार त्याच्यावर टाकणें ठकीला दुःसह झालें होतें. स्वतःचा उदरनिर्वाह स्वतः करण्याइतकें साधन ठकीपाशीं नव्हतें. तिनें पूर्ण विचार करून पाहिलें. पुनः लग्न करण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता.

पण या लग्नाच्यावेळीं मात्र चांगला मागला पुढला विचार केल्याशिवाय खोल्यांत पडायचें नाहीं, असें तिनें ठरविलें.

तिच्या जातीच्या दृष्टीनें त्यांत कांहींच वावगें नव्हतें. ती ' गंधर्वांचा नवरा ' करणार आहे असें कळतांच तिला मागण्या येऊं लागल्या. त्यांतून मुंबईतल्या परिचित झालेल्या एका विधुर कंपौंडरची मागणी तिनें स्वीकारली. त्याचें नांव सोनबा राहाटे असें होतें. पुरेसें शिक्षण न मिळाल्यामुळें त्यानें कंपौंडरची नोकरी जरी पत्करलेली होती, तरी ग्रँडले नाइटस्कूलमध्यें जाऊन तो मॅट्रिकचा अभ्यास करीत होता. ठकीचें आणि त्याचें लग्न झालें त्याचवर्षी तो मॅट्रिकची परीक्षा पास झाला. त्यानंतर त्यानें मेडिकल कॉलेजांत प्रवेश केला. जात्याच त्याला शिक्षणाची आवड असल्यामुळें त्यानें ठकीलाही शाळेंत घातलें. शिकवण्या पत्करून तो कसाबसा चरितार्थ चालवीत असे. उच्च महत्वाकांक्षेसाठीं चाललेल्या त्याच्या या धडाडीमुळें ठकीला त्याच्याबद्दल अभिमान उत्पन्न झाला होता. त्या अभिमानाच्या आधारावर तिनें सर्व प्रकारचे सांपत्तिक क्लेश सहन केले.

सांसारिक दृष्टीनें हा तिचा काल जरी मोठा अडचणीचा गेला तरी एकमेकांची मतें जुळत असल्यामुळें आणि प्रतिकूल परिस्थितींत झगडण्याची उभयतांची तयारी असल्यामुळें तीं सांसारिक दुःखें त्यांच्या समाधानाआड आलीं नाहींत.

क्रमाक्रमानें परीक्षा देत तो एल्. एम्. ॲन्ड एस्. झाला. त्याच सुमाराला

व्हर्नाक्युलर फायनलची परीक्षा देऊन ठकीही रात्रींच्या इंग्रजी शाळेंत जाऊं लागली होती. दिवसा तिनें मास्तरणीची नोकरी पत्करली होती. सोनबानेंही एका डॉक्टरच्या हाताखालीं पगारी मदतनीस या नात्यानें धंद्याला सुरवात केली होती.

या दगदगीच्या काळांत ठकीला घरीं फारच थोडा वेळ मिळत असे म्हणून तिनें आपल्या बिऱ्हाडांत चुलीला रजा दिली होती. त्यांच्या शेजारच्या खोलींत राहणाऱ्या एका गरीब मराठ्याकडे त्यांनीं जेवणाची व्यवस्था केली होती. पांढर-पेशे लोकांत अशा प्रकारची व्यवस्था होऊं शकत नाहीं. पण बोर्डर्स घेण्याची ही परदेशांतील चाल मुंबईंतील खालच्या वर्गाचे समजले जाणाऱ्या लोकांत सरसहा आहे. त्यामुळें या लोकांच्या वस्तींतून मुंबईत खाणावळी क्वचित्‌च दिसून येतात. असें ' जेवणकरी ' घेतल्यामुळें उभयपक्षांची सोय होते. अशा व्यवस्थेंत जेव-णाचा दर खाणावळींतील जेवणाच्या दरापेक्षां कितीतरी पटीनें कमी पडतो. चार सहा माणसांच्या जेवणांत एकाददुसऱ्या जेवणकऱ्याचें जेवण सहज निभावून जातें. त्यामुळें मिळालेली जेवणावळ खाणावळीच्या मानानें कमी असली, तरी कुटुंबांत-ल्या पारिवारीक हिशोबामुळें पन्नास टक्के पर्यंत फायद्यांत पडते.

ज्या कुटुंबांत ठकी नवऱ्यासह जेवायला असे त्या कुटुंबातली माणसेंही मोठीं सच्छील होतीं. आणि या उभयतांवर त्या सर्वांचें फार प्रेम होतें. सोनबा डॉक्टर असल्यामुळें दुखण्याबाहण्याच्या वेळीं त्याचा फार उपयोग होत असे. मुंबईच्या राहाटीप्रमाणें तोही एक मोठा फायदा होता. शिवाय फावल्या वेळीं ठकी त्यांच्या मुलांना शिकवीत असे. घरीं मास्तर ठेवण्याचें श्रीमंती भाग्य ठकीच्या कृपेनें लाभलें, असे कृतज्ञतापूर्वक उद्गार ती मंडळी वारंवार काढीत.

इंग्रजी तीन चार इयत्ता झाल्यावर मॅट्रिकचा नाद सोडून ठकीनें नर्सिंग कोर्स पत्करला. दोन वर्षांपूर्वी ती नर्सची परीक्षा पास झाली होती.

सोनबानेंही स्वतःचा दवाखाना सुरू करण्याचा प्रयत्न करून पाहिला पण भांडवलाचें जमेना. त्यावेळीं आजच्यासारखीं जिकडे तिकडे केमिस्टचीं दुकानें नसल्यामुळें डॉक्टरलाच 'डिस्पेन्सिंग' चें खातें ठेवावें लागे. तें ठेवण्याइतका पैसा हाताशीं नसल्यामुळें दुसऱ्याच्या दवाखान्यांत त्याला नोकर या नात्यानें राहणें भाग आलें होतें. त्याच्या महत्वाकांक्षी वृत्तीला तें रुचेना. म्हणून चांगल्या

भरभक्कम पगाराची नोकरी झांजीबार येथें मिळाल्यामुळें ठकीला नर्सची नोकरी लागतांच तो तिकडे निघून गेला होता.

त्याच मराठ्याच्या कुटुंबांत ठकी अजूनपर्यंत राहात होती

पहिल्या लग्नाचा काल यातनेंत आणि बिटंबनेंत गेला. त्याच्या हातून मिळ-णाऱ्या माराच्या प्रसादामुळें तिची लहानपणची धडधाकट प्रकृति खालावली गेली होती. पुढें त्याला शिक्षा झाल्यावर काडीमोड करून घेण्याच्या प्रकरणांत तिला मानसिक त्रास फार झाला. तिच्या परिस्थितींतल्या इतर कुठल्याही तेल्याच्या मुलीला असा मानसिक त्रास झाला नसता. पांढरपेशे लोकांच्या सहवासानें तिचें मन हळवें झालें होतें. तिच्या बापाची गृहस्थिती जर सुखासमाधानाची असती तर तिनें 'गंधर्वाचा नवरा' केलाही नसता, इतकी तिची वृत्ति पांढरपेशी बनत चालली होती.

पण परिस्थितीमुळें हा तिचा उसना पांढरपेशेपणा निघून गेला. जातींतील रूढीमुळें जी सवलत कायदेशीर रीतीनें आयतीच मिळूं शकत आहे तिचा फायदा कां घेऊं नये, असें तिला वाटलें. पांढरपेशेपणाच्या खोट्या अभिमाना-मुळें उच्चवर्णीयांतील कितीतरी विवाहित बायकांचे अकारण हाल होत असल्याचें जेव्हां तिला दिसून आलें, तेव्हां शूद्र कुळांत जन्म लाभल्याचा तिला एका प्रकारें अभिमान वाटला.

आणि म्हणूनच त्या शूद्र रूढींचा फायदा घेऊन तिनें पुनः लग्न केलें. तें लग्न सुखाचें झालें खरें; पण सांपत्तिक दुःस्थितीमुळें पहिले पहिले दिवस फार कष्टांत काढावे लागले. पहिल्या नवऱ्यानें एके दिवशीं तिला मार दिल्यावेळीं तिच्या गर्भाशयाला कांहींतरी इजा झाली होती, त्यामुळें तिला वारंवार पोटांत वेदना होत असत.

त्यासाठीं ऑपरेशन करावें लागलें. त्या ऑपरेशनमुळें तिचें दुखणें बरें झालें; पण सर्वसाधारण प्रकृति दुबळी झाली.

त्या दुबळ्या प्रकृतींतच तिनें अभ्यासावर झोड घेतली. मनाच्या उल्हासामुळें तिची मुद्रा जरी सतेज दिसत असे, तरी तिच्या देहांत पुरेसें त्राण नव्हतें. काबाड-कष्ट करावे न लागल्यामुळें तिचा बांधा पांढरपेशांच्या वळणावर गेला होता. पण नर्सचा कोर्स घेतल्यापासून तिला जे शारीरिक क्लेश काढावे लागले, त्यामुळें

तिच्या अंगीं काटकपणा आला होता. नर्सची परीक्षा पास झाल्यावर उभयतां सुखानें संसार थाटून राहूं, असे बेत तिनें आखून ठेविले होते. पण सोनबाला झांजीबारला जावें लागल्यामुळें ते बेत तिथल्या तिथेंच राहिले.

झांजीबारला जाऊन निर्वाह करण्याइतकी त्यांची परिस्थिती नव्हती. चार-दोन वर्षांत तशी वेळ येईल अशी त्या उभयतांनाही आशा होती. पण आज मात्र तिला दुसऱ्याच्या घरीं एकलकोंडें जीवन कंठण्याखेरीज गत्यंतर राहिलें नव्हतें.

सर्व बाजूंनीं सर्व गोष्टींचा विचार करतां तिचें आयुष्य दुःखमय झालें, असेंच ह्मणणें भाग होतें. पहिलें लग्न तर क्लेशाचेंच झालें—दुसऱ्या लग्नांत सुख झालें, पण परिस्थितीमुळें समाधान मिळालें नाहीं. अतएव तिचें आयुष्य सुखासमाधानाचें झालें नाहीं.

मी माझी हकीकत ठकीला सांगितली. आईचा मृत्यु आणि दादाची उपेक्षा याखेरिज माझ्या आयुष्यांत दुसरा कोणताच दुःखाचा भाग नव्हता. माझें लग्न समाधानाचें झालें होतें. माझ्या लग्नामुळें मला स्वतःला असा कांहींच त्रास झाला नव्हता. नानाला स्वार्थत्याग करावा लागला, घरदार आप्तस्वकीय सोडावे लागले, ते माझ्या लग्नामुळेंच, हें जरी खरें होतें, तरी त्याची आंच मला स्वतःला कांहींच नव्हती. अतएव माझा संसार सुखाचा होता आणि समाधानाचाही होता.

दोघांच्या चरित्रांचा अशाप्रकारें आम्हीं पडताळा पाहिला आणि एकंदरींत आम्हीं जगाच्या दृष्टीनें सुखी गणले जाऊं, असें ठरविलें.

मी बी. ए. झालें आहे, हें कळल्यावर ठकीनें विचारलें, "कशासाठीं तूं बी. ए. झालीस ?"

उत्तर देण्याची मला खरोखरच पंचाईत पडली. मी स्पष्टपणें तसें तिला सांगितलें. मी म्हटलें, "खरोखरच या गोष्टीचा मी विचार केला नाहीं. बाप श्रीमंत आणि अधिकारी असल्यामुळं मी शाळेंत जात होतें. आईचं त्या कामीं उत्तेजन होतं. क्रमाक्रमानं मी परीक्षा पास होत गेलें आणि मॅट्रिक झालें. संस्कृतची स्कॉलरशिप मिळाली, त्यामुळें कॉलेजांत जायला उत्तेजन मिळालं. स्कॉलरशिप मिळाली नसती तरी मी कॉलेजांत गेलें असतें. स्कॉलरशिप मिळाल्यानं कॉलेजांत जायला एकप्रकारचा दुजोरा मिळाला, एवढेंच. परिस्थितीची अनुकूलता होती म्हणूनच मी बी. ए. पर्यंत मजल मारली. एम्. ए. च्या अभ्यासाला लागलें ती तरी

नुसत्या क्रमामुळेंच. आई गेली, मी निराधार झालें आणि ती निराधार स्थिति मला जाणवूं लागली, त्यामुळेंच मी लग्नाच्या मोहाला बळी पडलें. लग्न झाल्या-नंतर एम्. ए. होण्याची कल्पना अंधुक होऊं लागली. परीक्षा देण्याचा उत्साह सांसारिक सुखाच्या जाणिवेनं हळु हळू मावळत चालला. दांपत्यसुखांत मी गुर-फटून गेलें. आयुष्याला कांहीं तरी ध्येय असतं याची विस्मृति झाली. मी परीक्षा कां दिली याचा अजून माझा मलाच उलगडा होत नाहीं. पुरुषांशीं स्पर्धा कर-ण्यापलिकडे त्यांत दुसरा मोठासा कांहीं हेतू होता, असं या क्षणीं मला वाटत नाहीं. त्या वेळीं तो नुसता एक कैफ होता—त्या कैफाच्या भरांत मी नुसत्या परीक्षा देत सुटलें होतें. बी. ए. होऊन पुढं काय करायचं हें कांहींच ठरलं नव्हतं—त्याचा विचार केला नव्हता. तुझं तसं नाहीं. मास्तरणीचा धंदा पत्करण्यासाठीं तूं व्हर्नाक्युलर फायनलची परीक्षा दिलीस. इंग्रजी शिक्षण घेण्यासाठीं तूं मास्तर-णीचा धंदा पत्करलास. नर्सिंगचा कोर्स घेण्यासाठीं तूं इंग्रजी शिक्षण घेतलंस आणि स्वतःचा उदर निर्वाह करण्यासाठीं तूं नर्सिंगचा कोर्स घेतलास. तुझ्या शिक्षणाच्या कार्यक्रमाला कांहीं तरी ध्येय होतं. मी नुसती अनुकूलता होती म्हणून शिक्षण घेतलं. आतां तुझ्या प्रश्नामुळं हें माझ्या ध्यानीं येत आहे. त्यावेळीं मी नुसती मोकाट परीक्षा देत होतें, एवढंच. लग्न झाल्यानंतर तर ध्येयाचा कांहीं विचार ध्यानीं मनीं सुद्धां राहिला नाहीं. आतां मला वाटूं लागतं, कीं त्या वेळीं सुखाचं वाटणारं तें जिणं मरतुकडं होतं. आणि आतां तर ही मी आई झालें—"

माझ्या आईपणाची आठवण देण्याकरतां कीं काय, मुलगी पाळण्यांत रडूं लागली. ठकीनें चटकन उठून दुधाची बाटली तिच्या तोंडाला लावली.

विचाराची सांखळी सुटली आणि त्यामुळेंच आमच्या चर्चेची बैठक विसकटली. बोलण्याचा प्रयत्न केला तरी प्रश्नच सुचेना. ठकीही गंभीर झाली होती.

इतक्यांत डॉक्टरनीं हांक मारल्यामुळें ती निघून गेली. मी पाळण्यांतील मुलीकडे पहात बसलें. तिच्याकडे पहात असतांना माझा प्राण डोळ्यांत आला होता. चटकन उचलून हृदयाशीं कवटाळून तिचे पटापट मुके घ्यावे, असें मला वाटत होतें.

पण अजून मला तिला धड सांवरताही येत नव्हतें. मला शिरीनची आठवण झाली. आईबरोबर भांडून ती माझ्याकडे आली होती. आईचा तिला राग

आला होता. पण त्या रागाच्या भरांत मातृप्रेमाचा जिव्हाळा उत्पन्न होऊन ती पुनः आईला भेटायला गेली आणि समेट करून आली.

माझ्या आईचीही मला आठवण झाली. मी अशीच पाळण्यांत असेन आणि तीही अशीच माझ्याकडे केव्हांतरी पाहात राहिली तर नसेल ?

आईचा सर्व उपदेश आठवूं लागला. चिपळूणला तिनें दिलेला मार, त्यानंतर केलेली समजूत, ठकीची मागितलेली क्षमा—त्या चिमुकल्या जीवाच्या दर्शनानें—या साऱ्या गोष्टी कल्पनेच्या तंद्रेत प्रत्यक्ष होऊं लागल्या.

इतक्यांत दरवाजा उघडून एक नर्स आंत आली आणि " तुमच्या नर्सनीं सांगितलं आहे—" असें म्हणून आ पसरून तशीच थांबली.

मला ही ओळखीची चुणूक लागली.

तिच्यांत फारच फरक झाला होता. ठकीइतक्या लवकर मी तिला ओळखलें नाहीं. नुसती मनोमन साक्ष पटली.

त्या साक्षीच्या अंदाजानें मी उद्गारलें " कोण ? बने ? " ती नुसती माझ्याकडे टक लावून पाहूं लागली.

मला वाटलें, मी चुकलें तर नाहीं ?

## प्रकरण २४ वें

# सिंहावलोकन–पुढें चालू



थोड्या वेळानें कां होईना पण एकमेकींना ओळख पटली. हा एक विलक्षण योगायोग होता.

पुनः एकमेकींच्या चौकशीला सुरवात झाली, इतक्यांत ठकीही आंत आली. बनीचें नांव आणि आडनांव सासरचें असल्यामुळें मी जेव्हां तिची माझ्या हिशेबानें ठकीशीं ओळख करून दिली, त्यावेळीं आम्हां सर्वांनाच गम्मत वाटली. एक चिपळूणची मैत्रिण व एक चिपळूण ते रत्नागिरीची मैत्रिण इतक्या अनपेक्षित रीतीनें एकाच जागीं भेटतील हें सांगून सुद्धां मला खरें वाटलें नसतें. स्त्री जीवनांतील एका क्रांतिकारक प्रसंगामुळें माझ्या या मैत्रिणी एकाच जागीं भेटल्या, याचें राहून राहून मला आश्चर्य वाटूं लागलें.

ज्या कारणामुळें बनीची आणि माझी अशी अचानक भेट झाली तें कारण पाळण्यांत रडत होतें, त्याला आधीं शान्त करणें अवश्य होतें.

बनीची हकीकत ऐकण्यासाठीं मी अगदीं उतावीळ झालें होतें. ठकीची हकीकत ऐकल्यामुळें आतांच आणखी एक पुराण ऐकण्याइतकी सवलत घ्यायला मला हरकत नव्हती.

या होममधील बहुतेक नर्सिस विधवा होत्या. एक ठकी सधवा होती—पण तिच्या सधवापणांत लग्नाच्या द्विरुक्तीमुळें वैधव्याचा एक अस्पष्ट डाग लागून गेला होता.

पण गोडबोल्यांची बनी मात्र विधवा असलेली सधवा होती. तिचें सासरचें नांव माझ्या किंवा ठकीच्या परिचयाचें नसल्यामुळें हा सगळा समजुतीचा घोटाळा झाला होता.

खरें पाहिलें तर ही चूक बनीची होती. इतके दिवस एका ठिकाणीं काम करीत असतां तिनें ठकीला आपली ओळख दिली नाहीं, याचें मलाही आश्चर्य वाटलें. खरोखरच तिच्या स्वरूपांत विलक्षण फरक झाला होता. चिपळूण सोडून

ती रत्नागिरीस आली, त्यावेळीं जर पुनः मी तिला पाहिली नसती तर मला सुद्धां तिला ओळखणें अशक्य झालें असतें.

माझ्या नजरेनें या सर्व कारणाचें मूळ एकच दिसत होतें, तें ह्मणजे नांव बदलणें. ठकीचें नांव बदललें असल्यामुळें तिला बनीनें ओळखलें नाहीं आणि बनीचें नांव बदललें असल्यामुळें तिला ठकीनें ओळखलें नाहीं. एका जागीं वाढलेल्या–खेळलेल्या आह्मी, चिपळूण सोडतांना एका जागीं रडलेल्या आह्मीं, पण कांहीं वर्षांनीं एका जागीं येतांच एकमेकांना ओळखूं सुद्धां शकलों नाहीं. एक नांव बदलण्यानें केवढा हा अनर्थ होत होता !

फक्त मी नांव बदललें नव्हतें ह्मणुन या ओळखी पटल्या असा अभिमानाचा वाटा माझ्याकडे घेतला तर फारसा चुकीचा होणार नाहीं. गफलतीनें नानानें माझें आडनांव बदललें होतें. पण माझें पाळण्यातलें नांव शाबूत होतें ह्मणून तरी एवढा पत्ता लागला.

आमच्या एकमेकींच्या भेटीला बारावर्षे उलटून गेलीं होतीं. बारा वर्षे भेट न झालेल्या बहिणी–बहिणी किंवा भाऊ–बहिणी यांनीं एकमेकांची भेट घ्यायची तर ती कुठल्या तरी देवळांत देवाच्या साक्षीनें घ्यायची असते. त्यालाही एक विधि आहे. एका परातींत तेल घालून ती परात देवाच्या गाभाऱ्यासमोर ठेवण्यांत येते. त्या परातीच्या बरोबर मध्यावर लग्नांतील अंतरपाटाप्रमाणें एक पडदा धरण्यांत येतो. भेट घेणारीं बहीणभावंडे, बहिणी–बहिणी किंवा भाऊ–भाऊ हीं दोन पडद्याच्या निरनिराळ्या बाजूनें येऊन उभीं राहातात. नंतर उपाध्येबुवा कुठलातरी एकादा बनावट संकल्प सांगतात. तो संकल्प सांगून झाल्यावर दोघेही दोन बाजूनें परातींतील तेलांत ( कुठें कुठें नुसतें पिंजरीचें पाणी टाकण्याचाही प्रघात आहे ) पाहूं लागतात आणि अशा रीतीनें तेलांतील प्रतिबिंबाच्या रूपानें एकमेकांचें दर्शन घडल्यावर पडदा दूर सारण्यांत येतो आणि प्रत्यक्ष भेट होते. विशेष महत्वाची गोष्ट ह्मणजे ही, कीं ती परात तेलासकट त्या उपाध्येबुवाला दान करण्यांत येते. अजूनही कुठें कुठें हा प्रघात पाळण्यांत येतो.

आह्मींही बारा वर्षांनंतर भेटत होतों, पण आमची भेट मात्र देवाच्या खऱ्या खुऱ्या देवळांत झाली. ईश्वराचा प्रत्यक्ष अवतार प्रत्यही प्रत्येक खोलींतून होणारें हें सूतिकागृहच खरें देवाचें देऊळ, असें त्या वेळीं मला वाटलें. फक्त तिथें परात

नव्हती, परातींत तेल नव्हतें आणि शेवटीं ती परात दाक्षिणेसकट लांबविणारा उपाध्येबुवाही नव्हता.

त्या रात्रीं आम्ही तिघीही बोलत बसलों. बनीची हकीकतही तितकीच विलक्षण होती. बनी मुंबईला येऊन आपल्या नवऱ्याच्या घरीं राहिल्याची हकिकत मागें आलीच आहे. ताई अर्थातच रत्नागिरीला असे.

गोडबोल्यांच्या वार्धक्याबरोबर बनी–ताईच्या सावत्र आईचें प्रस्थही वाढत जात होतें. चिपळूणला असतांना करडा अंमल चालविणारा तो गृहस्थ मेणाहून मऊ झाला होता. ती छोटी बायको जें जें सांगे तें तें त्याला खरें वाटे. बिचाऱ्या ताईचें जीवित अत्यंत कष्टमय झालें होतें. ती चांडाळीण तिच्यावर वाटेल ते आरोप करी आणि ते खरे मानून तो तिला पदोपदीं बडवीत असे.

होतां होतां या आरोपांची परमावधी झाली. एके दिवशीं तिनें ताईवर एक इतका किळसवाणा आरोप केला, कीं ताईसारखी मेणाची पुतळीसुद्धां दगडापेक्षां कठोर होऊन उसळून उठली. त्या चांडाळणीला ताई घरांत राहायला नको होती. जो आरोप तिनें ताईवर केला होता, त्याच आरोपाला, ताई घरांत नसती तर, तीच पात्र झाली असती–किंबहुना ताई घरांतून जावी आणि आपल्याला दाही दिशा मोकळ्या व्हाव्या, अशीच त्या लावसटीची इच्छा होती.

ताई उसळून उठली आणि ही परिस्थिति तिनें बापासमोर प्रत्यक्ष बोलून दाखविली–पुढें अनर्थ झाला तो याच एका गोष्टीमुळें.

बाप तर सर्वस्वी आपल्या छोट्या बायकोच्या आहारीं गेला होता. ताई-बनीला प्रत्यक्ष दिसून येत होतें, कीं बापाला आपलें व्यंग कळत होतें. त्याची नजर जसजशी स्मशानाकडे वळत होती तसतसें तिचें तारुण्य आपला प्रभाव दाखवीत होतें. पड खाल्ल्याखेरीज त्या म्हाताऱ्याला गत्यंतर नव्हतें. झांकली मूठ सव्वा लाखाची ठेवण्यासाठीं तो बायकोच्या मुठींत गेला होता आणि तिची मर्जी कायम राखण्यासाठीं पोटच्या गोळ्याची विटंबना करीत होता.

ताईच्या उलट उत्तरानें हें प्रकरण विकोपाला गेलें. तरण्या बायकोच्या भीतीनें तो म्हातारा निर्बुद्ध झाला होता. पटो वा न पटो, ती म्हणेल तें तो ग्राह्य धरून चालत असे.

तिचा शब्द त्याला वेदवाक्यासारखा झाला होता. तिनें ताईवर आरोप

केला होता. ताईनें त्या आरोपाची माळ उलटी तिच्या गळ्यांत टाकली होती. चिडलेली गाय वाघावर शिंगें रोखून निघाली होती. वाघ तिला खाणार हें ठरलेलेंच होतें. पण मरतां मरतां आपल्या शिंगाचा एक तरी फटका देऊन वाघाला जखम करावी आणि गाईनें वाघाला जखम केली—अगदीं मर्मस्थानीं जखम केली-असें सत्याच्या निराधार बळावर तिला ठरवायचें होतें.

रागाच्या आवेशांत ताईनें बापावर तोंड टाकलें, "प्रत्यक्ष मी तुमची पोटची मुलगी. माझ्यापेक्षां कितीतरी पटीनें लहान असलेली कुठली तरी एक पोर तुमची बायको म्हणून येते. नवरेपणाच्या पहिल्या अमदानींत कर्दनकाळाप्रमाणें तुम्ही तिला तरवारेच्या धारेवर धरतां आणि तीच तुमचा कर्दनकाळ होऊन बसते! याचं मला काय वाटावं? एवढीशी पोर असतांना मी विधवा झालें. पेन्शन घेण्याइतक्या म्हातारपणांत तुम्ही माझ्यापेक्षांही लहान वयाच्या पोरीशीं लग्न केलंत—मुलीशीं लग्न केलंत! हें लग्न केलंत त्याच दिवशीं तुमची बुद्धि भ्रष्ट झाली. पहिल्या पहिल्यानं करडेपणाचं तुह्मी उसनं अवसान आणलं पण अंतरां-तला दुबळेपणा शेवटीं उघडा पडला. माझी आई ठरलेली ही बेशरम पोर माझ्या-वर असला अघोरी आरोप करते आणि तो तुह्मांला खरा वाटतो, तो या तुमच्या दुबळेपणामुळें. ह्मातारपणींसुद्धां तुह्मांला बायको पाहिजे, याची जाणीव असल्या-मुळं पोरपणाच्या तारुण्यांत देखील विधवेचं कठोरव्रत आचरीत राहाणारी मी—तुमच्या पोटची मुलगी—तुह्मांला पापी वाटलें! मी पापी, तेव्हां माझीं मुलंही पापीच असणार, असं तुमच्या मनाला वाटत असल्यामुळं माझ्यावरचा आरोप तुह्मांला खरा वाटला. ह्मातारपणीं पोटच्या पोरीएवढ्या मुलीइतक्या एका पोरी-बरोबर लग्न करणारे तुह्मी पापी असाल; पण माझी आई तशी नव्हती. तुह्मी मेलां असतां तर तिनं लग्न केलं नसतं. वैधव्यांत झुरत झुरत तीही मेली असती. त्या वृत्तीची जाणीव माझ्या अंतरांत जळजळते आहे. पण ही चांडाळीण आल्या-पासून त्या माऊलीची आठवण तुह्मांला राहिली नाहीं. ह्मणूनच तुमचं मन असं अघोरी झालं—"

ताई अशा रीतीनें सारखी बोलत सुटली होती. जन्मभर तिनें तोंडाला कुलूप घातलें होतें. पण एकदां तोंड उघडतांच अंतरांतला सारा खळमळ तिनें एका-दमांत ओकून टाकला.

त्याचा परिणाम मात्र भयंकर झाला. तिच्या बापाच्या पापी मनाला तिच्यावरील पापाचा आरोप त्यामुळेंच खरा वाटला. शेजारपाजारच्या चारचौघांसमोर उघड उघड तिची विटंबना होण्याइतक्या उघड्या भाषेंत बोलून त्यानें तिला घराबाहेर घातलें.

रागाच्या भिरभिरींत तिनें विहिरींत उडी टाकून जीव दिला.

ही हकीकत मुंबईला कळतांच बनी रत्नागिरीला धांवतच गेली. गेल्यानंतर तिला आपण केलेल्या मूर्खपणाची कल्पना आली. ताई हा लोक सोडून गेली होती. रत्नागिरीला जाऊन तिची भेट होणार नव्हती. मग ती तिथें गेली कुणासाठीं ? सावत्र आईच्या सांत्वनासाठीं तर खास नव्हे !

घरांत पाऊल टाकतांच तिला पहिला धक्का मिळाला. गांवच्या लोकांच्या छळणुकींनें कातावलेल्या त्या बुद्धिभ्रष्ट झालेल्या बापानें तिला घराची पायरी चढूं दिली नाहीं. तिचा नवरा बरोबर आला होता. दोघेंही शेजाऱ्याच्या घरीं राहिलीं.

साऱ्या कुळकथा तिच्या नवऱ्याच्या कानीं गेल्या. ती बरोबर असतांना त्याला गोडबोल्यांचें घर वर्ज झालें होतें खरें; पण तिच्या सावत्र आईनें त्याला एकट्याला मोठ्या युक्तीनें बोलावून नेलें. ताईवरच्या आरोपांचा खोटानाटा सर्व पाढा त्यानें ऐकला. बनीविषयीं त्याचा मनांत संशय उत्पन्न होईल अशा प्रकारच्या तिच्या माहेरवासावेळच्या बनावट हकिकती त्या चांडाळणीनें त्याला सांगितल्या.

तें वातावरणच असें चमत्कारिक झालें होतें. विधवेवरचे आरोप कुणालाही खरे वाटतात. शेजारणीपाजारणींनीं सुद्धां ताईची तरफदारी केली नाहीं.

या सर्व गोष्टींचा त्याच्या मनावर परिणाम झाला. बनीला परक्यांच्या घरीं टाकून तो मुंबईला निघून गेला.

बनीचे डोळे एकदम पांढरे झाले. तिला आभाळ कोसळल्यासारखें झालें होतें. ज्या शेजाऱ्याच्या घरीं ती राहिली होती त्यांना बनीच्या नवऱ्यानें जातांना सांगितलें होतें, " मी जातों आहें तो कायमचा जातों आहें. यापुढं हिचं तोंड पाहाण्याची माझी इच्छा नाहीं. ही देखील त्या बहिणीसारखीच निघायची. प्रत्यक्ष तिचे आईबाप सांगतात, कीं सात महिने गेले म्हणून तिनें जीव दिला. शेजाऱ्यापाजाऱ्यांनासुद्धां संशय आहे. स्वतःच्या अब्रूसाठीं बापानं प्रेताची तपासणी करूं

दिली नाहीं. खुद्द त्यानंच मला असं शपथेवर सांगितलं. तिला बजावून सांगा की मुंबईला आली तर तिला मी घरांत घेणार नाहीं."

बनी आश्चर्यचकित झाली. प्रत्यक्ष बापसुद्धां इतक्या उलट्या काळजाचा ना ! ती ज्यांच्या घरीं राहिली होती, तेवढीच एक बाई काय ती ताईची तरफदारी करीत होती. हें भांडण झालें त्यावेळीं ती प्रत्यक्ष हजर होती. ताईनें बापाला दिलेलें उत्तर तिनेंच बनीला सांगितलें होतें. ताईच्या वर्तनाबद्दल तिनें बनीला ग्वाही दिली. पण सारींच माणसें जिथें उलटलीं होतीं तिथें एकाद्या सालस बाईच्या मताला कोण विचारतो ? तिनें विरोध केला तर लोक म्हणत असत, "अगदीं भोळी आहे बिचारी. जगांत कुठं कांहीं वाईट आहे असं तिला वाटतच नाहीं. जीव कुणाला नको का झालेला असतो ! उगीच का कुणी जीव देईल ? बाप का कधीं राग भरत नव्हता ? तें तर नित्याचंच चाललं होतं. आपल्या मुलीची मुद्दाम बदनामी करावी असं कां कुणाला वाटेल ? तिचा स्वभावच फार साधा !"

लोकांचे हे उद्गार ऐकले कीं त्या बिचारीच्या जिवाचा तिळपापड होत असे. तिनें जितकें जीव तोडून सांगावें, तितकेंच लोकांनीं तिच्या चांगुलपणाचा आधार घेऊन तिला खोडून काढावें ! आपल्या नावाजलेल्या चांगुलपणापायीं एका अभागी जीवाची निष्कारण बदनामी होते आहे, हें दिसून येतांच तिला आपल्या चांगुलपणाचाही राग येऊं लागे.

बनी आणि ती गळ्यांत गळा घालून रडलीं. पुढें काय करावें हें कुणालाच कांहीं सुचेना.

काय वाटेल तें करून एकदां सासरीं जाण्याचा तिनें निश्चय केला. शेजारणीनें तिला बोटीच्या तिकिटापुरते पैसे दिले.

मुंबईला जाणारी बोट त्यावेळीं रत्नागिरीहून दोनप्रहरीं निघत असे. ती बंदरावर आली. तिकिट काढण्यासाठीं ती तिकिट ऑफिसाजवळ गेली. पण काय करावें हें तिला सुचेना. गर्दीतून तिकिटाच्या दरवाजाजवळ जाण्याची छाती होईना. व्हरांड्याजवळ तीन वेळ जाऊन ती मागें परतली.

जवळच कांहीं सभ्य गृहस्थांचा घोळका उभा होता. रत्नागिरींतील रावसाहेब असलेले एक प्रतिष्ठित वकिल त्या घोळक्यांत होते. त्यांच्याबरोबर एक अवाढव्य देहाची ठेंगणी व्यक्ति बोलत उभी राहिली होती.

इतर कुणीं तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं, तरी तिच्या हालचालीवर त्या अवाढव्य गृहस्थाचें लक्ष आहे असें तिला जाणवलें. रत्नागिरींतील इतर गृहस्थांपेक्षां

त्यांचा पोषाख अगदींच निराळा होता. त्यांच्या अंगांत गुडघ्यापर्यंत पोंचणारा रेशमाचा लांब सदरा होता. त्यावर गळ्यांतून टाकलेला घड्याळाचा लांब काळा रेशमी छेडा रुळत होता. त्यांच्या अंगांत कोट नव्हता आणि डोक्याला टोपी किंवा रुमालही नव्हता. त्या काळीं विचित्र वाटणाऱ्या त्या पोषाखामुळें सर्वांचीच नजर त्यांच्याकडे लागली होती.

वकील त्यांच्याशीं बोलत होते पण त्यांची नजर बनीवर होती. बनीलाही तें जाणवलें. बोलत असतांना मध्येंच थांबून ते 'थांबा अं रावसाहेब' असें ह्मणून बनीजवळ आले आणि ह्मणाले, "मुली तुला तिकीट काढायचं आहे का?"

त्यांच्या वाणींत मूर्तिमंत प्रेमळपणा होता. शब्द पुरुषाचा पण भाषा 'आई'ची होती. पहिल्यानें बनीला संकोच वाटला, पण ते पुनः पुन्हा विचारूं लागले, त्या वेळीं तिनें मानेनेंच होय ह्मटलें. पदराच्या गांठीचे पैसे काढून ती देऊं लागली, त्यावेळीं त्यांनीं ह्मटलें, "तूं कुठं जाणार आहेस? मुंबईलाच का? तुझ्याबरोबर कुणी नाहीं का? मीही मुंबईलाच जातों आहें."

त्यांची ती जिव्हाळ्याची भाषा ऐकून बनीला एकदम रडूं कोसळलें. बनीची पदराची पैशांची गांठ सुटण्यापूर्वींच तें निघून गेले होते.

त्यांनीं तिकीट आणून तिच्या हातीं दिलें आणि ती पैसे देऊं लागली, त्या वेळीं ह्मटलें, "आतां बरोबरच आहेस—मग हिशेब करूं सावकाश."

पडाव सुटण्याची वेळ झाली होती. लोकांची धांदल उडाली होती. ती पाहून बनी कावरी बावरी झाली. ते लठ्ठ गृहस्थ पुनः वकिलांबरोबर बोलत होते. त्यांचें तिच्याकडे लक्ष गेलें. ते ह्मणाले, "जाऊं देत त्या लोकांना, आपल्याला घाई नाहीं. आपण छबिन्यांतून जाऊं. पडाव जातील आधीं. तें तुझं पाकिट माझ्या ट्रंकेवर ठेव. एकलंस पोरी? कांहीं काळजी करूं नकोस. मी बरोबर आहें."

बनीला एक प्रकारें धीर आला. तरीही तिच्या मनांत कालवाकालव चालली होती. सारे उतारू निघून गेले होते. ती मात्र एकटीच राहिली होती.

एकाएकीं तिला भीति वाटूं लागली. कुठला कुणी विचित्र माणूस आपल्याला सोबत करतों ह्मणून ह्मणतो काय आणि आपण मुकाट्यानें त्याच्याबरोबर जायला तयार होतों काय, असें तिला वाटलें. कुणी लुच्चा लफंगा तर नसेल ना हा, असा तिला संशय आला.

वकीलसाहेब बोलत होते, "ही मोठी वाईट खोड तुमची विनायकराव. अशानं एकादे दिवशीं चांगलेच पेचांत साल."

ते हंसत हंसत म्हणाले, " पेचांत आलेल्या माणसाला सोडवतांना स्वतः पेचांत यावं लागलं, तर त्याला काय करणार ! पण या पूर्वी तसं झालं नाहीं आणि पुढं होणार नाहीं. देव इतका का निष्ठुर आहे ?"

छबिन्याची वेळ झाली. विचार करायला अवकाशच नव्हता. बनी मुकाट्यानें त्यांच्याबरोबर निघाली. पुनः पुन्हां तिच्या मनांत शंका येत होती. पण त्या गृहस्थाचें वर्तन इतक्या मोकळेपणाचें होतें, कीं त्यामुळें तिची शंका तिला नकळत नाहींशी झाली.

बनी बापाच्या प्रेमाला आंचवलेली होती. प्रेमळ बापाचा पहिला अनुभव तिला त्या दिवशीं बोटींत मिळाला. परकेपणाचा प्रपंच तिच्या अंतःकरणांतून साफ निघून जावा, इतक्या कळकळीनें प्रत्येक बाबतींत ते तिची काळजी घेत होते. एका शब्दानेंही त्यांनीं तिची हकीकत विचारली नाहीं. जसें कांहीं सर्व माहित आहे अशा धोरणानें ते चालले होते. त्यांनीं तिच्यासाठीं आपला बिछाना पसरून दिला आणि आपण नुसती एक चादर आंथरून तिच्यावर अगदीं ऐसपैस बसले, बरोबरच्या खुजांतलें पाणी घटाघट प्याले आणि थोड्या वेळानें चादरीवर आडवे होऊन मोठमोठ्यानें घोरायला लागले.

बनी संकोचपूर्वक त्या बिछान्यावर बसुन राहिली होती. साऱ्याच गोष्टी तिला संकोचवत् वाटत होत्या. पुढल्या काळजीचा हिमालय पर्वत माथीं घेऊन ती घराबाहेर पडली होती. पण तें अजस्र ओझें इतक्या लवकर हलकें होईल, अशी तिला कल्पनाच नव्हती. तो हलकेपणाच तिला भारी वाटला ! काळजी दूर झाली असें वाटल्यामुळेंच अंतःकरणांतील काळजीचें परिमाण वाढूं लागलें.

ती सारखा विचार करीत बसली होती. त्या विचाराला कांहीं रूपरेषा नव्हती. जयगड बंदर येऊन गेलें तसे ते गृहस्थ जागे झाले आणि म्हणाले, " कांहीं खायचं आहे का ? " उत्तराची अपेक्षा न करतां करंडी उघडून त्यांनीं कांहीं आंबे बाहेर काढले आणि ते खुजांतल्या पाण्यानें धुवून त्यांच्या फांका करून त्यांनीं तिच्या पुढें ठेवल्या. त्यांनीं स्वतःही एकेक आंबा चिरून खाण्याचा सपाटा लावला. ती खात नाहीं असें पाहून ते म्हणाले, "हें पहा पोरी, खाण्याची आबाळ करूं नये. संकटें काय—येतील तशीं निघून जातील. पण तीं संकटं सहन करायला देहांत ताकद राखली पाहिजे. हं ! खायला सुरवात कर. "

अगदीं नकळत—इच्छा नसतांही—तिनं खायला सुरवात केली. त्यांनींही हात धुतले आणि तिच्याही हातावर पाणी घातलें.

त्यांनीं विचारलें, " मुंबईत कुठं जाणार आहेस ? "

बनी म्हणाली, " काय सांगूं ? तिथं घर आहे. पण दारीं गेलें तर दार बन्द होईल असं वाटतं— "

आपोआप तिचें तोंड उघडलें आणि तिनें सर्व हकीकत सांगून टाकली. त्यांनीं तिला आश्वासन दिलें. मुंबईला उतरतांच ते तिला नवऱ्याच्या खोलावर घेऊन गेले. शेवटीं व्हायचें तें झालेंच.

त्या गृहस्थांनीं बनीला आपल्या मित्राच्या घरीं नेऊन ठेविलें आणि एक दोन दिवसांतच तिची पुण्याच्या सेवासदनांत राहण्याची व्यवस्था केली.

सेवासदनांत तिनें अभ्यास चालू ठेवला. व्हर्न्याक्युलर फायनलची परीक्षा दिली आणि नर्सिंगचा कोर्स घेतला. नर्सची परीक्षा पास होईपर्यंत तिच्या भरण-पोषणाची व शिक्षणाची व्यवस्था त्या गृहस्थांनींच चालविलेली होती.

मधून मधून येऊन ते तिची चौकशी करून जात. तिचीच कां—सेवासदनां-तल्या शेंकडा पाऊणशें टक्के मुली बनीप्रमाणेंच त्यांच्या वतीनें आल्या होत्या. त्या सर्वांचीच व्यवस्था ते पहात असत. नर्सची परीक्षा पास होतांच त्यांनींच तिला या होममध्यें नोकरी लावून दिली होती.

सर्व हकीकत ऐकून झाल्यावर मी बनीला विचारलें, " कोण हा विलक्षण माणूस ? एकदां गांठ पडेल का त्यांची ?

बनी म्हणाली, " ते माझे दादा—माझेच कां—कुठल्याही अनाथ, अपंग, पतित मुलींचे ते दादा आहेत. "

मी उत्कंठेनें विचारलें, " कुठं असतात ते ?"

माझी उत्कंठा पाहून बनीलाही आनंद झाला. दादांच्या आठवणीनें तिचें हृदय भरून आलें आणि ती म्हणाली, " ते कुठं असतात हें सांगणंच मोठं कठिण आहे. त्यांना घर आहे पण ते घरीं राहात नाहींत. अनाथांच्या सेवेसाठीं लाखों रुपयांच्या इस्टेटीवर लाथ मारून ते घराबाहेर पडले आहेत. कुठं तरी राहातात, कुठं तरी जेवतात—पण एवढं मात्र खरं, कीं संकटांत सांपडलेली, दुःखानं गांज-लेली, पापाच्या वाटेवर चुकलेली देखील स्त्री असेल, तर तिला हात द्यायला ते केव्हांही, कुठंही हजर असतात. "

मी पुनः विचारलें, " कोण हा विचित्र माणूस ? काय त्याचं नांव ? "

बनी म्हणाली, " माझ्या या दादाचं नांव विनायकराव सामंत ! "

---

# प्रकरण २५ वें

# कुंकवाचें वैधव्य

दहा दिवस होतांच मी घरीं आलें. घर म्हणजे तीच पूर्वीची लहानशी खोली. मला पोंचवायला ठकी आणि बनी दोघींही आल्या होत्या. माझें तें वैभव पाहून दोघींनाही वाईट वाटलें.

मला त्याचें कांहींच वाटलें नव्हतें खरें; पण आतां या परिस्थितींत जागा अपुरी वाटूं लागली. एक लहानसा पाळणा येऊन पडला होता. एक कॉटही आली होती. आणि पूर्वीचें किरकोळ शिरकोळ सामान धरून खोलींतली जागा इतकी अडली गेली कीं आलेल्या पाहुण्याला बसायला जागा मिळाली नाहीं.

नानानें ही सर्व व्यवस्था केली होती खरी; पण मला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. पूर्वीच्या परिस्थितींत कृतज्ञताबुद्धी उत्पन्न झाली असती. पण नांव बदलल्याचा तो राग माझ्या मनांत सळसळत होता. खोलींत आल्यानंतर मी त्याच्याशीं फारशी मोकळेपणानें बोललें नाहीं. पण माझ्या प्रकृतीमानाचा तो परिणाम असावा असा त्याच्या मनानें समज करून घेतला होता.

म्हणून मी बोलूं लागलें तर तो मला बोलूं देत नसे. पुनः पुन्हां मनांतून कढ येत होता, चांगलें सणसणून बोलून घ्यावें असें वाटत होतें, पण ठकीची अनुज्ञा मोडतां येत नसे.

दुसरा दिवस उजाडला. त्या दिवशीं बारसें करण्याचा प्रश्न नानानें काढला. पण मी तो तसाच उडवून दिला. रूढी मोडण्याच्या माझ्या क्रमाला अनुसरून मी बारसें करण्याचें टाळलें असा त्याचा समज झाला असावा.

पण खरें कारण तेवढेंच नव्हतें. उद्यां कुणीतरी माझ्या या मुलीचें नांव बदलणार, मग आजच तिला कशाला नांव ठेवा असें मला वाटलें. माझें कांहींतरी नांव ठेवलें होतें म्हणून तें न बदलण्याचा हट्ट मला धरावा लागला. कांहींच नांव ठेवलें नसतें तर कशाला एवढें कुरुक्षेत्र झालें असतें ?

दिवसावर दिवस जात चालले होते. माझा सारा वेळ मुलीच्या जोपासनेंत

१२

जात होता. न्हाणें धुणें करण्यासाठीं एक मोलकरीण ठराविक वेळीं येत असे. बाकीचा सारा वेळ मलाच सर्व कांहीं पहावें लागे.

जेवणाचा डबा आणला जात होता. आणि माझ्या पुरतें जें कांहीं पथ्याचें करावयाचें तें नानाच करीत असे. ठकी बहुतेक दररोज येऊन मुलीला पाहून जात असे. मधून मधून बनीही येत असे. मुलीची प्रकृति निकोप असल्यामुळें औषध पाण्याची जरुरी लागत नव्हती. किरकोळ तान्ह्या मुलांना आवश्यक असणारीं बाळ औषधें द्यायचें काम ठकी स्वतः करीत असे. तिला ही एक नवीन करमणूक उत्पन्न झाली होती.

दिवसें दिवस तिला मुलीचा लळा जास्त लागूं लागला. नोकरीच्या बाहेरचा बहुतेक सर्व वेळ ती बहुतेक माझ्याकडेच घालवूं लागली. केव्हां केव्हां तर ती रात्रीचीही माझ्याकडेसच राहत असे. मग आम्हीं एकादा डबा जास्त मागवीत असूं. अशा वेळीं नाना आपल्या कुठल्याशा मित्राकडे जाऊन राहात असे.

पुढें पुढें हें तिचें जवळ जवळ नित्याचेंच होऊं लागलें. त्याला कारण माझाच आग्रह असे. ठकीची आवश्यकता मला फार भासत होती. नानाशीं भांडण करण्याची उकळी वारंवार मला येत होती. ठकांची तर सक्त ताकीद होती. तेव्हां अर्थातच तिला राहून घेण्यापलीकडे दुसरा उपाय नव्हता.

एका रविवारीं आम्हीं जेवून खाऊन बसलों होतों. इतक्यांत बनी आली. पहिल्यानें इकडल्या तिकडल्या गोष्टी चालल्या होत्या. पण पुढें आमचीं चरित्रें निघालीं. चरित्रांच्या अनुरोधानें चर्चेला सुरवात झाली.

मी नानाला विचारलें, “ या परिस्थितीला जबाबदार कोण ? वर्णभेदामुळं ही परिस्थिती उत्पन्न झाली आहे. ती चांगली आहे कीं वाईट आहे ? ठकी तेल्याची मुलगी. लग्न झाल्यावर तिचा नवरा तिला छळूं लागला. शेवटीं तुरुंगांत गेला. तेल्याची मुलगी होती म्हणून तिला काडीमोड करतां आली. पुनः लग्न करून ती सुखी झाली. तेंच बनीकडे पहा. बनीच्या नवऱ्याला तिचा संशय आला—निष्कारण संशय आला—पण त्याची त्या संशयाबद्दल खात्री होती. संशय आला म्हणून त्यानें तिला टाकून दिलं, दुसरं लग्न केलं आणि तो सुखी झाला. बनीला तसंच दुसरं लग्न कां करतां येऊं नये ? तिच्यावर घेतलेला आळ खोटा होता—किंबहुना कांहीं आळच नव्हता—तिच्या बहिणीवर घेतलेल्या खोट्या

आळाचा परिणाम तिला भोगावा लागला. तिला कां पुनः लग्न करतां येऊं नये ?"

नाना क्षणभर विचारांत पडला. पण लगेच हंसून ह्मणाला, "हा कायद्याचा प्रश्न आहे. पुनर्विवाहाचा कायदा झाला आहे ! ह्मणून तसं कांहीं झालं असतं तर तिला पुनर्लग्न करतां आलं असतं. पण तिचा नवरा हयात आहे–"

"हयात असला तरी तिच्या लेखीं मेल्यासारखाच आहे." मी मधेंच ह्मटलें, "त्यानं दुसरं लग्न केलं. मग हिनंच हें कुंकवाचं वैधव्य सक्तीनं कां पाळावं ?"

"हा पावित्र्याचा प्रश्न आहे !" नाना गंभीरपणें ह्मणाला, "पुरुषानं लग्न केलं—एक बायको टाकून दुसरं लग्न केलं–तरीही तिथं पावित्र्याचा प्रश्न येत नाहीं. हें बंधन स्त्रियांसाठीं आहे—"

मी ह्मटलें, "कां ?"

मला माझ्या आईची आठवण झाली. माझ्या या 'कां ?' नें ती कातावून जात असे. नानावर त्याचा काय परिणाम होतो हें त्या वेळीं मला पहायचें होतें.

"काय वेडा प्रश्न हा !" नाना ह्मणाला, "ही अगदीं सरळ सरळ गोष्ट आहे. अंतःकरणाला पटण्याजोगी आहे. इथं चर्चेचा प्रश्नच नाहीं !"

"कां नाहीं ?" मी ह्मटलें.

नाना मोठ्यानें हंसून ह्मणाला, "कांहीं तरी बोलायचं ह्मणून बोलते आहेस झालं. स्त्रियांच्या पावित्र्याचं महत्त्व ठरवायला चर्चा कशाला हवी ?"

माझी वादबुद्धि उसळून आली. मी म्हटलें, "हें सरळ उत्तर नव्हे. हा नुसता लपंडाव आहे. स्त्रियांचं पावित्र्य बनीच्या दुःखाआड येतं—ठकीला तें कां मोकळीक देतं ? पहिल्या नवऱ्याची काडीमोड करून ठकी अपवित्र झाली नाहीं का ? काय वाईट झालं तिचं ? पावित्र्याच्या खोट्या अभिमानानं त्या दारुड्या कैद्याला धरून राहिली असती तर तिच्या आयुष्याचं मातेर झालं असतं. मी लहानपणची तिची मैत्रीण, मी तिला भेटेन ह्मणून तिनं बिऱ्हाड बदललं, आज कदाचित् तिची माझी भेटही झाली नसती; पण त्या चांडाळाला सोडून तिनं लग्न केलं म्हणून ना ती शिकली ? म्हणूनच ना ती नर्स झाली ? म्हणूनच ना ती माझ्या सारख्यांच्या उपयोगी पडते आहे ? पावित्र्याच्या खोट्या

अभिमानानं जर ती तशीच सडत राहिली असती तर आज कदाचित् मरूनही गेली असती. आज ती दुसऱ्याची मुलं खेळवते आहे, उद्यां स्वतःची मुलं खेळवूं लागेल. तेंच या बनीकडे पहा. दादा भेटले म्हणून ती आज थाऱ्यावर तरी आहे. भेटले नसते तर काय झालं असतं हें तुला सांगतां येईल का ? कदाचित् कुणातरी चोराच्या हातीं सांपडली गेली असती-किंवा बाजारांत गेली असती. आज तिचा सत्यानाश झाला असता. मग स्त्रियांचं पावित्र्य कुठं गेलं असतं ? दादांच्या कृपेनं आज ती मार्गाला तरी लागली आहे. हा कांहीं तुमच्या कायद्याचा चांगुलपणाचा नव्हे किंवा तुमच्या पावित्र्याचा प्रतापही नव्हे! याचं उत्तर तूं काय देणार ? पावित्र्य बनीला आड येतं—याचं कारण ती ब्राह्मण आहे. ठकीला आड येत नाहीं-याचं कारण ती तेलीण आहे—शूद्र आहे. दोघींसाठीं पावित्र्याचा हा भेद कां ? हें बंधन सर्व स्त्रियांना सारखं होईल, तर माझं कांहीं म्हणणं नव्हतं! पण ब्राह्मणालाच तेवढा निर्बंध कां ?"

नाना क्षणभर गप्प बसला. निरुत्तर झालेल्या निराशेची छाया त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती.

तरीही उसनें अवसान आणून तो म्हणाला, "हीं बंधनं आहेत, म्हणूनच ब्राह्मण राहिले आहेत—"

मी चिडून म्हटलें, "ब्राह्मण हे ब्राह्मण राहून विशेष तें काय झालं आहे ? काय फरक आहे बनींत न् ठकींत ? ठकी शूद्र असून जशी नर्स झाली आहे तशी बनी ब्राह्मण असून नर्स झाली आहे. नर्सची परीक्षा देतांना, किंवा परिक्षा दिल्यांवर नर्सचें काम करतांना, ठकीला जसा शूद्रपणा आड येत नाहीं तसाच बनीचा ब्राह्मणपणाही तिच्या अंगीं कांहीं वैशिष्ट्य आणीत नाहीं. ब्राह्मण नसल्यानं जगाच्या व्यवहारांत ठकीचा कसलाच तोटा झाला नाहीं. ब्राह्मण असल्यानं बनीला कसलाच फायदाही मिळाला नाहीं. झाला तर तोटाच झाला आहे. संसारसुखाला ती सक्तीनें आंचवली आहे."

कांहींतरी आडवीं तिडवीं उत्तरें देऊन माझें तोंड नानाला बंद करतां आलें नसतें याची जाणीव होती, म्हणूनच तो स्वस्थ राहिला. त्याच्या मनांत कांहीं तरी खळबळ चालली होती, पण उत्तर काय द्यावें याची चांगलीशी योजना त्याला करतां येत नव्हती, असें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें.

मी म्हटलें " कां ? बोलत कां नाहींस ?—"

ठकी मधेंच म्हणाली, " काय बोलणार ते ? बोलायला काय आधार आहे ? याचं उत्तर मला देतां येईल. प्रत्यक्ष आंच लागली असल्यामुळं मी या विषयाचा विचार केला आहे. पुरातन काळीं हीं खोटीं बंधनं नसलीं पाहिजेत, असं जीं कांहीं जुनी उदाहरणं सांपडतात त्यावरून वाटतं. विवाहच्छेदाला स्मृतींतून-देखील चवदा प्रकारचीं कारणं ग्राह्य म्हणून दिलीं आहेत. त्यांत ' नवरा बायकोचीं मतं एकमेकांशीं पटत नसतील तर त्यांनीं सूत्रच्छेद करून उभयतां-नाही विवाह करायला मोकळीक आहे. ' असा आधार सांपडतो. बाबू गोविंद-दास यांच्या ' हिंदु धर्म ' या पुस्तकांत याचं विस्तारानं विवेचन केलेलं मी वाचलं आहे आणि त्याच्या अनुरोधानं स्मृतींतले आधारही पारखून घेतले आहेत. केव्हां तरी मधल्या काळांत, बहुतेक बुद्धाच्या काळानंतर, हे नवे कायदे अंमलांत आले असावे. शूद्रापेक्षां आपण कुणी तरी मोठे आहोंत, जास्त पवित्र आहोंत, असें ठरविण्यासाठीं ब्राह्मणांनीं नसतीं बंधनं निर्माण करून त्यांत आप-ल्याला बांधून घेतलं. या बंधनांचा सारा बोजा त्यांनीं बायकांवर टाकला. सत्ते-च्या जोरावर पुरुषांनीं आपल्याला बंधनें ठेवलीं नाहींत. सर्वांनाच मोकळीक होती ती अशा आततायीपणानं ब्राह्मणांच्या 'बायकांना' बंधनें घालून त्यांनीं पावित्र्याचं प्रस्थ माजवलं. हा सारा दांभिकपणा 'बायकांच्या' मूर्खपणाच्या जोरावर उभारून घेतला. याखेरीज याला दुसरं उत्तर नाहीं. आधीं बायकांची थोरवी गायची, त्यांना ' देवता ' ठरवायचं आणि मग त्यांना वाटेल तीं बन्धनं घालून त्यांचा कोंडमारा करायचा आणि मग ब्राम्हण पुरुषांनीं आपला मोठेपणा मिरवायचा, हेंच तुमचं ब्राह्मण्याचं लक्षण ! होय ना नानासाहेब ? "

नानाच्या चेहऱ्यावर लांडग्याचा क्रूरपणा दिसत होता. पण तो फारच थोडा वेळ झळकून गेला. हळुहळू त्याचा चेहरा निवळला आणि ठकीच्या शेवटच्या प्रश्नाला उत्तर देतांना तो म्हणाला, "सारेच दोष पुरुषांवर लादायची, विशेषतः— ब्राह्मण पुरुषांवर लादायची हल्ली फॅशन होऊं लागली आहे. स्त्रियांच्या पावित्र्या-वर जगाची उभारणी झाली आहे.—"

त्याचें भाषण तोडून ठकी म्हणाली, " कुठल्या स्त्रियांच्या ? मूठभर ब्राम्हण किंवा पांढरपेशा स्त्रियांच्या ? असलीं बंधनं असलेल्या स्त्रियांची संख्या तेहतीस

कोटीच्या मानानं किती थोडी आहे याची तुम्हांला नसली तरी आम्हांला चांगली कल्पना आहे. पावित्र्याचं नांव घ्यायचं, स्त्रियांना त्याचं बंधन घालायचं, तर साऱ्या स्त्रियांना सारखं बंधन घाला. तुम्हांला आपला मोठेपणा—ब्राम्हण्याच्या जोरावरचा मोठेपणा–प्रस्थापित करायचा आहे आणि त्याच्यासाठीं 'ब्राम्हणांच्या बायकांच्या' सुखाचा तुम्ही नायनाट करतां आहांत. नियम घालतांना तुम्हांला काय जातं? तुम्हांला कांहीं क्लेश सोसावे लागत नाहींत. ब्राम्हणाच्या विधवेला जन्मभर सक्तीचं ब्रम्हचर्य पाळावं लागतं, हजामत करून घ्यावी लागते, थंडीवाऱ्यांतून उघड्या अंगानं हिंडावं लागतं कुणासाठीं? ब्राम्हण पुरुषांना श्रेष्ठ ठरविण्यासाठीं! त्याचा फायदा 'तिला' मिळतो का? ब्राम्हण पुरुष एक बायको टाकून दुसरी बायको करतो. दुसऱ्या बायकोच्या संबंधानं त्याचं पावित्र्य नष्ट होत नाहीं! कां? हें पावित्र्य नष्ट होऊं नये असा कोणता आधार त्याला ईश्वरानें दिला आहे? कुठलं पावित्र्य हिशेबांत धरायचं? देहाचं? वृत्तींचं? कीं कृतीचं? देहाचा पवित्रपणा गेल्यानं जर स्त्रिया अपवित्र होतात तर दुसऱ्या स्त्रियांसंबंधानें देहाचा अपवित्रपणा गेल्यानं पुरुषाचं पावित्र्य कां नाहींसं होऊं नये? मानसिक किंवा आध्यात्मिक दृष्टया दोघांचेंही पावित्र्य सारखंच नष्ट होतं आहे. तिथं पुरुषाला मोकळीक कां आणि बायकोला बंधन कां? आणि सर्वांतला मोठा प्रश्न तो हाच, कीं हीं सारीं बंधनं 'ब्राम्हणांच्याच बायकांना' कां? मूठभर ब्राम्हण बायकांनीं ब्राम्हण्याच्या अभिमानानें ज्या शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिक यातना सोसायच्या त्या कुणासाठीं? मूठभर ब्राम्हण बायकांच्या पावित्र्यावर हें सारं जग उभं राहिलं आहे का? तुम्हांला ब्राम्हणांचं वर्चस्व जर स्थापन करायचं असेल तर ब्राम्हण बायकांप्रमाणेंच 'ब्राह्मण पुरुषांनाही' बंधनं घाला. तुह्मीं बलवान् आहांत ना? मग 'अबले'ला जीं बंधनं घालतां त्याच्यापेक्षां ज्यास्त बंधनं तुह्मां बलवंतांना नकोत का? मग तुह्मांला बलवंत ह्मणायचं तें कुठल्या आधारावर? अबलांच्या मुंड्या मुरगाळूनच का तुह्मीं बलवान् होणार? खरोखर सांगतें मी गोदे, ब्राह्मण बायकांसारख्या स्वतःला फसवून घेणाऱ्या महामूर्ख, महाआत्मघातकी स्त्रिया, साऱ्या जगाच्या इतिहासांत सांपडणार नाहींत. ब्राह्मण पुरुषांच्या गुलामगिरीचे वाळे नाकांतून, कानांतून आणि हातांतून मिरवीत

आपल्या जुल्मी बहादूर नवऱ्यांच्या ब्राह्मण्याचा बडिवार मिरवतांना त्यांना पाहिलं, कीं हिंदुस्थानला आज ही दुर्दशा कां आली आहे याचं आपोआप निराकरण होतं."

ठकी बोलत असतांना तांबडीलाल झाली होती. तिच्या डोळ्यांतटे ठिणग्या उडत होत्या. एकेक शब्द वेंचून, रोखून बोलत असतांना तो ऐकणाऱ्याच्या कानांत भाल्यासारखा खुपसला जात होता. अंतःकरणाला त्याचे घाव बसत होते. शिळपट बनीला देखील तिच्या भाषणामुळें स्फुरण आल्यासारखें वाटत होतें.

मी चिपळूण सोडतांना मला जी 'पानसुपारी' शाळेंत केली होती त्यावेळीं ठकीनें केलेलें भाषण मला आठवलें. आमच्या मास्तरनीं तिच्याबद्दल वर्तवलेलें त्या वेळचें भविष्यही आठवलें

नानानें आपलें मन सांवरून घेतलें होतें. तो शान्तपणानें म्हणाला, "ठकूताई, तुमचा प्रत्येक मुद्दा विचार करण्यासारखा आहे. कुणाही समंजस मनुष्याला पटतील असेच ते मुद्दे आहेत. असं जरी असलं तरी स्त्रियांच्या पावित्र्याची महती कमी लेखतां येत नाहीं. त्यांच्या पावित्र्याच्या जोरावरच आज धर्माची उभारणी झाली आहे—"

"गप्प बैस नाना" मी एकदम ओरडलें, "हीं कायम ठशाचीं वाक्यं आह्मांला पाठ झालीं आहेत. मी तुला सरळसरळ विचारतें, या बनीनं काय करावं? तिचा नवरा दुसरी बायको करून चैन करतो आहे, तिचा अपराध नाहीं.— त्यानं चैन कां करावी आणि हिनं खितपत कां पडावं? एका पुरुषाच्या आचरट लहरीसाठीं हिच्या सुखाचा सत्यानाश कां व्हावा? हाच का तुमचा धर्म? हाच तुमचा धर्म असेल तर आग लावा तुमच्या धर्माला! हा तुमचा धर्म जोंपर्यंत असा पुरुषांचा पक्षपात दाखवतो आहे, तोंपर्यंत त्याचीं बंधनं आम्हीं स्त्रियांनीं कां म्हणून मानावीं? हा तुमचा धर्म आधीं दुरुस्त करा. पुरुषांना आणि स्त्रियांना सारखेच नियम लावा—सारखींच बंधनं घाला—त्याच्या अनुसंधानं कायदे करून घ्या आणि असं जर करतां येत नसेल तर या तुमच्या धर्माची मोट बांधा आणि भूमध्यसमुद्रांत फेंकून द्या! धर्माच्या नांवाखालचा जुलूम आतां आम्हांला दुस्सह होऊं लागला आहे!"

अगदीं गोड गोड हंसत नाना म्हणाला, " खरं आहे—खरं आहे ! बायकांना असं वाटणारच. तसं म्हणायला तुम्हां बायकांना भरपूर कारणं आहेत यांत शंका नाहीं. पण त्याला काय उपाय ? अनादिकालापासून—"

" अनादिकालापासून नव्हे ! " ठकी एकदम मधें म्हणाली, " अनादिकालाचं नांव उगीच घेऊं नका. पण मी असं म्हणतें, कुठल्याही कालपासून कां होईना, हा चालत असलेला अन्याय जुलमाचा आहे असं जर तुम्हांला पटतं आहे, तर त्यांत तुम्ही वेळींच सुधारणा कां नाहीं करीत ? "

नाना छातीवर हात फिरवीत म्हणाला, " बहुमताशिवाय सुधारणा होत नाहीं. तुम्हां बायकांचींच मतं अद्याप ठाम झालीं नाहींत तिथं बहुमत कुठलं होणार ? तुम्हीं बायकांनींच गतानुगतिकत्व सोडल्याशिवाय या सुधारणा होणार नाहींत. "

" आतां मात्र बरोबर बोललांत ! " ठकी शांतपणानें म्हणाली, " हा अपराध आम्हां बायकांचाच आहे यांत शंका नाहीं. ज्याच्या हातीं सत्ता आहे, तो सुखासमाधानानं ती कधींच सोडणार नाहीं. बायकांच्या संबंधाचे अन्याय पुरुष निवारण करतील अशी जी अपेक्षा आम्ही करतों आहोंत, तो आम्हां बायकांचाच मूर्खपणा आहे. पण आम्हां बायकांचा असं तरी कां म्हणूं ? आम्हां शूद्रांच्या बायकांना हे अन्याय जाणवत नाहींत. याचंही एक कारण आहे. आम्हां शूद्रांना स्वातंत्र्य आहे—म्हणजे शूद्र बायकांना ! आम्हीं शूद्रांच्या बायका स्वतःचं अन्न स्वतः मिळवून खातों. स्वैपाकाची अन्नपूर्णा आणि शेजेच्या सावित्र्या होऊन आम्हीं बसलों नाहीं, म्हणूनच आम्हांला पुरुषांची—नवऱ्यांची—काडीभरही पर्वा वाटत नाहीं. स्वतःचं अन्न स्वतः मिळवण्याची ताकद असल्यामुळं शेतांत राबून, धुणीं-भांडीं करून, वाटेल ते काबाडकष्ट करून, आम्ही शूद्रांच्या बायका आमचं स्वातंत्र्य राखून ठेवतों आहोंत. आम्हीं मिळवत्या आहोंत म्हणूनच आमचे नवरे आम्हांला वचकून असतात. घालतील तें अन्न आणि देतील तें लुगडं नेसून ' गृहदेवतेची गुलामगिरी ' मिरवायची आम्हां शूद्र बायकांवर पाळी येत नाहीं. आम्हीं म्हणतों—ब्राह्मण बायकांना आम्हीं म्हणतों, उच्च वर्णाचा अभिमान आणि पावित्र्याच्या बोजाखालीं चिरडून तुम्हीं खुशाल मरा. तुमच्या दृष्टीनं आम्ही नीच वर्णाचे असलों—अपवित्र असलों—तरी तुम्हां ब्राह्मण बायकांपेक्षां आम्हीं स्वतंत्र आहों—जास्त सुखी आहों. '

" बरी आठवण झाली. मला आज सभेला जायचं आहे ! " असें म्हणून नाना झटकन् उठला आणि कपडे करून चालता झाला.

बनी म्हणाली, " आज माझे डोळे उघडले. किती तरी गोष्टींवर प्रकाश पडला. ठके, यापूर्वी मला कां नाहीं सांगितलंस ?—सांगून तरी काय होणार होतं म्हणा—शिवाय तुझं तें नांव बदललं होतं ना ! तूंच ठकी, हें मला कसं कळणार होतं ? " असें म्हणून ती उठली व तिच्या ड्यूटीचा वेळ झाल्यामुळें निघून गेली.

ठकीनें मुलीला औषध पाजलें आणि पाळण्यांत निजविलें.

निघून जातांना ती माझ्यासमोर उभी राहिली. माझ्या खांद्यावर दोन्हीं हात ठेवून माझ्या डोळ्यांवाटे इतक्या भेदक दृष्टीनें पाहूं लागली, कीं मला त्यामुळें कांपरें भरलें. तिच्या तोंडावाटे शब्द निघत होते, ते माझ्या कानांतून अंतःकरणांत शिरत होते. तापलेल्या शिशाच्या रसाप्रमाणें जळजळत जात असलेल्या त्या शब्दांनीं माझें अंतःकरण पोळून निघालें.

" गोदे, तूं बुद्धीवान आहेस असा माझा समज होता. इतका मूर्खपणा करशील असं मला वाटलं नव्हतं. फसलीस बरं गोदे, पार फसलीस ! हा तुझा नाना एक अट्टल दुर्जन आहे ! माझी पूर्ण खात्री झाली ! "

ठकी निघून गेली.

---

# प्रकरण २६ वें

# शेजेची सावित्री



नानाच्या सहवासांत राहणें; नानानें मिळविलेलें अन्न खाणें, मला दिवसेंदिवस दुस्सह वाटूं लागलें. त्यालाही माझ्या या वृत्तींतील फरकाचा अंदाज आला असावा—कारण त्याचें वर्तन दिवसेंदिवस संकोचपूर्ण होत होतें.

मुलीच्या जोपासनेचा बहुतेक भार ठकीनें घेतला असल्यामुळें तिच्या गैर-हाजिरींत एकाद्या दाईप्रमाणें मुलीची काळजी घेण्यापलीकडे माझ्यावर जास्त जबाबदारी नव्हती. पण अजिबात मुलीला टाकून नोकरी करण्यासाठीं कामावर जाणें मात्र शक्य नव्हतें. नानाच्या श्रमांचें अन्न खाणें मला दुःसह होत होतें खरें; पण त्याला इलाज नव्हता.

ठकी आली त्यावेळीं तिला मी विचारलें. ती म्हणाली, " तान्ह्या मुलांची आईच्या गैरहजेरींत व्यवस्था ठेवणारी कोणतीच संस्था अस्तित्वांत नाहीं. गोऱ्या लोकांसाठीं अशा संस्था असल्याचं मी ऐकतें. पण हिंदी लोकांसाठीं अशा प्रकारची संस्था कुणी अस्तित्वांत आणली नाहीं. तिची जरूरीच भासली नाहीं. त्यांतून पांढरपेशा लोकांसाठीं तर अशा संस्थेची मुळीं आवश्यकताच नाहीं. तान्हं मूल घरीं टाकून कामावर जाणाऱ्या बाया कुणबी आहेत. पण त्यांना अशा संस्थेची जरूरी भासत नाहीं. त्यांच्यांत शेजारधर्म असतो, त्यामुळं अशावेळीं शेजारी लोक मुलांची काळजी घेतात. कुणी ना कुणी तरी अशीं कामावर जाणारीं माणसें असतातच, त्यामुळं परस्परांना परस्परांची जरूरी असते. स्वैपाकाच्या अन्नपूर्णा आणि शेजेच्या सावित्र्या झालेल्या तुम्हां पांढरपेशांच्या बायकांना मुळीं नोकरी करायची नसते, तिथं अशा संस्थेची जरूरी कां भासावी ? मला या बायकांची धन्य वाटतें ! काय हें जिणं ? कांहीं परिश्रम न करतां नुसतं बसून अन्न खाणं यांच्या अंगीं लागतं तरी कसं ? काय अधिकार आहे यांना स्वस्थ घरीं बसून राहण्याचा—आणि स्वस्थ बसून अन्न खाण्याचा ? स्वैपाकणीच्या पगारांत जें हें यजमानणीचं वैभव मिरवतात—

मुलला जन्म देवात—त्या तुमच्या या पांढरपेशा बायकांची निलाजरी वृत्ती पाहून मला तिटकारा येतो."

मी म्हटलें, "तें सर्व खरं; पण मी आतां काय करावं? कुठंतरी नोकरी-वर जावं असं मला वाटतं आहे; पण तें अशक्य होऊन बसलं आहे. मूल मोठं होण्याची वाट पाहायची म्हणजे किती? मी नोकरीवर बाहेर गेलें तरीही मूल घरीं स्वस्थ राहील, एवढा समज यायला निदान तें पांचसहा वर्षांचं तरी झालं पाहिजे. तोंपर्यंत स्वस्थ बसून राहूं?"

"दुसरा काय उपाय आहे?" ठकी म्हणाली, "उच्चवर्ण पाहिजे तर त्या उच्चतेबरोबरच्या गैरसोयीही भोगल्या पाहिजेत. पण गैरसोयी तरी कशा म्हणायच्या? हें तुमचं वैभव आहे. कुणब्यांच्या बायका मोलमजुरी करून स्वतःच अन्न स्वतः मिळवतात म्हणून त्यांना तुम्हीं कमी लेखतां. नवऱ्यानं मिळवावं आणि घरीं स्वस्थ बसून गृहदेवतेनें त्याची पेज आणि शेज संभाळावी, हा तुमचा उच्चवर्णीयांचा मोठेपणा! यांत कांहीं वाईट आहे, कमीपणा आहे, हलकेपणा आहे—नव्हे ही वृति देहविक्रयाच्या जवळ पास कुठं-तरी येते आहे, हें तुम्हां पांढरपेशांच्या बायकांना जोंपर्यंत जाणवत नाहीं तोंपर्यंत तुमची मुलं संभाळण्याच्या संस्था कां उत्पन्न व्हाव्या? हें अन्न तुमच्या अंगीं लागतं तरी कसं? मोलकरीण, स्वैंपाकीण आणि—मी जरा कठोर शब्द वापरतें, माफ कर—आणि रखेली, या पलीकडे तुम्हां पांढरपेशे-लोकांच्या बायकांची काय योग्यता आहे? तुम्ही जें अन्न खातां, जे कपडे पेहेरतां, जें वैभव भोगतां, तें या तीन नात्यांनीं—किंवा श्रीमंत असतील त्या शेवटच्या एकाच नात्यानं! पुरुषाला एवढं वैभव उपभोगण्यासाठीं—पगार मिळवण्यासाठीं—जितके परिश्रम करावे लागतात, तितके परिश्रम तुम्हीं बाय-कांनीं कां करूं नये? आयत्या पिठावर रेघा ओढण्याचं हें जिणं तुम्हाला कां दुःसह होत नाहीं? यांतच तुम्हीं मोठेपणा कां मानतां?—आणि आतां ही अशी परिस्थिती आली म्हणजे कशाला रडतां? तुम्हांला मोठेपणा पाहिजे आहे ना? गृहदेवता व्हायला पाहिजे आहे ना? बसा तर मग घरीं आपला स्वाभिमान विसरून रडत!"

मी थोडेंसें हंसतच उत्तर दिलें, "मला स्वाभिमान विसरायचा नाहीं. अर्थ

असतांनाही मला सक्तीनं स्वस्थ बसावं लागतं आहे, त्याची काय वाट ? नाखुषीनं--अंगीं कर्तबगारी असतांही---तूं म्हणतेस तशी रखेली होण्याचा प्रसंग आला आहे, त्याची काय वाट ? ”

“ वडिलांचीं पापं मुलांना भोगावीं लागतात, त्यांतलाच हा प्रकार आहे. आतां तुम्हीं जाग्या झालांत. योग्य खबरदारी घेतलीत तर तुमच्या मुलांवर तरी ही पाळी आली नाहीं म्हणजे मिळविली. ”

बोलायला पुढें कांहीं राहिलेंच नव्हतें. स्वस्थ बसण्यापलीकडे गत्यंतर नव्हतें. मुकाट्यानें नानाच्या मुलीची दाई होऊन मी स्वस्थ राहिलें.

इतक्यांत नानानें वकील होऊन सनद काढली होती. सुरवातीला प्रॅक्टीस चांगलीशी चालण्याचा संभव नसतोच. पूर्वीच्या कमाईइतकी शिल्लक असणेंही शक्य नव्हतें.

आणि असें असूनही आमचा संसार सुरळीत चालला होता. हे पैसे कुठून येत होते तें नाना मला सांगत नव्हता. पण तो कर्ज काढित होता अशी मला शंका आली होती.

मी तसें विचारलें त्यावेळीं तो म्हणाला, “ तुझा अंदाज खरा आहे. वकिली करीत असतांना नोकरी करतां येत नाहीं. वकिली कांहीं एकदम चालत नाहीं. त्यामुळं पुढच्या आशेवर नजर ठेवून कर्ज काढण्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. ”

मुकाट्यानें तें बोलणें मला ऐकून घ्यावें लागलें. लहान मूल असल्यामुळें मला नोकरी करतां येणें अशक्य झालें होतें, याची मनाला सारखी डांचणी लागून राहिली होती. मूल नसतें तर सरळ यावेळीं नोकरी पत्करली असती आणि सुखी झालें असतें---आणि नानालाही कर्ज काढावें लागलें नसतें.

परिस्थितीचा विचार न करतां मुलाला जन्म देण्याचा आम्हांला काय अधिकार, असा प्रश्न मनांत वारंवार येऊं लागला.

पण झाल्या गेल्या गोष्टीला आतां कांहीं उपाय नव्हता. पुनः पुन्हा भोंढ-णाची उकळी येत असे पण ठकीच्या ताकिदीमुळें ती आवरावी लागत असे. दिवसेंदिवस माझी प्रकृति मूळपदावर येत होती खरी; पण एक प्रकारचा नसता नाजुकपणा माझ्या अंगीं आला होता. माझ्या तन्दुरुस्तीवर मुलीचें

आरोग्य अवलंबून आहे, या जाणीवेनें मला जी स्वतःबद्दल फाजील खबरदारी घ्यावी लागे त्यामुळें मी अशी दुबळी होऊन पडलें होतें.

पुनः पुन्हा मनांत येई——या तान्ह्या अर्भकाला जन्म देण्याचा मला काय अधिकार ? संसारांत एक तान्हें पाहुणें येणार आहे, त्याची तरतूद आधीं केल्या-शिवाय त्याला जन्माला येऊं देण्याचा आम्हांला काय अधिकार ?

यापुढें ही खबरदारी मी घेऊं लागलें——पण त्यामुळें दिवसेंदिवस नाना आणि मी या उभयतांतला संकोच जास्त वाढूं लागला. एका खोलींत राह-णाऱ्या दोन परक्या माणसांइतकेंच आमचें नातें होऊन राहिलें होतें.

अलीकडे तो फारच थोडावेळ घरीं राहात असे. रात्रींही फार उशीरां घरीं येत असे. पूर्वीप्रमाणें घटका घटका चर्चा करीत बसण्याचें टाळीत असे.

याचें कारण तो आपण होऊन सांगत नसतां मुद्दाम विचारणें मला योग्य वाटलें नाहीं. मी असेंच कांहीं केलें असतें आणि मला त्याचें कारण विचारलें असतें, तर मला नसता कां राग आला ? अर्थातच मी त्याला विचारलें नाहीं.

त्यानें सदोदित येऊन घरीं बसावें असें मला तरी कुठें वाटत होतें ? एका अर्थी हा दुरावा मला पथ्यकरच होता. तो मुद्दाम होऊन मला टाळतो कीं परिस्थितीमुळें त्याला घरीं राहातां येत नाहीं, याचें निराकरण व्हावें असें केव्हां केव्हां मला वाटत असे.

मुद्दाम होऊन टाळण्यास कांहीं कारण नव्हतें. नानाच्या वर्तनाच्या बाबतींत माझ्या मनांत आलेली अढी मी त्याला कळविली नव्हती, किंवा दुसऱ्या कुणाकडून त्याला कळली असल्याचा संभवही नव्हता. या विषयाची जर उघड उघड चर्चा केली असती तर प्रकरण विकोपाला गेलें असतें, असें जे ठकीला वाटत होतें तें चुकीचें नव्हतें. परिस्थितीमुळें सारा बाणेदारपणा विसरून मला नमतें घ्यावें लागतें आहे, या जाणीवेची डांचणी मला दिवसेंदिवस दुःसह होत होती.

एका अर्भकाला जन्म दिल्याचा हा सारा परिणाम होता. त्या अर्भकाकडे पाहून मला माझा आपलेपणा विसरून जाणें भाग पडत होतें.

दिवसेंदिवस नानाच्या वकिलीचा जम चांगला बसत चालला होता. सिंगल रूम सोडून आम्हीं एका तीन खोल्यांच्या फ्लॅटमध्यें राहायला गेलों होतों. ददात

बहुतेक मिटली होती. पण त्याचेंच मला असमाधान वाटत होतें.

माझें अस्तित्व काय होतें ? कोणत्या नात्यानें मी या घरांत रहात होतें ? माझ्यासाठीं जो घरखर्च चालला होता तो खर्च कोणत्या नात्यानें घेण्याचा मला अधिकार होता ? गृहिणीपणाचा अभिमान मिरवणाऱ्या सर्वसाधारण 'पत्नीला' त्याबद्दल कांहींच वाटलें नसतें खरें; पण मी या लग्नाच्या भानगडींत जी पडलें होतें ती पत्नी या नात्यानें नव्हे, याची स्मृति सारखी जागी होती. नानाच्या मुलीची दाई या नात्यानें मी पोसली जात होतें काय ? कीं नानाच्या मुलीची आई ? कीं नानाची दासी ?—शब्द कठोर आहे खरा—पण तो ठकीचा शब्द माझ्या स्मृतींतून जाईना——कीं नानाची रखेली ?—विवाहित रखेली !

भागीदार या नात्यानें मी लग्नाला तयार झालें होतें. पण या घरांत मला कोणती भागीदारी होती ? घरीं आतां एक स्वैंपाकीणही आली होती. मी सैंपाक करीत नसें. माझें काम म्हणजे मुलीला खेळवणें आणि पाजणें. दुसरें कोणतेंच काम मी करीत नव्हतें.

जेवणावारी हें काम करणें मला दुःसह झालें. मी एम्. ए. च्या अभ्यासाला सुरवात केली. पूर्वीची बरीचशी तयारी होतीच. मी मराठी घेऊन एम्. ए.-ला बसलें आणि पास झालें. पास होतांच मी नोकरीच्या शोधाला लागलें.

नोकरी मिळाली.

ज्या दिवशीं मी नोकरीवर जाणार त्या दिवशीं नानाला ती हकिकत सांगितली.

तो म्हणाला, "आतां माझी प्रॅक्टिस चांगली चालली आहे. कुटुंबाच्या चरितार्थाला कोणताही अडथळा नाहीं. मग तुला नोकरी करण्याची कां जरूरी वाटली ?"

तो संथपणें बोलत होता. पण त्याच्या शब्दांत वरिष्ठपणाचा दिमाख होता.

मी उत्तर दिलें, "तुझी प्रॅक्टिस चांगली चालते आहे खरी——घरखर्चाची ददात आतां राहिली नाहीं हेंही खरें—पण घरांत चार पैसे जास्त आले तर त्यांत काय बिघडेल ? कुटुंबाला तेवढीच मदत नाहीं का व्हायची ?

"अर्थात् होईल." तो हंसत हंसत म्हणाला, "ते पैसे तुला आपल्या नांवें बँकेत टाकता येतील. तसे बँकेत ठेवले तर प्रसंगी उपयोगीही पडतील !"

" नाहीं ! " मी म्हटलें, " प्रसंगीं उपयोगी पडणारा पैसा जमा करण्यासाठीं मी नोकरी पत्करली नाहीं. तूं उद्योगधंदा करावा, पैसे मिळवावे आणि मी स्वस्थ घरीं बसून खावें, हें मला आवडत नाहीं. घरखर्चासाठीं लागणारा पैसा दोघांनींही पुरवला पाहिजे असं मला वाटतं. "

नाना मोठमोठ्यानें हंसला. मी विचारलें, " एवढं हंसण्याजोगं काय झालं ? मी कांहीं विनोद केला नव्हता ! "

नाना थोडा गंभीर मुद्रेनें म्हणाला, " मला तुझं आश्चर्य वाटतं. स्वस्थ बसून सुखासमाधानानं चरितार्थ चालत असतां पैसे मिळवण्यासाठीं नोकरपेशा पत्करण्याची बुद्धि तुला कां सुचावी ? जरूरीचा प्रश्न मुळींच नाहीं; असं असतांना उगीच सुखाचा जीव त्रासांत कां घालावा ? रिकामी बसून तूं नुसती चैन करते आहेस, अशी तक्रार मी कधीं केली होती का ?—"

" तशी तक्रार करण्यापूर्वीच सावध व्हावंसं मला वाटलं. " मी उत्तर दिलें.

नाना म्हणाला, " तशी तक्रार येण्याचा मुळीं प्रसंगच येणार नाहीं. माझा प्रॅक्टिसचा जम चांगला बसत चालला आहे आणि थोड्याच दिवसांत आपण यापेक्षां जास्त सुखासमाधानाच्या स्थितींत राहूं अशी खात्री मला वाटूं लागली आहे—नव्हे थोडयाच दिवसांत आपण स्वतःच्या घरांत राहूं, इतका आत्मविश्वास मला उत्पन्न झाला आहे—"

" आणि मला माझा आत्मविश्वास नाहीं वाटतं ? माझ्याही अंगीं धमक आहे, ताकद आहे, मग तूं मिळवलेल्या पैशावर मी उदरनिर्वाह कां करावा ? कोणत्या अधिकाराच्या जोरावर ? "

" तूं माझी पत्नी आहेस ! " नाना म्हणाला.

" नाहीं ! " मी सणसणून बोललें, " तुला विस्मृति झाली असेल पण माझी आठवण चांगली शाबूत आहे. भागीदार या नात्यानें आपण हा व्यवहार सुरू केला आहे. मला डांचतं आहे तें तेंच. या व्यवहारांत एक भागीदार आपल्या कमाईचे पैसे खर्चीं घालतो आहे आणि दुसरा भागीदार—म्हणजे मी—आयतोबासारखी स्वस्थ बसलें आहे ! ही भागीदारी नव्हे. कदाचित हा पत्नीपणा असेल पण मी पत्नीपणा पत्करला नव्हता—"

" कबूल, कबूल, कबूल ! " नाना उतावळेपणानें म्हणाला, "पण त्यावेळीं

मी म्हटलें, " ऐक नाना, पहिल्यानं मी मॅटर्निटी होममध्ये गेलें, त्यावेळी नोंदबुकांत तूं माझं नांव "गोदूबाई चितळे" असं कसं लिहिलंस ? आठवतं ना ? माझ्या नांवापुढं आधीं 'बाई' कां लावलंस? तूं आपलं नांव लिहितांना कधीं 'नारायणराव गंगाधरराव चितळे' असं लिहितोस का ? नाहीं ना ? मग माझ्याच नांवापुढं 'बाई' लावण्याची जरूरी तुला कां वाटली ?"

उत्तरासाठीं मी क्षणभर वाट पाहिली पण तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून मी माझ्या भाषणाला सुरवात केली, "ठीक आहे. कांहीं आधारच नाहीं तर तूं तरी काय उत्तर देणार? तें एक झालंच—पण 'चितळे' आडनांव कां लावलंस ? माझं आडनांव चितळे आहे का? "

"कायद्याच्या दृष्टीनं तुझं आडनांव 'चितळे' आहे. मी 'गोखले' आहें, मी गोखले आहें असा, तूं किती जरी कंठशोष केलास तरी कायद्याच्या दृष्टीनं तूं चितळे आहेस—तूं गोखले नांव लावलंस काय आणि चितळे नांव लावलंस काय, दोन्हीही सारखींच. "

"विषयांतर करूं नकोस. हीं दोन्ही सारखींच नाहींत. हीं दोन्हीं सारखींच असतीं तर आपल्या लग्नाच्या वेळीं एवढं कुरूक्षेत्र माजलं नसतं. हीं दोन्ही सारखींच असतीं तर काकाबरोबर भांडून टीचभर खोलींत नववधूसह आपत्तींत राहणं तुला भाग पडलं नसतं. हीं दोन्हीं सारखींच असतीं तर माझा भाऊ देखील मला पारखा झाला नसता—"

"खरं आहे. पण त्या गेल्या गोष्टी आहेत. त्यावेळीं तत्वासाठीं आपण क्लेश सहन केले. त्या क्लेशांचं कार्य झालं. एकमेकांसाठीं एकमेकांनीं कांहीतरी स्वार्थत्याग केला आहे हें ठरून स्नेह दृढावला. तत्वाचं प्रतिपालनही झालं. पण पुढल्या आयुष्यांत—या सुखाच्या आणि स्वातंत्र्याच्या आयुष्यांत—तीच गोष्ट घेऊन घांशीत बसण्यात काय अर्थ ? तुला मूल होणार हें पहातांच मला आठवण झाली. माझेपणा आठवला. आज 'माझं' मूल जन्माला येणार, ही कल्पना ज्यावेळीं मनांत आली त्यावेळीं साहाजिकच तुझ्या नांवापुढं ' चितळे ' नांव घालावं असं मला वाटलं, यांत कांहीं गैर झालं असं मला तरी वाटलं नाहीं. "

मी रागानें उसळून म्हटलें, "पण मला वाटलं ! कायद्याच्या दृष्टीनं कुठलंहीं नांव लावणं हें जर सारखंच आहे तर माझ्या तत्वासाठीं तरी तूं 'गोखले' हेंच नांव

लिहिलं पाहिजे होतंस ! पण तूं बुद्धिपुरस्सर 'चितळे' नांव लिहिलंस ! तुला आपलं नांव माझ्यावर लादायचं होतं म्हणून तूं ही लबाडी केलीस ! त्यावेळीं मला विचारलं असतंस तर कदाचित मी होय सुद्धां म्हटलं असतं—"

"होय ना? "नाना चट्‌कन म्हणाला, "माझी तशीच कल्पना होती. आपणा उभयतां मधली परावेपणाची वृत्ति नाहींशी झालेली आहे, असं त्यावेळीं वाटायला मला सबळ कारण होतं. आपल्या अभिन्नत्वाचा पुरावा त्या घटकेला आस्तित्वांत येणार होता. त्याचमुळं भिन्नपणाची भावना—परावेपणाची वृत्ति—माझ्या हृदयांत आली नाहीं. अगदीं सहजा सहजीं—अगदीं नकळत तसं नांव मी लिहून गेलों आणि तें तसं नांव लिहून जाईपर्यंत दुसरी कोणतीच कल्पना माझ्या मनांत आली नाहीं. "

नानाच्या चेहेऱ्यावर जरी कोणताही उत्कट विकार यावेळीं दिसत नव्हता तरी ज्या प्रकारानें तो प्रत्येक शब्द मोजूनमापून योजित होता, त्या प्रकारावरून त्याचें बोलणें बनावट आहे असी माझी खात्री पटली.

मी म्हटलें, " कांहिंही म्हण—हा आफ्टरथॉट आहे ! यांत सत्याचा लवलेशही नाहीं ! "

" तुला तसं वाटत असेल तर त्याला माझा नाइलाज आहे. " असें म्हणून तो चट्‌कन उठून निघून गेला.

माझी बोलण्याची उकळी तिथल्या तिथेंच विरून गेल्यामुळें माझ्या अंगाचा भडका झाला. बिछान्यावर पडलें तरी मला झोंप लागेना. सारखें विचारांचें काहूर माजलें होतें. माझा खंबीरपणाचा अभिमान नाहींसा होऊन गेला होता. नानानें दांभिकपणाच्या जोरावर मला फसवून माझ्याशीं लग्न केलें, असें पुनः पुन्हाः मला वाटूं लागलें. आईच्या मृत्युमुळें बधिर झालेल्या माझ्या मनःस्थितीचा त्यानें गैरफायदा घेतला.

मला आठवण झाली. त्यानेंच गैरफायदा घेतला असें म्हणणें चुकीचें झालें असतें. गैरफायदा घेण्याची ही संधि त्याला मीच आणून दिली होती.

पण माझ्या तोंडून लग्नाची मागणी त्याच्यापुढें करण्याचा जो प्रसंग आला तो घडवून आणण्याची कारवाई त्यानें कित्येक दिवस चालविली होती, याचीही मला आठवण झाली. माझा अभिमान नाहींसा झाला, तो त्याचमुळें. त्याच्या

पायाशुद्ध प्रयत्नाला मी बळी पडलें हें जरी खरें होतें, मूर्खपणा जरी माझ्या पदरीं आला होता, तरी तो त्याच्या बुद्धिपुरःसर प्रयत्नामुळें होता.

मला विचार पडला—एकादी गोष्ट केव्हांतरी घडवून आणण्यासाठीं मनुष्य वर्षानुवर्षें धीमेपणानें सारखा प्रयत्न करीत राहील काय ?

प्रत्यक्ष उदाहरण माझ्या समोर होतें. पण प्रयत्नाचें कारण काय ? कोणत्या उद्देशानें त्यानें एवढे दीर्घ प्रयत्न केले ?

माझें मलाच हसूं आलें. प्रश्न आत्माभिमानाचा होता खरा; पण तो खरा होता. एक असामान्य बुद्धिमान मुलगी—मी समोर आरशांत पाहिलें—एक असामान्य सुंदर मुलगी—आपली पत्नी व्हावी असें कुणाला वाटणार नाहीं ? आय्. सी. एस्. झालेले सुप्रतिष्ठित मुलगे मला न पहातांसुद्धां माझ्याशीं लग्न करायला तयार झाले होते. मी लग्न करणार नाहीं, म्हणत होतें. माझ्या नकारानेंच त्याला चेव आला. लग्न न करण्याचा एवढा दिमाख मिरवणाऱ्या या बुद्धिमान आणि सौंदर्य-संपन्न मुलीला आपली बायको करीन तरच आपला पुरुषार्थ, असें कुणाही महत्वाकांक्षी माणसाला वाटणें स्वाभाविक होतें.'

तसेंच त्याला वाटलें असावें. त्यानें प्रयत्न केले. त्यांत त्याला यश आलें आणि माझी सपशेल फजीति झाली.

हा मूर्खपणा माझा होता हें, उशीरां का होईना, मला कळलें. तें कळून आल्यावर देखील मी 'आल्या परिस्थितीला मान वांकवून स्वस्थ बसावें काय ?

मी जसजसा विचार करूं लागलें तसतसा मनाचा निश्चय बळावत चालला. कांहींतरी करून या बंधनांतून मोकळें व्हावें असा मी निश्चय केला. त्या निश्चयाच्या समाधानानें मला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं जेवण होतांच ज्यावेळीं मी माझ्या नोकरीवर जायला निघालें त्यावेळीं नानानें मला क्षणभर थांबण्यास सांगितलें. तो म्हणाला, " गोदू, मी बोलतों याची मला क्षमा कर. पण आतां नाइलाज झाला आहे. तुझ्या काल रात्रीच्या बोलण्यामुळं मी असं बोलतों आहे असा गैरसमज करून घेऊं नकोस. त्याचा याचा कांहीं संबंध नाहीं. तूं काल तसं बोलली नसतीस तरीही आज तुला मी हें सांगणार होतों—"

" ही शेवियन प्रस्तावना टाकून चटकन काय तें सांगून टाक पाहूं ! " मी म्हटलें.

तो आपल्याशींच हंसला आणि माझ्या अगदीं समोर उभा राहून डोळयाला डोळा देऊन म्हणाला, " गोदू, ही नोकरी तुला सोडली पाहिजे. ती माझ्या प्रॅक्टिसच्या आड येते आहे. माझी प्रॅक्टिस चांगली चालत असतां तूं नोकरी करावीस, हें लोकदृष्ट्या बरें दिसत नाहीं. त्यांत मला नामुष्की आहे. "

माझें मस्तक चढूं लागलें होतें. पण मन आवरून मी म्हटलें, " माफ कर. तें अशक्य आहे. उद्योगावांचून माझ्यानं राहावत नाहीं—"

" तर मग कांहीं सार्वजनिक कार्य हातीं घे—"

" सार्वजनिक कार्यांत नांव मिळेल-पण पैसा मिळणार नाहीं—"

" तुला पैशाची उणीव कुठं आहे ? कोणत्याही गोष्टींत तुला कोणतीही ददात भासणार नाहीं, अशी खबरदारी मी घेत होतों; त्याचप्रमाणं याहीपुढं घेत जाईन. माझ्याकडे पैसा मागण्याचा तुला संकोच वाटत असेल तर एक ठराविक रक्कम दरमहा तुझ्या हातीं देत जाईन—"

" काय म्हणून ? पगार म्हणून ? हल्लीं मी स्वैंपाक करीत नाहीं, घरीं स्वैंपाकीण आहे, तेव्हां स्वैंपाकीण या नात्याचा पगार घेणं शक्यच नाहीं. दुसरं एक नातं राहिलं-पण तेंही नातं हल्लीं अस्तित्वांत नाहीं. अपत्याची निपज होण्याचा प्रसंग हल्लीं येत नाहीं. मग मी पगार घ्यायचा कोणत्या नात्यानं ? हिंदु बायकांना फक्त दोनच नातीं असतात. एक पेजेचं आणि एक सेजेचं ! हीं दोन्हीं नातीं सध्यां अस्तित्वांत नाहींत. मग तुझ्या खिशांतले पैसे घेण्याचा मला काय अधिकार ? "

नाना क्षणभर स्वस्थ बसला. माझ्या बोलण्याच्या परिणामानें, कीं त्याच्या स्वतःच्या मनोभावनेनें, अशी ही त्याची दांतखिळी बसली याचा अंदाज मला होईना.

मी म्हटलें, " स्वस्थ कां बसलास ? याला कांहीं उत्तर नाहीं का ? "

गंभीरपणानें तो म्हणाला, "तात्विकदृष्ट्या पाहतां तुझं बोलणं अयोग्य ठरणार नाहीं. व्यावहारिकदृष्ट्या त्याला किती महत्व येईल हें ठरायचं आहे. याविषयां-

ची चर्चा करतांना तूं जी भाषा वापरलीस, ती कितीही प्रमाणशुद्ध असली, तरी सभ्यपणाला विसंगत आहे. कोणतीही स्त्री आपल्या नवऱ्यासमोर अशी भाषा वापरणार नाहीं "!

"शट अप्! "मी म्हटलें, "नवरा म्हणजे स्त्रीचा कुणी वरिष्ठ अधिकारी का? वडिल माणूस का? शासनकर्ता राजा का? नवरा म्हणजे असा कोण, कीं बायकोनं त्याच्यासमोर नांगी टाकली पाहिजे? मित्रामित्रांतल्या भाषेला कधीं प्रत्यवाय असतो का? परिमाण असतं का? मी बोलतांना सभ्यपणा सोडला नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. यापेक्षांही जास्त कठोर—जास्त उघड्या भाषेत मला बोलतां आलं असतं—"

"भाग्य माझं, तशी भाषा तूं वापरली नाहींस!—"

"मांडीवर घेतलेल्या कुळुंग्या कुत्र्याला कुरवाळतांना उच्चारायचे शद्ब मला ऐकायला नको आहेत. माझ्या प्रश्नाचं सरळ सरळ उत्तर मला पाहिजे आहे."

"होय ना?" नाना अगदीं कठोरपणानें म्हणाला, "ऐक तर. मला व्यवहारांत वागायाचं आहे. व्यवहाराबाहेर चालून माझा धंदा होणार नाहीं. इतर चार कुटुंबांचे जसे आचारविचार असतात तसेच आचारविचार ठेवणं आम्हांला भाग आहे. आपली कांहीं तत्वं असतील—ध्येयं असतील—पण तीं आपलीं आपल्याजवळच ठेवलीं पाहिजेत. लोकलज्जा सोडून धंदाउद्योग होणार नाहीं!"

"ठीक आहे. तुला धंदाउद्योग होत नसला तर मी धंदाउद्योग करतें. तूं घरीं स्वस्थ बैस आणि घरीं स्वस्थ बसल्यामुळं होणाऱ्या यातनांचा—अंगीं कर्तबगारी असतां घरीं स्वस्थ बसणं भाग पडण्याच्या यातनांचा—कांहीं दिवस तरी अनुभव घे."

"आश्चर्य आहे. कांहीं न करतां मोठेपणा मिळतो आहे, वकिलीणबाई म्हणवून घेतां येतं आहे, त्याचा तुला एवढा कंटाळा कां यावा?"

"माझ्या अंगी कर्तबगारी आहे असं मला वाटतं आहे, म्हणून हा प्रयोग करून पहायचं ज्यावेळीं मी ठरवलं, त्यावेळीं मी तुला स्पष्ट विचारलं होतं! त्यावेळीं तुझ्या कर्तबगारीवर मी मिरवावं हेंच भाग्य माझ्या नशिबीं येणार असं सांगितलं असतंस, तर मी वेळींच सावध झालें असतें. मी माझी तत्वं सोडली, ध्येय विस-

ची चर्चा करतांना तूं जी भाषा वापरलीस, ती कितीही प्रमाणशुद्ध असली, तरी सभ्यपणाला विसंगत आहे. कोणतीही स्त्री आपल्या नवऱ्यासमोर अशी भाषा वापरणार नाहीं "!

"शट अप् !" मी म्हटलें, "नवरा म्हणजे स्त्रीचा कुणी वरिष्ठ अधिकारी का? वडिल माणूस का? शासनकर्ता राजा का? नवरा म्हणजे असा कोण, कीं बायकोनं त्याच्यासमोर नांगी टाकली पाहिजे? मित्रामित्रांतल्या भाषेला कधीं प्रत्यवाय असतो का? परिमाण असतं का? मी बोलतांना सभ्यपणा सोडला नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. यापेक्षांही जास्त कठोर—जास्त उघड्या भाषेत मला बोलतां आलं असतं—"

"भाग्य माझं, तशी भाषा तूं वापरली नाहींस!—"

"मांडीवर घेतलेल्या कुलंग्या कुत्र्याला कुरवाळतांना उच्चारायचे शब्द मला ऐकायला नको आहेत. माझ्या प्रश्नाचं सरळ सरळ उत्तर मला पाहिजे आहे."

"होय ना?" नाना अगदीं कठोरपणानें म्हणाला, "ऐक तर. मला व्यवहारांत वागायाचं आहे. व्यवहाराबाहेर चालून माझा धंदा होणार नाहीं. इतर चार कुटुंबांचे जसे आचारविचार असतात तसेच आचारविचार ठेवणं आम्हांला भाग आहे. आपली कांहीं तत्वं असतील—ध्येयं असतील—पण तीं आपलीं आपल्याजवळच ठेवलीं पाहिजेत. लोकलज्जा सोडून धंदाउद्योग होणार नाहीं!"

"ठीक आहे. तुला धंदाउद्योग होत नसला तर मी धंदाउद्योग करतें. तूं घरीं स्वस्थ बैस आणि घरीं स्वस्थ बसल्यामुळं होणाऱ्या यातनांचा—अंगीं कर्तबगारी असतां घरीं स्वस्थ बसणं भाग पडण्याच्या यातनांचा—कांहीं दिवस तरी अनुभव घे."

"आश्चर्य आहे. कांहीं न करतां मोठेपणा मिळतो आहे, वकिलीणबाई म्हणवून घेतां येतं आहे, त्याचा तुला एवढा कंटाळा कां यावा?"

"माझ्या अंगी कर्तबगारी आहे असं मला वाटतं आहे, म्हणून हा प्रयोग करून पहायचं ज्यावेळीं मी ठरवलं, त्यावेळीं मी तुला स्पष्ट विचारलं होतं! त्यावेळीं तुझ्या कर्तबगारीवर मी मिरवावं हेंच भाग्य माझ्या नशिबीं येणार असं सांगितलं असतंस, तर मी वेळींच सावध झालें असतें. मी माझी तत्वं सोडली, ध्येय विस-

रलें, अभिमान गुंडाळून ठेवला, तो एवढ्याच साठीं का ? सर्वस्वाची होळी करावी आणि जगाच्या जमाखर्चांत कुठंसुद्धा जागा मिळूं नये, हें बायकाचं भाग्य आहे तें मला माहित आहे–पण तुझ्यामुळं भागीदारीची परंपरा मोडेल अशी माझी अपेक्षा होती, ती तूं खोटी ठरवणार का ?"

एक सुस्कारा सोडून नाना म्हणाला, "माझा नाइलाज आहे. तुझे मुद्दे तुझ्या दृष्टीनं जितके बरोबर आहेत, तितकाच माझ्या आग्रहाला माझ्या कर्तबगारीचा आधार आहे. जोपर्यंत तूं माझी पत्नी आहेस तोपर्यंत माझ्या आजच्या परिस्थितींत तरी तूं नोकरी करतां कामा नयेस. मी असा हुकूम करीत नाहीं. आग्रहानं सांगतों, काकुळतींनं सांगतों, तेवढी माझी माझी निराशा करूं नकोस."

असें म्हणून नाना एकदम उठून निघून गेला.

माझें भाग्य मला कळलें. आतां शेवटचाच उपाय.

## प्रकरण २८ वें

# सूत्रच्छेद



त्या दिवशीं ठकी आली त्यावेळीं सकाळच्या संवादाची चर्चा झाली. अनुभवामुळें तिचें मन कठोर झालें होतें. लोकेषणेचा मला जरी मोठासा बागुलबुवा वाटत नसे तरीही लग्न झाल्यापासून मी ज्याप्रकारचें माणसाळलेलें आयुष्य कंठलें, त्यामुळें माझ्याठायीं एकप्रकारचा स्वाभाविक दुबळेपणा आला होता. धडाक्यासरशी कोणतीही गोष्ट करण्याची पूर्वीची तडाखेबंद वृत्ती लुली पडली होती. म्हणूनच ठकीच्या आश्वासनानें मला धीर आला.

ती म्हणाली, " माझा अनुभव मी तुला सांगितला आहे. बनीचा अनुभव तुझ्या समोर आहे. बनीला टाकल्यावर तिच्या नवऱ्यानं दुसरं लग्न केलं—पण बनीला मात्र दाहीदिशा मोकळ्या झाल्या. माझी खात्री आहे, कीं सामंतदादा भेटले नसते तर आज ती कुंटणखान्यांत असती. तुझी परिस्थिती तशी नाहीं. तूं स्वतः शिकली आहेस. तुला नोकरी करतां येईल. तुझ्या वडिलांनीं तुझ्या नांवावर बरीच मोठी रक्कम ठेविली आहे. तिच्या व्याजांतसुद्धां तुझा चरितार्थ चालेल. अशी परिस्थिती असतां तूं या सत्तीच्या गुलामगिरींत कां राहावंस ? माझी खात्री आहे,——मी तुम्हां दोघांचेही स्वभाव पहात आलें आहे,—तुमचा संसार सुखाचा होणार नाहीं. मी तुझ्या संसारांत विष कालवीत नाहीं. पण तुझी वृत्ती मला माहित आहे, त्यामुळं मला सहाजिकच असं वाटतं. पहिल्यानंच मी तुला सांगितलं, कीं नाना दुर्जन आहे—एक व्हिलन आहे. पायाशुद्ध रीतीनं तो पहिल्यापासून डाव टाकीत आला. त्यांत त्याला यश मिळालं, आतां परिस्थिती त्याच्या हातीं आहे. कायद्याच्या दृष्टीनं तुला कसलाच अधिकार नाहीं. मनोवृत्तीच्या भावना कायदा ओळखीत नाहींत. सावध होण्याची वेळ हीच आहे. पत्नी या नात्यानं तूं त्याच्याशीं वागत नाहींस, हें तो किती दिवस सहन करील? व्यावहारिक नीतीचीं बंधनं तोडणं त्याला अशक्य नाहीं. तो पुरुष आहे. त्याला कुणी नांव ठेवणार नाहींत. तो तसं सांगूं लागला असं तुझ्या नजरेला आलं, तर तो धक्का तुला सहन करवणार नाहीं. 'त्यावेळीं' तुला घर सोडावं

लागेल, त्यापेक्षां 'यावेळीं' मोकळी होशील तर त्याचाही मार्ग मोकळा होईल. माझी खात्री आहे, कादंबरींतील नायकासारखा तो तुझ्यासाठीं सुस्कारे टाकीत स्वस्थ बसणार नाहीं. त्याचं कार्य झालं आहे. तुझ्याशीं—लग्न करणार नाहीं असा दिमाख मिरवणाऱ्या तुझ्याशीं—लग्न करून त्याला कृतकृत्यता आली आहे. तो मोठा धोरणी मुत्सद्दी आहे. एकदम आपलं रूप उघड करणार नाहीं. हळूहळू, पायरी पायरीनं, काळवेळ पाहून, तो आपलं स्वरूप उघड करूं लागेल त्यावेळीं हाथ पाळी तुझ्यावर येईल. गाजराची पुंगी मोडून टाकतात तसं तुला फेकून दिल्याचं समाधान त्याला मिळूं देऊं नकोस. आपणहूनच तूं त्याला सोडून जाशील तर त्याच्या अभिमानाला तेवढाच फटका बसेल."

असें बोलून ती स्तब्ध राहिली. प्रत्येक शब्द अगदीं तोलून मापून तिच्या तोंडून निघत होता. तिच्या भाषणांत विकारवशतेचा लवलेशही नव्हता. त्यामुळें आधींच तयार असलेल्या माझ्या मनावर त्याचा योग्य तो परिणाम झाला.

ती पुन्हां बोलूं लागली, "एकाद्या व्यवहाराच्या तडजोडीसाठीं जशी चर्चा करायची तशाच दृष्टीनं मी या विषयाकडे पहातें आहें. तुझ्यापुढं दोन मार्ग आहेत. एक, आहे त्या स्थितींत समाधान मानून राहाणं—आणि दुसरा, नानाच्या घराबाहेर पडून स्वतंत्र होणं! आज तो तुला नोकरी करूं नको म्हणतो आहे. उद्यां कदाचित तो माघार घेईल. नोकरी कर, असंही म्हणेल. पण तसं कां म्हणेल हें तुला आज कळणार नाहीं. ध्यानांत ठेव, कीं तो एक वकील आहे. डाव प्रतिडाव करायची त्याला संवय आहे. पुन्हां तो सावध होईल पूर्वी पड खात होता तशी आतांही कित्येक वेळ पड खाईल पण त्यामुळं तुझ्या आयुष्याचं मातेरं होईल. तो तुला अशावेळीं टाकील, कीं त्यावेळीं तुला कांहींच करतां यायचं नाहीं. त्यावेळीं तुला बरीच मुलं झालेलीं असतील—"

"मुलंच नाहींत! आतां यापुढं मुलं होण्याची भीति नको!" मी ईर्षापूर्वक म्हटलें.

माझ्या आवेशयुक्त उद्गारामुळें आलेल्या हंसाला मोकळा वाव देऊन ती म्हणाली, "वाईग, हा अभिमान व्यर्थ आहे. तूं कितीही निश्चय केलास तरी तो टिकणार नाहीं. पुरूषाची तुला परिक्षा नाहीं. तशी असती तर नानाच्या लफंगेगिरीला भाळून अशी फसली नसतीस. तूं कोणताही निश्चय केलास तरी त्याला

चेंच येणार. तुझे निश्चय ह्याणून पाडण्यांतच त्याला खरा ' पुरुषार्थ ' वाटणार. तूं पुन्हां फसशील. मी पुन्हां म्हणतें, तूं पुन्हां फसशील. त्यांत कांहीं विशेष नाहीं. तशी फसलीस तर ती एक क्रमप्राप्त गोष्ट होईल. ज्या प्रकारचा निश्चय तूं केला आहेस, तसला निश्चय पार पाडायला तेवढंच कडक पथ्य पाळावं लागतं. त्याच्या घरीं राहून तें साधणार नाहीं. त्याच्यासाठीं आयुष्याची दिशाच बदलली पाहिजे. आम्हां लोकांची फार मोठी सोय आहे. असं पथ्य पाळीत बसायची जरूरी नाहीं. उच्चवर्णीय म्हणून मिरवण्यासाठीं आम्ही कायद्याचीं बंधनं स्वतःला घालून घेतली नाहींत. आमचा आयुष्यक्रम स्वाभाविक आहे--अगदीं देवाघरचा आहे. बायको पत्करली नाहीं तर तिला टाकून नवरा जशी दुसरी बायको करतो त्याच न्यायानं आम्ही शूद्रांच्या बायका नवरा पत्करला नाहीं तर दुसरा करतों--तो नवराही वाटल्यास दुसरी बायको करतो. दोघंही पुन्हां लग्न करून आपआपल्या उद्योगधंद्याला लागतात. तसं तुमचं नाहीं. तुमच्या पुरूषांसाठीं देवा घरचा कायदा आहे पण बायकांसाठीं माणसा घरचा कायदा आहे---पुरूषा घरचा कायदा आहे. आमच्यांत देखील कांहीं शहाणे हल्लीं निपजूं लागले आहेत. उच्चवर्णीय पांढरपेशांचे आचारविचार उचलून आमच्या सुखाच्या संसारांत विष कालवूं पहातात. आज पांढरपेशांची संख्या फार क्षुल्लक आहे पण आमच्यांतल्या या शहाण्या लोकांच्या प्रयत्नानं जर हा पांढरपेशेपणा आम्हां मागसल्या लोकांत शिरला, तर बहुसंख्याक स्त्रीजातीच्या जन्माचं मातेर होणार. वरच्या जातीला खालच्या जातींत येऊन वाटतां आलं असतं तर मी तुला 'शूद्र हो' असं सांगितलं असतं, पण हिंदुधर्माचे कायदे ज्या दुरात्म्यांनीं रचले आहेत त्यांनीं शुद्रांना ब्राह्मण व्हायला जसा वाव ठेवला नाहीं तसंच ब्राह्मणालाही शूद्र होतां येत नाहीं. आणि त्यांनीं तरी शूद्र होण्याचा विचार कां करावा? शूद्राचार करून जर उच्चवर्णीयत्व कायम राहतं तर शूद्र व्हायची आवश्यकता उच्चवर्णाच्या पुरूषांना कां भासावी? वाईट स्थिती आहे ती उच्चवर्णीय स्त्रियांची; पण पातिव्रत्याच्या फुंकरीनं पुरूषांनीं त्यांना भारून ठेवलं आहे, त्याचाच मोठा बोजबारा केला आहे आणि त्या बोजाखालीं बिचाऱ्या पांढरपेशा बायका चेंगरून मरत आहेत! नुसत्या मेल्या असत्या तर त्याचं मला वाईट वाटलं नसतं पण त्यांच्या सरणावर उच्चवर्णीय पुरूष पोळी भाजून घेत आहेत, याच गोष्टीचा

मला मोठा त्वेष येतो. उच्चवर्णीय बायकांना घातलेली बंधनं काढून टाका आणि मग ब्राह्मण पुरूषाचं ब्राह्मण्य कितीसं टिकतं तें मला दाखवा. बायकांच्या चितेवर पांढरपेशांच्या पांढरपेशेपणाची इमारत उभारली आहे. तुम्ही पांढरपेशा बायका जर जाग्या व्हाल, मानवी जीवनाला स्वाभाविक असणारे शूद्रांचे सर्व आचार जर पत्कराल तर उच्चवर्णीय हा शब्दच हिंदुस्थानांतून नाहींसा होऊन जाईल. कां या पुरुषासाठीं तुम्ही हीं बंधनं पाळावीं? त्यांत तुम्हा बायकांचा काय फायदा आहे! आध्यात्मिक उन्नतीचीं आंधळीं सोंगं माझ्या काटेकोर बुद्धीला पटत नाहींत. आध्यात्मिक उन्नती तेवढी बायकांसाठींच आहे का?—ब्राह्मण बायकांसाठींच आहे का? ब्राह्मण पुरुषांचा स्वैराचार त्यांच्या आध्यात्मिक उन्नतीच्या आड कां येत नाहीं? तुह्मां बायकांनीं हे त्यांना नको का विचारायला? ह्मणूनच हे धर्मांतराचे प्रसंग येतात. अशी अडचण उभी राहाते त्यावेळीं धर्मांतर करणं हाच काय तो एक उपाय राहतो—"

असें ह्मणून ती क्षणभर स्वस्थ राहिली आणि ह्मणाली, "या गोष्टी बोलण्यांत काय फायदा? जगाच्या उठाठेवी कशाला? सध्यां आपण आपल्यापुरतं पाहूं या. मला काय वाटतं तें मी तुला सांगितलं आहे—अगदीं कठोरपणानं सांगितलं आहे. त्याचा नीट विचार कर—पुनःपुन्हां विचार कर! भविष्यकाळावर नजर देऊन विचार कर आणि मग जें काय करायचं ते कर. वेळ हीच आहे. एकदां या कर्दमांत रूतत चाललीस, कीं तुला हातपाय हालवतां येणार नाहींत. या सर्व परिस्थितींतून मी गेलें आहें. पाट लावावा कीं तसंच रहावं, कीं ब्राह्मणांच्या बायकांप्रमाणं आध्यात्मिक जीवन कंठावं, याचा साधकबाधक विचार करूनच मी पुन्हां संसारांत पडलें.—आणि सुखी झालें. कुणी दुःखीही झालीं असतील पण सर्वच प्रयोग कुठं यशस्वी होतात? तूं एकप्रयोग करून पाहिलास—ताकद असली तर हा दुसराही प्रयोग करून पहा, असा या तेल्याच्या मुलीचा तुला उपदेश आहे."

भाषण संपतांच ती मोठमोठ्यानें हंसली. मीही हंसलें. कारण 'तेल्याच्या मुलीचा' हा शब्द उच्चारतांना तिनें असा कांहीं आव आणला होता, कीं गंभीर माणसालासुद्धां त्यावें हंसूं आलें असतें.

त्यानंतर तो विषय निघाला नाहीं. मुलीला घेऊन आह्मी खेळवीत बसलों. तिचें बारसें झालें नव्हतें. आह्मी सर्वच तिला 'बबी' ह्मणत असूं.

ठकी बबीला खेळवीत होती. तीही मोठ्या आनंदानें खिदळत होती. पण तिच्याकडे पहात असतां माझ्या जिवाची काहिली होत होती. अंतःकरणांत कालवाकालव सुरू झाली होती. माझा निश्चय जरी आधींच ठरला होता तरी ठकीच्या प्रोत्साहनानें मला जास्त धीर आला.

एकदोन दिवस मी विचारांत घालवले. त्या दिवशींच्या भाषणानंतर नाना माझ्याशीं फारसा बोलतच नव्हता. अगदीं जरूरीपुरत्या चार दोन शब्दांपलीकडे बोलायचं तो टाळीत असे. त्याच दिवशीं त्यानें एक मोठी केस जिंकली होती. त्यांत त्याची फारच प्रख्याती झाली होती. पैसाही भरपूर मिळाला होता. त्यामुळें त्याला एक प्रकारचा कैफ आला होता. त्यानें स्वतःहून या आपल्या असामान्य कामगिरीची हकीकत मला सांगितली नाहीं. सहजी वर्तमानपत्रद्वारें ती माझ्या वाचनांत आली.

तेंच सूत्र घेऊन मी विषयाला तोंड फोडण्याचें ठरविलें. मी विचारलें, " ही तुझ्या केसची हकीकत मला कुठं सांगितली नाहींस ?"

"काय सांगायचं," तो म्हणाला, "तूं हल्लीं माझ्याविषयीं उदासीनच आहेस. माझ्या बऱ्यावाईटाची तुला चाड आहे कुठं ?"

" तुला या केसमध्यें पैसाही बराच मिळाला म्हणतात ?"

"कां ? तुला मत्सर वाटला कीं काय ? हो, मिळाला, खूपच मिळाला. इतका पैसा मिळवायला दुसऱ्या वकिलांना आणखी दहावीस वर्षं प्रॅक्टिस करावी लागली असती. केस अवास्तव मोठ्या महत्त्वाची होती, तेव्हां देणगीही अवास्तव मोठी मिळाली."

क्षणभर आम्ही स्वस्थ राहिलों असें पाहून तो जायला निघत होता तेव्हां मी म्हटलें, " थांब, किती रक्कम मिळाली ?"

तो म्हणाला, " फारच मोठी !"

" बरोबर किती रक्कम मिळाली तें तुला सांगायचं नाहीं का ?"

" त्यांत काय सांगायचं ! एरव्हीं तरी दरमहा मी काय मिळवतों याचा हिशेब तुला केव्हां दिला आहे ? एवढं खरं, आतां वांद्र्याच्या बाजूला एखादं लहानसं स्वतःचं घर घेऊन रहाणं अशक्य व्हायचं नाहीं. तसं घर पाहायच्या मी तपासालासुद्धां लागलों आहे."

" एवढं झालं असून मला कांहीं सुद्धां सांगितलं नाहींस, याचं तुला कांहींच का वाटलं नाहीं ? "

नाना थोड्याशा खोंचदार आवाजानें ह्मणाला, " हा व्यवहार माझा स्वतःचा आहे. त्यांत कुणाची भागीदारी नाहीं. "

भागीदार हा शब्द उच्चारतांना त्याच्यावर त्यानें असा कांहीं चमत्कारिक जोर दिला, कीं मला त्याची भलतीच चीड आली. स्वभावधर्माप्रमाणें मी एकदम दणाणून जाणें शक्य होतें; पण मी आत्मसंयमन केलें.

" तूं हल्लीं नोकरी करते आहेस, तुला पगार मिळतो आहे, ती नोकरी कुठं आहे—कोणत्या प्रकारची आहे—तुला पगार किती मिळतो आहे, याची मी कधींच चौकशी केली नाहीं. " असें ह्मणून तो स्वस्थ बसला.

मीही क्षणभर तशीच स्वस्थ बसलें. आणखी कांहींक्षण तशीच स्वस्थ बसलें असतें तर तो निघून गेला असता आणि मला तर आजच सर्व गोष्टीचा फाड करून घ्यायचा होता, ह्मणून मी ह्मटलें, "खरं आहे. पण हा तुझा मोठेपणा आहे असं तुला वाटत असेल तर ती चूक आहे. तुला वाटेल तसं तूं करूं लागलास आणि मला वाटेल तें मी करूं लागलें तर त्या वागण्याला स्वतंत्र व्यवहाराचं स्वरूप येईल. तो भागीदारीचा व्यवहार होणार नाहीं. आपला बँकेतला अकौंट-सुद्धां दोघांच्या सहीचा आहे. माझे पगाराचे पैसे मी त्या अकौंटला जमा केले आहेत. अर्थातच ते तुला कळले असले पाहिजेत. या केसची जी काय बक्षिसी तुला मिळाली ती तूं या जॉइंट अकौंटला जमा केली नाहींस. अजून ती तुझ्या हातीं आली नाहीं असा माझा समज झाला, ह्मणूनच मी तुला मुद्दाम विचारलं. मी काय मिळवतें तें तुला माहीत आहे—तूं विचारलं असतंस तर मी सांगायचं नाकारलं नसतं. तूं मात्र नाकारतो आहेस. हें भागीदारीच्या व्यवहाराचं लक्षण नव्हे."

गालातल्यागालांत हंसत नाना ह्मणाला, " भागीदारीच्या व्यवहाराच्या या तुझ्या कल्पना मोठ्या अजब आहेत. त्या माझ्या गळीं उतरत नाहींत आणि यापुढं उतरतील असं मला वाटतही नाहीं. "

' होय ना !' मी अवसान येऊन ह्मटलें, " तुला या कल्पना अजब वाटतात

ना ? तुला त्या पटत नाहींत ना ? तर मग आपण हा व्यवहार मोडून टाकूं आणि आपआपला मार्ग स्वतंत्र रीतीनं पाहूं."

नाना नुसता हंसला आणि स्वस्थ राहिला. त्याच्या हंसण्यांत तुच्छतेची झांक दिसून आल्यामुळें मी म्हटलें, "असं हंसण्यावारी घालवण्याजोगा हा विषय नव्हे. याचं निराकरण आतांच झालं पाहिजे. कायदा आपल्याला 'डिव्होर्स' देत नाहीं हें मला माहित आहे. पण परस्परांच्या संमतीनं आपण आजपासून विभक्त होऊं या."

नाना म्हणाला, "लग्नाच्या वेळच्या उच्चारलेल्या मंत्रांचे अर्थ कळण्याइतकीं त्यावेळीं आपण अज्ञान नव्हतों. 'धर्मेच, अर्थेच, कामेच नातिचरामि' अशी शपथ आपण त्यावेळीं घेतली आहे, त्याची तुला आठवण आहे ना ?'

त्याच्याइतक्याच तुच्छतेनें हंसत मी म्हटलें, "होय, चांगली आठवण आहे. पण तो विधी आपण खुषीनं केला नव्हता. मर्जीविरुद्ध का होईना, पण परिस्थितीला तोंड देण्यासाठीं, वडील माणसांना खुष करण्यासाठीं, आपण त्या विधीमधून गेलों होतों. तरीही मी म्हणतें, ती शपथ 'आपण' उच्चारली नव्हती. ती शपथ तूं घेतली आहेस—नवरा या नात्यानं घेतली आहेस. त्या शपथेचं बंधन तुला आहे—मला नाहीं. मी ज्या ज्या अटींचा उच्चार त्या विवाह विधीच्या वेळीं केला, त्या त्या अटी मी पाळल्या आहेत; तूं पाळल्या नाहींस. तुला वाटत असेल, कीं आपण पाळल्या; पण मला वाटत नाहीं. ही शपथ विवाहविधी करणारानं 'केवळ नवऱ्यासाठींच' ठेवली आहे हें विसरूं नकोस. ती शपथ अशा रीतीनं घेतल्यामुळेंच धर्म, अर्थ आणि काम या तिन्हीं बाबतींत नवरे पत्नीशीं अप्रामाणिकपणा दाखवतील, असा त्या विवाहविधी घडवणाराला संशय होता, असं दिसून येतं. स्त्रीबद्दल तसा संशय असता तर ही शपथ उभयपक्षीं उच्चारली जाण्याची योजना केली गेली असती. ज्या अर्थीं तशी योजना केलेली नाहीं त्या अर्थीं नवऱ्याच्या जातीवर इतक्या पुरातन काळापासून शास्त्रकारांचा अविश्वास होता असं सिद्ध होतं. मी तुला सोडून जाणार आहें. उद्यांपासून तुझंमाझं पतिपत्नीत्वाचं नात संपलं."

नानाचा चेहरा रागानें तांबडालाल झाला होता. तो राग गिळून तो म्हणाला,

"तूं घर टाकून निघून गेलीस तर तुला पुन्हां घरीं यायला भाग पाडण्याची शक्ति नवरा या नात्यानं कायद्यानं मला दिलीं आहेत, हें तुला माहित आहे का?"

"होय," मी म्हटलें, "तें मला माहित आहे. पण तुझ्या अंगीं थोडासा तरी प्रामाणिकपणा असेल तर तूं या कामीं कायद्याचा आधार घेणार नाहींस. लग्नाच्या पूर्वीं या बाबतींत आपलं बोलणं झालं होतं आणि त्यावेळीं असा कांहीं प्रसंग येतांच मुकाट्यानं विभक्त होण्याचं तूं कबूल केलं होतंस याची तुला आठवण आहे का?"

नानाचा चेहरा खाडकन् उतरला. त्याचा आवाजही बदलला. तो म्हणाला, "होय, मी ती गोष्ट विसरलों होतों. आतां मला आठवण झाली. तुझी इच्छा असेल तर या आपल्या खाजगी 'डिव्होर्स'ला माझी संमती आहे. पण माझी एक सूचना आहे—नव्हे, अपेक्षा आहे—नव्हे, विनंति आहे—" असें म्हणून तो थांबला.

मी निश्चयाच्या स्वरानें म्हटलें, "थांबलास का? आपण विभक्त होण्यासाठीं तूं कोणतीही अट घातलीस तरी ती मान्य करीन. स्वार्थत्याग करण्याच्या बाबतींत स्त्रीजात पुरुषापेक्षां केव्हांही जास्त उदार असते, याचा तुला प्रत्यय आणून देईन. तूं काय म्हणणार आहेस त्याची मला अटकळ आहे. तुला हेंच ना विचारायचं आहे, कीं मी निघून गेल्यावर पुन्हां लग्न करायला तुला हरकत नसावी?"

'होय' हा उद्गार त्याच्या तोंडून आला खरा; पण तो यायला कितीतरी अवधी लागला. त्यानें होकार देतांच मी म्हटलें, "खुशाल लग्न कर. मला त्या-बद्दल यत्किंचितही वाईट वाटणार नाहीं. पण लग्न करण्यापूर्वीं ती मुलगी माझ्या सारखीच खट्याळ नाहीं याची खात्री करून घे. मीही तुला तसंच विचारलं असतं—तूं होय म्हटलं असतंस कीं काय हें सांगता यायचं नाहीं—पण कायद्यानं माझं तोंड बंद केलं आहे. तूं होकार दिलास तरी मला दुसरं लग्न करतां येणार नाहीं. एवढा अनुभव आल्यावरही जाणूनबुजून पुरुषाच्या पकडींत जाण्याइतकी मी मूर्ख नाहीं—अविचारी नाहीं. हें जरी खरं असलं तरी ब्राह्मणाच्या कुळांत जन्म आला असल्यामुळें पुन्हां लग्न करण्याची इच्छा असती तरी सक्तीच्या वैधव्यांत राहण्याखेरीज मला गत्यंतर नाहीं. पुन्हां जन्म घ्यायच्या वेळीं मी ईश्वराला सांगेन, 'हे ईश्वरा, मला पुरुषाचा जन्म द्यायचा असला

तर मला ब्राम्हण कुळांत घाल, म्हणजे वाटेल तसा स्वैराचार करूनही ब्राम्हण स्त्रियांच्या स्वार्थत्यागाच्या जोरावर मला उच्चवर्णीय म्हणून मिरवतां येईल; पण स्त्रीच्याच जन्माला घालायचं असेल तर मला शूद्री कर, म्हणजे शूद्रासाठीं असलेल्या निसर्गसिद्ध कायद्याच्या आधारानं माझं आयुष्य सुखाचं होईल." असें म्हणून मी क्षणभर थांबलें आणि म्हणालें, "पुन्हां आपण केव्हां कुठं भेटलों तर तोंड फिरवण्याचं कांहीं कारण नाहीं. जुना परिचय विसरून टाकायची माझी इच्छा नाहीं. बोलायला चालायला कांहींच हरकत नाहीं—एवढंच ध्यानांत ठेव म्हणजे झालं."

"जशी तुझी मर्जी!" असें म्हणून तो निघून गेला.

स्वार्थत्यागपूर्वक केलेला माझा प्रयोग अयशस्वी ठरला. पुढल्या आयुष्यांत हा दुसरा प्रयोग होणार काय, असें माझ्या मनांत आलें.

त्याच दिवशीं मी बनीला घेऊन ठकीच्या घरीं येऊन राहिलें. थोड्या दिवसांनीं बनीही तिथेंच रहायला आली. ठकीचा नवराही आफ्रिकेंतून परत आला नव्हता किंवा तिला तिकडे घेऊन जाण्याइतकी त्याची सुस्थितीही झाली नव्हती.

आम्ही तिघींनी एकत्र संसार सुरू केला आणि तो फार सुखाचा झाला.

सुमारें दोनतीन महिन्यांनीं नानाचें पुन्हां लग्न झाल्याचें मला कळलें.

त्याची ही बायको फारच सुंदर होती, पण अगदींच अशिक्षित होती.

# प्रकरण २९ वें

# तृप्ति



आम्हां तीन बायकांचा हा संसार अगदीं सुखासमाधानानें चालला होता. कुणाचा कुणाला उपसर्ग होण्याचें दूरच राहो—उलट, प्रत्येकाची प्रत्येकाला मदतच होत होती. विशेषतः माझ्या मुलीच्या बाबतींत माझा भार अगदींच हलका झाला होता. तिच्या जोपासनेचें काम ठकी आणि बनी यांनीं सर्वस्वीं पत्करलें होतें. नुसती नोकरी करण्यांत आयुष्य घालविण्यापलीकडे मी कांहींच करीत नव्हतें. निरनिराळ्या प्रकारच्या सार्वजनिक चळवळींत भाग घेण्याचा मी प्रयत्न केला पण तेथील सर्व खोटे आणि दांभिक व्यवहार पाहून मला त्यांचा वीट आला. कुणाशींच माझीं मतें पटत नसत. कार्यावर नजर ठेवून मतांना पीळ देण्याइतका लवचिकपणा माझ्या स्वभावांत नसल्यामुळें माझें कुणाशींच पटत नाहीं.

हा माझा दोष होता यांत शंका नाहीं. पण प्रामाणिकपणाशिवाय कोणतेंच कार्य करणें माझ्या मनोवृत्तीला शक्य नसल्यामुळें प्रत्येक सार्वजनिक संस्थेचे संबंध मला पदोपदीं तोडावे लागले. तो इतिहास कित्येक वर्षांचा आहे. या आत्मचरित्रांत त्याचा समावेश करूं म्हटलें तर तें एक महाभारत होईल.

पदोपदीं माझ्या मनाला वाटत असे, कीं आपली चूक तर झाली नाहीं? ठकी दुजोरा देत असे, बनी भाविकपणें मान हालवीत असे; पण त्यामुळें माझें समाधान होत नसे. डॉ. कीर्तिकरांची भेटच झाली नाहीं. रा. रा. भागवत इहलोक सोडून गेले होते. बाबीशेट यांना भेटण्यास रत्नागिरीला जाणें मनांत असूनही घडलें नाहीं छबी आणि यमी यांची आजतागायत भेटच झाली नाहीं. शिरीन पाठक अभ्यासासाठीं विलायतेला गेली ती कायमची गेली. मंजुळा चव्हाण लग्न होऊन मध्यप्रांतांत कुठें तरी नोकरी करीत होती. मी पत्रें पाठवून तिची चौकशी करण्याचा प्रयत्न केला. पण तिनें एक उत्तर सुद्धां पाठविलें नाहीं. गौरी प्रभृति फर्ग्युसन कॉलेजांतल्या मुली संसारसमुद्रांत कुठें पांगल्या गेल्या त्यांचा पुनः पत्ताही लागला नाहीं.

१५

सर्व व्यवहार सुरळीत चालले होते. तरी मनाची तळमळ थांबली नव्हती. मधल्या काळांत ठकी एकदां झांजीबारला जाऊन आली. त्या मुदतींत आम्हीं दोघीच राहिलों होतों. त्यावेळीं एक योगायोग आला. बनीचे सामंत दादा एके दिवशीं अचानक भेटले.

मी ती संधि साधली आणि त्यांचा परिचय करून घेतला. सर्व प्रकारच्या सार्वजनिक कार्यांत त्यांचा हात असे, पण जगाला त्यांची माहिती केव्हांही झाली नाहीं. कोणत्याही सत्कार्यांत स्वतःची प्रसिद्धी होऊं नये याची ते काटे-कोरपणानें खबरदारी घेत असत. त्यांनीं कुणावर उपकार केले असतील त्याचा जर कुणीं त्यांच्यासमोर उल्लेख केला तर ते बेलाशक नाकबूल करीत असत आणि त्या उपकाराचें श्रेय कुणातरी भलत्याच मनुष्याच्या माथीं मारीत असत. त्यांचा हा विक्षिप्त चांगुलपणा पाहून मला त्यांच्याबद्दल असामान्य आदर उत्पन्न झाला होता. म्हणूनच मी एके दिवशीं त्यांना माझी सर्व हकीकत सांगितली आणि मनाची तळमळ दूर होण्यासाठीं त्यांचें त्या बाबतींतलें मत विचारलें.

ते म्हणाले, "व्यावहारिकदृष्ट्या तूं केलीस ती चूक झाली असंच कुणीही म्हणेल —कुणीही कां, मी देखील म्हणेन; पण तुझ्या परिस्थितींत मी काय केलं असतं असा जर मी विचार केला तर निकाल देतांना मला दुबार विचार करावा लागेल. स्वाभिमान मोठा बाईट आहे. स्वाभिमानावर माणसाचं मन ज्यावेळीं केंद्रीभूत होतं त्यावेळीं तो परिस्थितीची पर्वा करीत नाहीं. तूं तसंच केलंस यांत काहीं आश्चर्य नाहीं. पण लोकदृष्ट्या तुझं वर्तन गर्ह्य झालं आहे. तुझा खरा इति-हास लोकांना माहित नाहीं. लोकांचा ओढा साधारणपणें दुबळ्या जीवांकडे असत नाहीं. लोक नानाला दोष देणार नाहीत, तुलाच दोषी ठरवतील. पण तुझा साद्यंत इतिहास जर जगाला माहित झाला तर तुला दोषी ठरविण्यापूर्वी प्रत्येकाला क्षणभर तरी विचार करायला भाग पाडील, अशी माझी खात्री आहे. झाल्यागेल्या चुकांचं मी केव्हांच चर्वितचर्वण करीत बसत नाहीं. ज्यांचा माझ्याशीं परिचय होतो त्यांचं 'पुढलं आयुष्य' कसं पैलपार होईल याच्याकडेच मी दृष्टी देत असतों. तरी मी असंच म्हणेन, कीं माणसानं तुला कधींही नावं ठेवलीं तरी देवाच्या घरीं तूं अपराधी ठरणार नाहींस."

त्यांच्या या उत्तरानें माझ्या मनाचें बरेचसें समाधान झालें. ते जेव्हां जेव्हां भेटत असत तेव्हां तेव्हां मी या विषयाची चर्चा करीत असें आणि तेही माझ्या आत्मविश्वासाला दुजोरा देत असत. त्यांच्या मातृवृत्तीमुळें माझी आईची उणीव भरून आल्यासारखें मला वाटत होतें.

मूळची वृत्ती अंतःकरणांत सदोदित खळखळाट करीत असे. नानाची खोड मोडल्याशिवाय माझ्या भांडकुदळ वृत्तीला समाधान वाटेना. नानाची चोहींकडे बोलबाला होत होती. मुंबईच्या 'बार'मध्यें तो जवळ जवळ शिखराला जाऊन बसला होता. अशा भाग्यशाली नवऱ्याला टाकून सक्तीचें दारिद्र्य पत्करल्याबद्दल सर्वच मला दोष देत होते.

बाबा मधून मधून माझ्याकडे येऊन रहात असत. जगाच्या दृष्टीनें ठरलेल्या माझ्या या दुर्वर्तनाबद्दल त्यांनीं मला कधींच दोष दिला नाहीं—किंबहुना, ते येत असल्यावेळीं जसें कांहीं कांहींच झालें नाहीं अशा प्रकारें वागत असत. बचीचा त्यांना फारच लळा लागला होता. तिच्या नांवावरही त्यांनीं आपल्या कमाईची बरीचशी रक्कम ठेवली होती.

दादाची आणि माझी मात्र पुनः भेट झाली नाहीं. त्याची प्रॅक्टिस पुण्यास चांगली चालली होती. त्यालाही मुलेंबाळें झालीं होतीं. पण बाबांना त्यांचा फारसा लळा नसे.

नानाची आणि माझी गांठ पडण्याचा योग मात्र सहजासहजीं येईना. मुद्दाम होऊन गांठ घेणें मला सभ्यपणाचें वाटेना.

जीवनाला कांहींच ध्येय नसल्यामुळें तें अगदी नीरस वाटत होतें. लग्न करण्याची चूक माझ्या हातून झालीं नसती तर माझ्या आयुष्याला अगदीं निराळेंच वळण लागलें असतें. लेखनकार्य आपल्या हातून होईल असें मला केव्हांच वाटलें नाहीं. कल्पनाशक्तीचा माझ्या ठिकाणीं अभाव होता. विशेष कोणत्या विषयावर ग्रंथ लिहिण्याइतका मी कोणत्याही विषयाचा अभ्यास केला नव्हता आणि कोणत्याही विषयाचा अभ्यास केल्याशिवाय त्या विषयावर ग्रंथ लिहिण्याचा प्रयत्न करण्याइतका निगरगट्ट आचरटपणाही माझ्या अंगीं नव्हता.

या नीरस जीवनांत आयुष्याच्या बऱ्याचशा उत्तरभागांत एक आशेच्या किरणाचा उदय झाला. कायद्याचा अभ्यास करून स्त्रियांना वकील होण्याची

संधि निर्माण झाली. मी पुनः पुस्तकें हातीं घेतलीं आणि लॉ टर्म्स भरायला सुरवात केली.

तीन वर्षें नोकरी करून अभ्यास केला आणि मी एम. ए. एल. एल्. बी. झालें.

सनद घेऊन पहिल्या दिवशीं झगा घालून ज्या दिवशीं मी कोर्टात गेलें त्यावेळीं जोडीला स्त्री म्हणायला एक बॅरिस्टर झालेली पारशी बाई काय ती होती.

नव्या जुन्या सर्व वकिलांनीं माझी कुचाळी करायला सुरवात केली. समोर कुणीच कांहीं बोलत नसे. पण मागाहून नानाचा आणि माझा संबंध हिशेबांत धरून प्रत्येक जण कांहींना कांहीं तरी थट्टा करीत असे.

यावेळीं मीं नोकरी सोडली होती. नोकरी करण्याची आवश्यकता भासण्यासारखी त्यावेळीं माझी परिस्थितीही नव्हती. बाबांनीं माझ्या नांवावर ठेवलेल्या रकमेचें व्याज आणि माझ्या पगारांतून झालेली बचत यांच्या तोडामिळवणीनें माझी ददात दूर झाली होती. म्हणूनच मीं नोकरी सोडली. प्रॅक्टिस चालली नसती तरीही माझें कांहीं अडलें नसतें. म्हणूनच मीं सनद काढली.

कोर्टाच्या खेपा सुरू होतांच माझा जन्मजात भांडखोरपणा पुनः सळसळूं लागला. पहिल्यानें कुणी कुळें माझ्याकडे येईचनात. इतर वकील कुळें मिळविण्यासाठीं जो प्रयत्न करतात त्या प्रकारचा प्रयत्न करण्याइतकें माझें मन दुबळें नव्हतें. बॅरिस्टरबाई मला मधून मधून कांहीं केसीस देत असत त्यामुळें मला थोडथोडा आत्मविश्वास उत्पन्न होऊं लागला.

'केस' चालविण्याचा आत्मविश्वास येतांच मी लढाई सुरू करण्याचें ठरविलें. लढाई नानाशीं करायची होती. नानाकडे ज्या 'केसीस' येत असत त्यांच्या विरुद्ध बाजूचें वकिलपत्र मिळवण्याचा मी प्रयत्न करूं लागलें.

हळुहळू असे दावे मला मिळूं लागले आणि मी आणि नाना वादी—प्रतिवादी या नात्यानें कोर्टासमोर येऊं लागलों.

काय असेल तें असो, मी समोर येतांच नाना हतवीर्य होत असे. एकाद्या खटल्यांत एकाद्या मुद्यावर जर मी थोडी जोरानें बोललें तर तो बावरून जात असे; आणि बहुतकरून अशा दाव्यांचा माझ्या बाजूनें निकाल होत असे.

प्रत्येक कोर्टांतून मी नानाचा पाठपुरावा करूं लागलें. जसजसें यश येऊं लागलें तसतसें मला अधिकाधिक स्फुरण चढूं लागलें आणि तसतसा नाना अधिकाधिक बावरून जाऊं लागला.

एके दिवशीं नाना मला भेटायला आला. असें कांहींतरी होईल अशी अपेक्षा मी केलीच होती. गृहस्थपणाला शोभेसा मी त्याचा आदरसत्कार केला. ज्या-वेळीं त्यानें बबीची चौकशी केली त्यावेळीं मी त्याला विचारलें, " बबीची चौकशी करण्यासाठींच तूं आला आहेस का ? कीं ही नुसती औपचारिकता आहे ? इतक्या वर्षांत तुला बबीची आठवण झाली नाहीं. आजच हा प्रेमाचा पाझर कां फुटला ? खोटं बोलूं नकोस; अगदीं खरं खरं सांग."

क्षणभर स्वस्थ राहून तो ह्मणाला, " तुझं ह्मणणं खरं आहे. नुसती बबीची चौकशी करण्यासाठीं मी आलों नाहीं. मला भंडावून सोडण्याइतकीं मुलं माझ्या घरीं वावरूं लागल्यामुळं मुलीबद्दल आतां मला फारसं प्रेम राहिलं नाहीं. मी आलों त्याचं कारण खरोखरच निराळं आहे—" अवसान घेण्यासाठीं क्षणभर थांबून तो म्हणाला, " माझा हा पाठपुरावा कां करते आहेस ? मी काय तुझा अपराध केला आहे ?"

" काय अपराध केला आहे ?" मी उसळून उठून ह्मटलें. " माझ्या आयु-ष्याचा सर्वस्वी सत्यानाश केलास तरीही असला प्रश्न करायची तुला लाज वाटत नाहीं ? "

वकिलीच्या संवयीमुळें खोटी सहनशीलता त्याच्या अंगीं चांगलीच मुरली होती. चेहऱ्यावरची एक रेषाही बदलूं न देतां तो ह्मणाला, " कुणी कुणाचा सत्यानाश केला याची चर्चा आज नको. तडजोड होऊन आपण विभक्त झालों, असें असूनही तूं निष्कारण मला कां त्रास देत आहेस ?'

मी ह्मटलें, " सत्यानाश माझ्या आयुष्याचा झाला, यांत शंका नाहीं. या सूत्रच्छेदामुळं तुझं कांहींच नुकसान झालं नाहीं. बेअब्रू होते आहे ती माझीच. तूं पुनः लग्न करून सुखानं संसारांत नांदतो आहेस. पण मला सक्तीचं वैधव्य अनुभवावं लागतं आहे. माझ्या कृतकर्मांचीं फळं मी भोगतें आहे यांत शंका नाहीं. पण कांहीं कांहीं गोष्टी अशा आहेत, कीं त्याचा सूड उगविल्याशिवाय मनाचं समाधान होत नाहीं. ईश्वरीकृपेनें मला ती संधि मिळाली आणि तिचा फायदा मी घेत आहें."

" कोणती संधि तुला मिळाली आहे ? "

" तूं विसरला असशील, पण मी विसरलें नाहीं. तुझ्या मोठेपणावर विकलें जाण्याची संधि तूं मला बहाल केली होतीस. 'वकिलीणबाई' म्हणून तुझ्या नांवावर मी मिरवावं अशी शिफारस केली होतीस. त्यावेळीं मला वकिलीण होतां येत नव्हतं. मी वकिलीणबाई म्हणून मिरवलें असतें आणि कुणी मला कायद्याचा प्रश्न केला असता तर मला स्वस्थ बसावं लागलं असतं. कुणी वकिलीण या नात्यानं मला कायदा विचारायला आला नसता, असं तूं म्हणशील. मला तें कबूल आहे. पण तें निरर्थक जिणं मला नको होतं. लोकांनीं मला वकिलीण म्हणावं आणि कोर्टांत जाऊन मला प्रॅक्टिस करतां येऊं नये, याचं मला मरणप्राय दुःख झालं असतं. आतां कुणाला तसं म्हणायची छाती नाहीं. "

" खरं आहे ! " असें म्हणून नाना स्वस्थ बसला.

तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून मी म्हटलें, " तुझा विषय संपला—पण मला अजून बोलायचं आहे. त्यावेळीं तुला सोडून मी निघालें तेव्हां आपल्यांत समता नव्हती. आज आपण दोघंही एकाच रेषेंत उभीं आहोंत. तुला फार घाई झाली. तूं वाट पाहिली नाहींस. कदाचित् मला पश्चात्तापही झाला असता—निदान कळवळा आला असता—सहानुभूति वाटली असती ! पण तूं लग्न केलंस. भेकडाप्रमाणं एका 'अशिक्षित मुलीशीं' लग्न केलंस ! सुशिक्षित मुलीची तूं भीति घेतलीस ! दुसरं लग्न करतांना तूं आपल्या तोलाची वधू पाहिली असतीस तर मला तुझ्याबद्दल आदर वाटला असता. पण तूं त्याही कसाला उतरला नाहींस. तूं नामर्द आहेस. मी मर्द आहें. इतकीं वर्षं मर्दाप्रमाणं सक्तीच्या वैधव्यांत काढलीं. केव्हांही मी विकारवश झालें नाहीं. तीन महिनेसुद्धां तुला बायकोखेरीज राहतां आलं नाहीं ! तो तूं काय मर्द ? अजूनपर्यंत तूं तसाच राहिला असतास तर तुझ्या तोंडीची लायकी येतांच कदाचित् मी तुझ्या घरीं आलें असतें. हातांत हात घालून आपण उभयतांनीं वकिलीचा धंदा केला असता. हिंदुस्थानच्या संसारांत तें एक मोठं उदाहरण झालं असतं. पण नामर्दपणामुळं तूं ती संधि गमावलीस." येवढें बोलून मी स्वस्थ राहिलें.

निर्लज्जपणानें तो म्हणाला, " म्हणजे अजूनही माझा पाठपुरावा करीत तूं मला त्रास देणार का ? "

“ मर्दासारखा मर्द असशील तर तोंडाला तोंड दे. कोर्टात मी समोर उभी राहिलें म्हणजे कां घाबरतोस ? काय मी तुला खातें ! पण तुझं मनच पापी आहे. पहिल्यापासून तूं किती डाव टाकीत आलास ! कॉलेजांत असतांना पुलावर बसून माझी निंदा करणारा नाना तोच खरा नाना. त्यापुढचं सारं ढोंग—सारी लबाडी ! खरं ना ? ”

नकळत त्यानें होकारार्थी मान हालविली. पण-झाली चूक ध्यानीं येऊन तो चट्कन् उठून उभा राहिला. रागानें असो कीं भीतीनें असो, तो लटलट कांपत होता. उघडकीस आलेलें तें दांभिकपणाचें ध्यान पाहून माझी मलाच लाज वाटली. असल्या भेकडाची बायको व्हायला मी तयार झालें होतें ! किती मी आंधळी ! केवढी मी मूर्ख !!

“ कृपा करून माझ्या वाटेस यापुढं तरी जाऊं नकोस. ” तो कांपऱ्या आवाजानें म्हणाला.

मला त्याची शिसारी आली. मी म्हटलें, “ जा. बबी शाळेंतून येण्यापूर्वी इथून निघून जा. आपला बाप अगदीं नालायक आहे, हें तिला तरीं कळायला नको. ”

तो तसाच पायरीखालीं उतरला.

खोलीच्या खिडकींतून मी पहात होतें. अशाच एका पूर्वीच्या प्रसंगाची मला आठवण झाली. रस्त्यावरून जाणाऱ्या एका सनातनी गृहस्थानें त्यावेळीं माझी थट्टा केली होती.

माझा-क्रम तसाच सुरू होता. मी हात धुऊन त्याच्या पाठीस लागलें होतें. प्रत्येक केसमध्यें अपयश येऊं लागल्यामुळें त्याची प्रॅक्टिस थकत चालली. बाररूममध्यें चारचौघांत बसायलाही तो भिऊं लागला. पूर्वी माझी थट्टा करणारे वकील आतां माझ्या बाजूचे झाले होते.

माझी प्रॅक्टिस वाढूं लागली. थोड्याच दिवसांत मी सांताक्रूझला स्वतःचें घर बांधलें.

आणि नाना पुण्याला जाऊन वकिली करूं लागला.

माझा आत्मा शांत झाला.

## प्रकरण ३० वें

# पुढें काय दिसणार ?



शिक्षेची मुदत संपायला आतां तीन चार दिवसच राहिले आहेत. पत्करलेली ही खुषीची सक्तमजुरी आज पुरी होणार, याचा एक प्रकारें मनाला आनंद वाटत आहे.

प्रॅक्टिस सुरू झाली, पैसे चांगले मिळत होते, नांवलौकिक होत होता; पण मनाला एकप्रकारचें औदासिन्य आलें होतें. ठराविक वेळीं ऑफिसांत जाऊन ठराविक वेळीं घरीं येणाऱ्या आणि घरचे सर्व व्यवहारही अगदीं ठराविक रीतीनें पाळणाऱ्या, एकाद्या कारकुनापेक्षां वकिलाचें जीवीतही मला भिन्न वाटलें नाहीं.

नानाचा जो सूड उगवला गेला त्याची जी तृप्ती आली होती, त्यामुळें जीवनांतलें वैचित्र्य नाहींसें झालें होतें. राजकारणांत पडण्याचें मनांत येई; पण त्याची मला आवड नव्हती. कॉर्पोरेशनसाठीं उमेदवार म्हणून उभें राहण्याचा पुष्कळांनी आग्रह केला, निवडून येण्याचीही शंभर टक्के खात्री होती, तरीही मी त्या भानगडींत पडलें नाहीं. कित्येक वेळां जाऊन कार्पोरेशनमधील कामकाज पाहिल्यामुळें त्या झब्बूशाहीच्या संस्थेचा मला तिटकारा आला होता. वकिली सोडावी असें केव्हां केव्हां मनाला वाटत असे, पण तेवढाच काय तो जिवाला विरंगुळा होता. तो सोडून आधींच नीरस झालेलें माझें जीवन आणखीही नीरस करणें मला बरें वाटलें नाहीं.

रोज रोज राजकारणांत उलटापालट होत होती. मधें असहकारितेच्या चळवळीची एक लाट आली—या चळवळींत स्त्रियांनीं जरी प्रत्यक्षपणें भाग घेतला नाही, तरी भावनात्मकतेच्या जोरावर अंगावरील दागिने काढून फेकून त्यांनी त्यावेळच्या त्या राजकारणाला नवऱ्यांची पर्वा न करतां आर्थिक मदत केली. कित्येक बायकांना या कामीं आपल्या नवऱ्याकडून मारसुद्धां खावा लागल्याचें मला त्यावेळीं दिसून आलें.

प्रत्यक्ष स्त्रियांच्या अशा कोणत्याच चळवळी होत नव्हत्या. नित्यनैमित्तिका-

तील सभा–परिषदा व्हाव्या, त्यांत ठराव पास व्हावे, त्याची अंमलबजावणी होऊं नये, हा नित्याचा हिंदुस्थानी क्रम सुरू होता.

पण महात्मा गांधींनीं दांडीला मोर्चा वळविला त्यावेळीं मात्र एक निराळया प्रकारची खळबळ उत्पन्न झाली. मिठाच्या कायदेभंगानें ही चळवळ सुरू झाली होती. असहकारितेला कायदेभंग आणि निःशस्त्र प्रतिकार याची जोड देण्यांत आली होती. हंसाबेन मेहता यांना तार करून महात्मा गांधींनीं स्त्रियांचें एक कार्यकारी पथक निर्माण करण्याची विनंति केली.

या चळवळीच्या सुरवातीला सर्वांचाच उत्साह अवर्णनीय होता––प्रामाणिकपणाचा होता. इतक्या प्रामाणिकपणानें कोणतीही चळवळ हिंदुस्थानांत यापूर्वी सुरू करण्यांत आली नव्हती.

स्त्रियांच्या पथकासाठीं केशरी रंगाच्या युनिफॉर्मची योजना केली होती. परदेशी लोक या साडीला 'फ्लेम–कलर्ड साडी'–अग्नीज्वालेशीं स्पर्धा करणाऱ्या रंगाची साडी म्हणत असत. ती उपमा मला सर्वदृष्टया जास्त यथार्थ वाटे. या पथकांतील बायकांना 'केसरीया' असें म्हणत असत. या बायकांची निवडही फार कसोशीनें करण्यांत आली होती. एकेक स्त्री म्हणजे एकेक 'अग्निज्वाला' होती.

पहिल्या पहिल्यानें कॉंग्रेस हाऊसमध्यें चालत असलेली गडबड पाहून मला हंसूं येत असे. तीं खादीवाली पथकें, त्याची ती बेडौल ड्रील, त्यांच्यासाठीं जेवणाची केलेली उत्तम व्यवस्था, त्या व्यवस्थेसाठीं आचारी वाढप्याचें काम करणाऱ्या मोठमोठ्या श्रीमंतांच्या बायका पाहून मला पहिल्यानें कौतुक वाटण्याऐवजीं मला कींवच येत असे. ताटावरून पाटावर आणि पाटावरून ताटावर प्रवास करतांना देखील थकून जाणाऱ्या या बायका भाजी चिरणें, पोळ्या लाटणें, वाढणें वगैरे कामें करीत असतांना पाहून आनंद वाटण्याऐवजीं मला दुःखच होत असे. राजकारणांत बायकांची किंमत स्वैपाकीण–वाढपिणीच्या पलीकडे गेली नाहीं, हें या प्रकारावरून सहज दिसून येत होतें.

पण चारदोन दिवसांत काळ बदलला. पिकेटिंगला सुरवात झाली. ज्या स्त्रीसहज लज्जाशीलतेची कविजन मुक्तकंठानें काव्यें गात स्तुति करतात ती नाजुकनारपणाची वृत्ति टाकून, या चालत्या बोलत्या 'अग्निज्वाला' सभ्यवस्तींपासून

मवाली वस्तीच्या दुकानापर्यंत गिऱ्हाईकाशीं हुज्जत घालूं लागल्या, त्यावेळीं मला देखील कोर्टांतलें काम टाकून त्यांच्या कामाची पहाणी करण्याची उत्सुकता वाटूं लागली.

मनाची करमणूक व्हावी या उद्देशानें मीं 'कॉंग्रेस हाउस'कडे बहुतेक प्रत्यहीं जात असें. निरनिराळ्या भागांतील फूटपाथवर उभें राहून मिरवणूकांचें अवलोकन करीत असें. हात न उचलतां रक्त सांडूं देणारा कांहीं पुरुषांचा मर्दपणा पाहून पुरुषांच्या जातींत सुद्धां प्रामाणिकपणाचा उद्भव होऊं लागला आहे, असें मला वाटूं लागलें. चळवळीबद्दल हळुहळु माझ्या मनांत सहानुभूति उत्पन्न होऊं लागली. या चळवळीची कुचेष्टा करण्याची मला हळुहळू लाज वाटूं लागली. तरीही या चळवळींत प्रत्यक्ष भाग घ्यावा असें मनाला वाटेना. अंतःकरणांतून खरा खरा उमाळा आल्याखेरीज कोणत्याही कार्याला हात घालणें मला अप्रामाणिकपणाचें वाटत होतें. उगीच चार बायका गोळा झाल्या—मोठमोठ्या घरंदाज बायका चळवळींत प्रत्यक्ष भाग घेऊं लागल्या—म्हणून त्यांना अनुसरून गर्दीच्या लोंढ्याबरोबर आपणही जाऊन त्यांत मिसळावें, असें वाटण्याइतकी मीं मनाची दुबळी नव्हतें.

पण एके दिवशीं हेंही घडून आलें. ती जून १९३०ची बारा तारीख होती. त्यादिवशीं सोलापुरी मर्दांच्या गौरवासाठीं 'सोलापुर दिन' पाळण्यांत येणार होता. त्या मिरवणूकीला फार जोराचा अडथळा होणार, क्वचित् गोळीबार होणार, अशा भूमका उठत होत्या. दुपारींच लॅमिंग्टन रोडच्या बाजूला सशस्त्र पोलिस दिसूं लागले होते. चार वाजतां मिरवणूक निघणार होती. सर्वत्र एकच गडबड उडाली होती.

मिरवणूक निघण्याच्या पूर्वी पेरिन बेन यांनीं देशसेविका संघांतील सर्व बायकांना बोलावून घेतलें. प्रसंगीं गोळीबार झाला तर त्याला तोंड देण्याचें धैर्य ज्यांना असेल त्यांनींच पुढें यावें, अशी घोषणा करतांच सुमारें सव्वाशें बायका पुढें आल्या. मिरवणूक फक्त बायकांचीच निघायची, असें ठरलें होतें.

साडेपांचच्या सुमारास मध्यभागीं राष्ट्रीय निशाण घेतलेली पेरिनबेन, एका बाजूला अध्यक्ष गुणवंतलाल कापाडिया, दुसऱ्या बाजूला सेक्रेटरी भालचंद्र धुरंधर

अग्रभागीं असलेली ही आग्निज्वालांची मिरवणूक दणदण पावलें टाकीत काँग्रेस हाऊसच्या बाहेर पडली.

प्रेक्षकांच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

त्याचवेळीं मला स्फुरण चढलें. तोंपर्यंत मी कोणत्याच संघांत प्रवेश केला नव्हता.

मी काँग्रेस हाऊसमध्यें गेलें, एक केशरी साडी मागून घेतली आणि ' केसरीया ' बनून त्या मिरवणूकींत सामिल झालें.

त्या दिवसाचा सर्वच प्रसंग अभूतपूर्व होता. त्या प्रसंगाचें वर्णन करूं गेल्यास पुढील सर्व प्रसंगांचीही हकिकत लिहावी लागेल. पण आतां तेवढी मुदत राहिली नाहीं आणि उत्साहही राहिला नाहीं.

काँग्रेस हाउस सरकारजमा झाल्यानंतर पिकेटिंग करणाऱ्या ज्या सेविकांना पकडण्यात आलें, त्यांत मीही एक होतें. मला साधी शिक्षा झाली होती. तुरुंगांत असतांना अगदीं करमत नसे म्हणून मी स्वतःची हकिकत लिहून काढण्याची खुषीची सक्तमजुरी पत्करली. तीं हीं नुसतीं टाचणें आहेत. यापेक्षां त्यांना जास्त महत्व नाहीं.

० ० ० ०

मी तुरुंगांत असल्याच्या मुदतींत ठकी झांजीबारला गेल्याचें मला कळलें. बबी बनीजवळच रहात होती. बाबाही तिथेंच येऊन राहिले होते.

० ० ० ०

तीन-चार दिवसांतच मी तुरुंगाच्या बाहेर पडणार, असें जेलरनें आजच मला येऊन सांगितलें. हीं पुरीं झालेलीं टाचणें आज मी जेल सुपरिंटेन्डेंटच्या हवाली करतें आहे.

० ० ०

तुरुंगाच्या बाहेर पडल्यावर मला काय दिसणार ?

---

ॐ तत्सत्.

# प्रसिद्ध झाली ! !

एकामागून एक आपल्या सरस व सुंदर
कादंबऱ्यांनीं मराठी वाचकांना वेड लावणारे

प्रो. ना. सी. फडके यांची कादंबरी

# कलंकशोभा

किंमत २ रु. ट. ख. निराळा.

ही कादंबरी इतकी चटकदार झाली आहे कीं
ती वाचावयास सुरुवात केल्यावर तुह्मांला
खालीं ठेववणार नाहीं. प्रो. फडके यांच्या
अजूनपर्यंतच्या कादंबऱ्यांत ही सर्वोत्कृष्ट
आहे हें वाचतांक्षणीं तुह्मांला पटेल !

## मौज प्रिंटिंग ब्यूरो,

खटाववाडी, मुंबई नं. ४.